पुणे विद्यापीठ

कै. न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमाला, १९६१



# जेम्स कनिंगहॅम ग्रॅन्ट डफ



डॉ. अ. रा. कुलकर्णी,
इतिहासविभागप्रमुख, पुणे विद्यापीठ.

[ पुणे विद्यापीठ प्रकाशन ]

UNIVERSITY OF POONA

THE N. C. KELKAR MEMORIAL LECTURES,
1969



# JAMES CUNINGHAME GRANT DUFF



DR. A. R. KULKARNI
Head of the Department of History,
University of Poona

बखर

मराठ्यांची

क्यापटन ग्रांट डफ याणीं

इंग्रजींत केलेली तीचें

भाषांतर

क्यापटन डेविड केपन साहेब याणीं महाराष्ट्र भाषेंत

केलें

मुंबई

जानेवारी सन १८३०

मुंबई सरकारी शिळाप्रेसवरील पहिल्या आवृत्तीचें पहिलें पान



कॅप्टन जेम्स ग्रँट
(पारसनीस म्यूझिअम, सातारा)

" ग्रांट साहेब यास कंपीणी सरकारानी ठेऊन
काही वाकब जाल्यामुळें
आमचा फायेदा आहे. "

—राजा प्रतापसिंह रोजनिशी क्रमांक ४ पृ. ४३
ता. ३० नवंबर, १८२०

J. Grant Duff

( ग्रँट डफ यांची स्वाक्षरी )

ज्यांच्यावर कधींही रागावता येत नाही

असा महापुरुष

म. म. दत्तो वामन पोतदार

यांना सादर अर्पण !




# प्रकाशकाचे निवेदन

पुणे येथे स्थापन झालेल्या कै. नरसिंह चिंतामण केळकर–स्मारक–निधि समितीच्या विश्वस्तांतर्फे मिळालेल्या रु. २५,००० च्या देणगीचा स्वीकार पुणे विद्यापीठाने केला आणि त्या देणगीच्या व्याजातून प्रतिवर्षी कै. केळकर यांच्या स्मृतिदिनाच्या सुमारास कै. नरसिंह चिंतामण केळकर स्मारक व्याख्यानमाला घडवून आणण्याचा उपक्रम १९५४ पासून सुरू झाला. आतापर्यंत या व्याख्यानमालेतून अनुक्रमे प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, श्री. बाळाचार्य माधवाचार्य खुपेरकर, श्री. शं. ना. जोशी, प्रा. श्री. ना. बनहट्टी, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. ह. रा. दिवेकर, प्रा. ब. ग खापर्डे, प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रा. द. ब. डिसकळकर, प्रा. पांडुरंग पिसुर्लेंकर, प्रा. अ. का. प्रियोळकर, प्रा. रा. ब. आठवले, प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे, प्रा. व. दि. कुलकर्णी, प्रा. भ. श्री. पंडित आणि डॉ. अ. रा. कुलकर्णी यांची व्याख्याने झाली आहेत.

१९६९ या वर्षाच्या व्याख्यानमालेसाठी पुणे विद्यापीठाच्या इतिहास विभागाचे प्रमुख डॉ. अ. रा. कुलकर्णी, एम्.ए.,एल्‌एल्.बी., पीएच्.डी. यांची योजना विद्यापीठाने वक्ते म्हणून केली होती. डॉ. कुलकर्णी यांनी १९६९ च्या ऑक्टोबर व नोव्हेंबर महिन्यात या मालेत एकूण ६ व्याख्याने दिली. ‘जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ : मराठ्यांचा इतिहासकार व प्रशासक’ असा त्यांच्या व्याख्यानमालेचा विषय होता. त्यांची व्याख्याने आता या मालेतील १६ वे पुष्प म्हणून ग्रंथरूपाने प्रकाशित होत आहेत. मराठ्यांच्या इतिहासाचे अभ्यासक या ग्रंथाचे स्वागत करतील अशी विद्यापीठास आशा आहे.

पुणे विद्यापीठ,<br>गणेशखिंड, पुणे–७.<br>५ जानेवारी, १९७१

र. श्री. सरदेशपांडे<br>कुलसचिव.

# योगायोग

डेक्कन कॉलेजांत असलेल्या पारसनीस संग्रहातील साताऱ्यासंबंधीचा रुमाल चाळीत असता एक दोन रोजनाम्यांत मला बाळाजीपंत नातू-संबंधीचे काही उल्लेख आढळले, आणि त्या संदर्भात मराठ्यांचा आद्य इतिहासकार कॅ. जेम्स ग्रँट याचेही नाव येऊ लागले. इंग्रजी सत्ता साताऱ्यात बळकट करण्यासाठी कॅप्टन बहादुराबरोबरीने बाळाजीपंत नातूही झटत होता. ‘ परंतु बाळाजीशी परभारे काही बोलू नये, जे काही बोलावयाचे ते माझ्याशी बोलावे, येथील कागदपत्रांची माहिती करून घेण्यासाठीच फक्त त्याची नेमणूक केली आहे ’ असा अगदी प्रारंभीच कॅप्टन बहादुरांनी राजघराण्यातील मंडळींना दिलेला इशारा वाचून आश्चर्य वाटले, आणि या दोघांचे परस्परांचे संबंध काय असावेत यासंबंधीचे कुतूहल निर्माण झाले आणि ‘ बाळाजीपंत नातू ’ असा एक निबंध लिहून महाराष्ट्रेतिहास परिषदेच्या मुंबई येथे भरलेल्या पहिल्या अधिवेशनात मी त्याचे वाचन केले.

हा निबंध तयार करीत असताना ‘ स्कूल ऑफ ओरिएंटल आणि आफ्रिकन स्टडीज ’, लंडन विद्यापीठ येथील प्राध्यापक डॉ. केनेथ बॉलहॅचेट याच्या ‘ सोशल पॉलिसी अँड सोशल चेंज इन वेस्टर्न इंडिया (१८१७–१८२७)’ या पुस्तकाचा बराच उपयोग झाला. प्रस्तुत ग्रंथातहि ग्रँट डफ आणि एल्फिन्स्टन यांच्यामधील अस्सल कागदपत्रांचा बराच वापर केला असल्यामुळे, ग्रँट डफबद्दलची माझी जिज्ञासा आणखी वाढली. मराठ्यांचा एक इतिहासकार म्हणून त्याच्यासंबंधीची भलीबुरी मते प्रसृत आहेत, पण एक प्रशासक म्हणून तो कसा होता याची प्रतिमा जनतेसमोर नाही. योगायोग असा की, यु. जी. सी. ने भरविलेल्या एका परिसंवादासाठी मार्च १९६७ मध्ये लंडनहून प्रा. बॉलहॅचेट दिल्ली येथे आले होते, तेथे त्यांचा माझा परिचय झाला. ग्रँट डफच्या त्यांनी वापरलेल्या पत्रा-संबंधी मी पृच्छा केली असता त्यांनी सुचविले की, ग्रँट डफची अनेक पत्रे इंडिया ऑफिस लायब्ररी (लंडन) येथे असून त्यांचे परिशीलन केल्यास बरीच माहिती मिळू शकेल. हे सहजसुलभ नसल्यामुळे मी तिकडे विशेष काही लक्ष दिले नाही. पुढे दुसऱ्या तिसऱ्या दिवशी ‘ एखादी रिसर्च

स्कॉलरशिप मिळाली तर तू येऊ शकशील का ?' अशी त्यांनी विचारणा केली, आणि लंडनला परत गेल्यानंतर आपण तुला कळवू असेही आश्वासन दिले.

आश्चर्याची गोष्ट अशी की बरोबर १ महिन्याने त्यांचे मला अनौपचारिक निमंत्रण आले. ते पत्र घेऊन मी डेक्कन कॉलेजचे डायरेक्टर डॉ. कत्रे यांचेकडे गेलो. ते पत्र वाचीत असताना माझ्या मनात अनेक शंकांनी ठाण मांडले होते. कौन्सिलची सभा, तिची दोन तीन महिन्यांनी केव्हातरी होणारी बैठक, या अर्जाचा विचार, मग निर्णय या जंजाळातून आपली सुटका होणे अशक्य असे वाटत होते. पण पत्र वाचून डॉ. कत्रे लगेच म्हणाले, "ठीक आहे. आमंत्रणाचा स्वीकार कर." यावर कसलीही शंका उपस्थित न करता मी पटकन उठलो. कारण पुढची सगळी चिंता डॉ. कत्र्यांची होती. डॉ. कत्र्यांच्या काम करण्याच्या पद्धतीचा मला थोडाफार अनुभव होता. न सांगताच त्यांना सर्व गोष्टी समजतात. अगदी शांतपणे एखाद्यासाठी जेवढे काही करता येईल तेवढे करण्यात ते कसलीही कुचराई करीत नाहीत. आपल्या कॉलेजातील प्राध्यापकांना परदेशाहून निमंत्रणे येतात याचा त्यांना अभिमान वाटत असावा. केवळ डेक्कन कॉलेज आणि तिचे संचालक डॉ. कत्रे यांच्यामुळे माझी लंडन-भेट योजना सुलभ आणि सफल झाली हे मला आवर्जून सांगितले पाहिजे.

पुढे मला लंडन विद्यापीठाकडून रीतसर पत्र आले. डेक्कन कॉलेज-कडून अभ्यासासाठी पगारी रजा मिळाली. आणखी एक योगायोग असा की जेव्हा कॉमनवेल्थ ऑफिसकडे मला अर्ज करावयाचा होता तेव्हा हंगामी कुलगुरु म्हणून केवळ पाचसहा दिवसांसाठी म्हणून म. म. द. वा. पोतदार यांची नियुक्ती झाली होती.

लंडन विद्यापीठाकडून पैसे मिळणार असले तरी प्रथम तिकिटासाठी ५५०० रु. आणि इतर खर्च याची तरतूद कशी करावयाची याच्या मी विवंचनेत होतो. पण माझ्या मार्गात अडचणी आणावयाच्या नाहीत असेच कदाचित विधिलिखित असावे. माझे मित्र आणि सहकारी या बाबतीत हरएक प्रकारची मदत करण्यास तयार होते. डॉ. पु. म. जोशी यांनी टाटा ट्रस्टकडून मला विनाशर्त एक हजार रुपये मिळवून दिले. माझे एक मित्र, कै. डॉ. मोरेश्वर दीक्षित, आम्ही कलकत्त्याहून परत येत असताना, माझी प्रवासाची चर्चा ऐकून, मुंबई स्टेशन येताच मला म्हणाले, "कुलकर्णी, माझे एक हजार रुपये तुम्हाला दिले म्हणून समजा. तुम्ही तुमचा अभ्यासक्रम संपवून आल्यानंतर सवडीने मला परत करा" हे औदार्य

अनपेक्षित होते. कारण डॉ. दीक्षित आणि माझे इतके घनिष्ट संबंध नव्हते. ज्ञानसंपादनासाठी जाणाऱ्या माणसाला पैशाची विवंचना असू नये असा एक तरल विचार त्यांच्या मनात चमकून गेला असावा, आणि तात्काल त्यांनी मला तो बोलून दाखविला असावा. त्यांची मदत मला घ्यावी लागली नाही. मात्र आज माझे प्रसिद्ध झालेले पुस्तक पाहण्यासाठी डॉ. दीक्षित नाहीत याची जाणीव तीव्रतेने होते.

हा सगळा विचार चालू असता, लंडन विद्यापीठाने मात्र माझे तिकीट काढून ठेवले होते ! आणि एके दिवशी एअर इंडियाचा मला अचानक फोन आला—"तुमची प्रवासाची तारीख कळवा." हे सारेच अघटित होते. सारे प्रश्न असे सुटत चालले होते.

या माझ्या कार्यासाठी सर्वांत अधिक महत्त्वाची मदत कोणाची झाली असेल तर ती प्राध्यापक बॉलहॅचेट यांची होय. त्यांनी माझ्यासाठी पैशाची तर सोय केलीच पण लंडन येथील मुक्कामी मला सर्वतोपरी साहाय्य केले. त्यांनी माझ्याकडे फक्त काही मराठी कागद निवडण्याचे व त्यांची इंग्रजीत भाषांतरे करणे आणि टीपा लिहिणे ही कामे सोपविली होते. स्कूल ऑफ ओरिएंटल आणि आफ्रिकन स्टडीज या संस्थेने रॉकफेलर फौंडेशनच्या साहाय्याने भारताच्या इतिहासास उपयुक्त अशा साधनांच्या संपादनाची चार खंडांची योजना आयोजित केली आहे. त्यापैकी चौथा खंड "The Evolution of India and Pakistan" हा १९६२ साली प्रसिद्ध झाला आहे. या मालेतील तिसरा खंड "India under the East India Company" असा असून त्याचे संपादन डॉ. बॉलहॅचेट यांचेकडे सोपविले आहे. प्रा. बॉलहॅचेट यांनी स्वतः एल्फिन्स्टन आणि पश्चिम भारत या विषयाचा अभ्यास केला असल्यामुळे त्यांना प्रस्तुत ग्रंथांत काही समकालीन मराठी कागदही असावेत असे वाटणे स्वाभाविक होते. माझी दिल्लीत गाठ पडल्यानंतर हे निमित्त पुढे करून लंडन विद्यापीठाकडून मला साहाय्य करता येईल असे त्यांना वाटले असावे, आणि प्रत्यक्षात घडलेही तसेच. आठवड्यातून फक्त १ दिवस आणि तेही १ तास मी त्यांना या कामासाठी भेटावयाचे व बाकीचा सर्व वेळ मी माझे संशोधन-कार्य करावयाचे असे ठरले. अर्थात मला तेथील इतिहास विभागाच्या कार्याचा अनुभव घ्यावयाची इच्छा असल्यामुळे काही शिकविण्याचे, विद्यार्थ्यांना पीएच्.डी. साठी मार्गदर्शन करण्याचे, निबंधवाचनाचे इत्यादि कामे-सुद्धा मी आपणहून अंगिकारली. त्यामुळे की काय मला त्यांच्या विभागीय सभांची, निरनिराळ्या संस्थांच्या खास सभांची आमंत्रणे येऊ लागली.

लंडनला जाताना आणखी एक बेत मी मनाशी योजून गेलो होतो, आणि तो म्हणजे ग्रँट डफने येथून बरीच हस्तलिखिते, कागदपत्रे नेली अशी जी आपल्याकडे समजूत आहे तिचा छडा लावायचा, आणि संधी मिळाली तर काही महत्त्वाची सामुग्री नकलून आणावयाची. लंडन येथील नॅशनल रजिस्टर ऑफ अर्काईव्हज या संस्थेमार्फत ग्रँट डफबद्दल विशेष माहिती कोठे मिळेल याच्या तपासात मी लागलो. थोडयाच दिवसांत मला ग्रँट डफची पणती श्रीमती शीला सकलोव्ह ग्रँट यांचा पत्ता मिळाला, आणि माझा त्यांच्याशी पत्रव्यवहार सुरू झाला, आणि एक दिवस आपल्या गावी 'वुडब्रिज' येथे येण्याचे त्यांनी मला निमंत्रण दिले.

श्रीमती ग्रँट या साठीच्या घरात पोहोचलेल्या उंचनिंच आणि चांगल्या तरतरीत बाई आहेत. भारताबद्दल त्यांना अपार प्रेम आहे. पंडित जवाहरलाल नेहरु, कृष्ण मेनन इत्यादि भारतीयांचा त्यांना चांगला परिचय होता. त्यांचा एक मुलगा आसाम राज्यात वैद्यकीय व्यवसायात आहे. तेव्हा आपल्या एका पूर्वजाच्या चरित्राचे धागे जुळविण्याकरिता माझ्या-सारखा भारतीय पाहून त्यांना माहेरचा माणूस भेटल्याचा आनंद होणे स्वाभाविक होते.

श्रीमती ग्रँट यांना वृत्तपत्रव्यवसायाचा चांगलाच अनुभव आहे. ग्रँट डफचा मुलगा माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन ग्रँट हा या बाईंचा आजोबा. त्याच्यासंबंधीचे अनेक कागद त्यांच्या संग्रही असल्यामुळे त्याचे चरित्र लिहावे असे त्यांना वाटत होते. इंडिया ऑफिसमधून आपल्या आजोबाची माहिती गोळा करीत असताना त्यांना अनेक वेळा ग्रँट डफची माहिती करून घ्यावी लागली. विशेषतः १८२३ साली ग्रँट मायदेशी परत गेल्यानंतर त्याने आपले उर्वरित आयुष्य कसे घालविले, पिता–पुत्रांचे संबंध कसे होते यासंबंधीची टाचणे करीत असताना त्यांना आपल्या पणजोबाविषयीच अधिक आदर वाटू लागला, आणि क्षणभर आजोबाचे चरित्र बाजूला सारून त्या पणजोबाच्या चरित्राचे धागे जुळविण्यात गुंग झाल्या. केवळ याच कारणामुळे त्यांच्या माझ्यात जवळीक निर्माण झाली, आणि त्यांनी मला मनापासून सर्व काही साहाय्य केले. ग्रँट डफ, त्याची रूपवती पत्नी कॅथेरिन आणि तिच्या मातुश्री यांची तैलचित्रे मला तेथे पाहावयास मिळाली, आवश्यक त्या चित्रांच्या प्रतिकृतीही मला करून मिळाल्या. माऊंटस्टुअर्टने आपले आत्मचरित्र लिहावयास घेतले होते, ते अपुरेच राहिले होते. त्याची सुरवातीची हस्तलिखित पाने नकलून घेण्याची परवानगी बाईंनी मला दिली.

ग्रँट डफवर इंडिया ऑफिसमधून गोळा केलेल्या माहितीबर आधारित असा एक निबंध तयार करून मी तो स्कूल ऑफ ओरिएंटल अँड आफ्रिकन स्टडीजच्या विद्यमाने एका सभेत वाचला. त्या निबंधाची एक प्रत मी श्रीमती ग्रँट बाईंना पाठविली. बाईंनी प्रस्तुत संदर्भात मला जे पत्र धाडले त्यातील काही भाग येथे उद्धृत करीत आहे.

Woodbridge,
4, Nov. 1968.

Dear Dr. Kulkarni,

Thank you so much for your letter of 16th Oct. and for the paper on James Grant Duff's writing of his History of the Mahrattas. I found it very interesting. I admired the meticulous schorlarship displayed. Thank you, too, for all the nice things you say about my great grand father. It is a great momemt when history and historians especially suddenly become free of emotional and political bias and can write what they believe to be true 'without fear or favour'. Indian historians certainly seem to be very advanced in this, and you yourself are obviously doing very important and valuable work.

माझ्या निबंधामध्ये ग्रँटच्या कार्याचे वस्तुनिष्ठपणे मूल्यमापन केले होते, त्याची ही पावती होती. बाईंनी मला माझ्या कामी जी मदत केली त्याबद्दल मी त्यांचा शतशः ऋणी आहे.

लंडनहून परत आल्यानंतर १९६८ च्या ऑक्टोबरमध्ये कै. दत्तोपंत आपटे स्मारक मंडळातर्फे ग्रँट डफबद्दलचे माझे विचार साररूपाने मांडण्याची संधी श्री दि. वि. काळे आणि प्रा. रा. वि. ओतुरकर यांनी मला दिली, त्याबद्दल मला त्यांचे आभार मानले पाहिजेत. त्या व्याख्यानामुळे माझा आत्मविश्वास वाढला आणि सहा व्याख्यानांची एक विस्तृत योजना मी पुणे विद्यापीठातर्फे प्रतिवर्षी होणाऱ्या केळकर व्याख्यानमालेसाठी विचारार्थ पाठविली. पुणे विद्यापीठाने माझी योजना मान्य केली, आणि

१९६९ मध्ये माझी व्याख्याने झाली व तीच आता पुस्तकरूपाने आपल्यापुढे ठेवण्याचा योग आला आहे. कै. हरीभाऊ पाटसकर, डॉ. पु. म. जोशी आणि म. म. दत्तो वामन पोतदार यांनी अध्यक्षस्थान स्वीकारून माझ्या व्याख्यानांना एकप्रकारचा भारदस्तपणा प्राप्त करून दिला. शेवटच्या दिवशी तर श्री. विठ्ठलराव घाटे यांनी श्रोत्यांतर्फे उत्स्फूर्तपणे माझे आभार मानून मला अक्षरशः लाजविले. प्रा. वाडेकर, प्रा. ओतुरकर, श्री. दिनकरराव काळे, प्रा. ग. ह. खरे, श्री. बाबासाहेब घोरपडे, श्री. ढवळे इत्यादि मंडळी नित्य हजर राहून मला उत्तेजन देत व कौतुक करीत. या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहे. कुलसचिव श्री. वसंतराव गोळे, उपकुलसचिव श्री. सरदेशपांडे आणि या व्याख्यानांचे संचालक माझे जुने मित्र आणि एकेकाळचे सहकारी श्री गो. म. वाटवे यांनी प्रारंभापासून हे पुस्तक प्रकाशित होईपर्यंत दिलेल्या सहकार्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

आणखी एका योगायोगाचा प्रस्तुत संदर्भात मला आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. १८६८ साली डेक्कन कॉलेजातील एक विद्यार्थी श्री. नी. ज. कीर्तने यांनी ग्रँट डफवरील आपला निबंध वाचला, आणि तेव्हापासून डफच्या मराठ्यांच्या इतिहासावर टीका-प्रहार होण्यास प्रारंभ झाला. इतिहासाचार्य राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे यांनी आपल्यापरीने डफच्या इतिहासातील दोष दाखविले, आणि त्याचा इतिहास जुनापुराणा ठरवून त्याज्य मानला. १९६८ साली, म्हणजे कीर्तन्यांच्या टीकेनंतर शंभर वर्षांनी डेक्कन कॉलेजतर्फेच मला ग्रँट डफचा अभ्यास करण्यास लंडनला जाण्याची परवानगी मिळाली आणि त्याच वर्षी ऑक्टोबरमध्ये, भारत इतिहास संशोधक मंडळात ग्रँट डफवर मी व्याख्यान देऊन बरीच नवी माहिती उपलब्ध करून दिली. ग्रँटवर टीका करीत असताना त्याने ज्या परिस्थितीत हा इतिहास लिहिला याचाही विचार होणे आवश्यक आहे असा सिद्धान्त मांडून मी त्याच्या मराठ्यांच्या इतिहासाची घडण कशी झाली याचे साधार विवेचन केले. या विवेचनातून ग्रँट डफची वेगळी प्रतिमा आकार घेऊ लागली. इतिहास हा असाच फिरून फिरून तपासून पाहावा लागतो. त्यामुळेच एखाद्या व्यक्तीवर अन्याय झाला असेल तर त्याचे परिमार्जन करण्याची संधी मिळते.

या पुस्तकात कांही दुर्मिळ चित्रे घातली आहेत. ग्रँट डफ, त्याची पत्नी कॅथेरिन यांची चित्रे श्रीमती ग्रँट यांनी इंडिया ऑफिसमार्फत उपलब्ध करून दिली. पुढे साताऱ्याच्या पारसनीस संग्रहातील ग्रँट डफचे चित्र हे अस्सल आहे याची खात्री करून घेऊन, श्री. अमृतराव पारसनीस

यांच्या संमतीने त्याची प्रतिकृती मिळविली. इतिहासलेखनाचे बहुतेक सर्व काम ग्रँटने साताऱ्यात असतानाच पूर्ण केले होते. त्याने ज्या घरी बसून इतिहास लिहिला त्याचा शोध केला, आणि त्याच्या निवासस्थानाचे छायाचित्र घेतले. ग्रँट डफ आणि त्याचे घर ही छायाचित्रे मला माझे मित्र मुंबईच्या पुरातत्त्व आणि पुराभिलेख खात्याचे प्रमुख श्री. विठ्ठलराव खोबरेकर यांनी मिळवून दिली. एल्‌फिन्स्टनचे चित्र हे पुणे विद्यापीठातील आहे. मुखपृष्ठावरील मोडी पत्राचा ठसा आणि साताऱ्याचे महाराज प्रतापसिंह यांच्या चित्राचा ठसा भारत इतिहास संशोधक मंडळाचे सचिव प्रा. ग. ह. खरे यांनी उपलब्ध करून दिले. ग्रँट डफचे हस्ताक्षर मी लंडनहून आणले. या सर्व छायाचित्रांचे, कागदांचे उत्कृष्ट ठसे श्री. खाजगीवाले यांनी केले. या पुस्तकाची सुबक छपाई अगदी द्रुतगतीने प्रेस मॅनेजर श्री. परांजपे आणि त्यांचे सहकारी यांनी करून दिली. या सर्वांचा मी आभारी आहे.

मला गुरुस्थानी असलेले माझे सहकारी आणि ज्येष्ठ मित्र डॉ. पु. म. जोशी यांनी अगदी अल्पावधीत प्रस्तावना लिहून दिली. पुणे विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. बा. पां. आपटे यांनी प्रकाशनाच्या कामी हरप्रकारचे साहाय्य केले. पुस्तकाची सूची करण्याच्या कामी पत्नी सौ. विजया कुलकर्णी, श्री. कंटक व मधु कुलकर्णी यांनी मदत केली. इंडिया ऑफिस लायब्ररी, लंडन येथील कर्मचाऱ्यांनी मला माझ्या संशोधनकार्यात हरप्रकारे साहाय्य केले. या सर्व मित्रमंडळींचे हातभार या ग्रंथनिर्मितीच्या कामी लागले आहेत. त्या सर्वांचा मी सदैव ऋणी आहे.

पुणे<br>
१ जानेवारी, १९७१

**अ. रा. कुलकर्णी**

# प्रस्तावनेच्या निमित्ताने

प्रो. कुळकर्णी यांचा ग्रँट डफवरील प्रबंध त्यांच्या गाढ अभ्यासाची साक्षच आहे. प्रस्तावना-लेखकाचा ग्रँट डफविषयीचा अभ्यास अधूनमधून जरूर पडेल तेव्हा त्याच्या मराठ्यांच्या इतिहासाचा संदर्भग्रंथ म्हणून वापरण्यापुरताच आहे. पण असा वापर करीत असतानाच सर्व ग्रंथही अनेकदा वाचून झाला व या उपक्रमात मराठ्यांच्या इतिहासाविषयी व मराठ्यांविषयी लोभाने भारून जाऊनच ग्रँटने स्वतःस कार्यप्रवृत्त करून घेतले ही खात्री पटली. म्हणून जेव्हा प्रो. कुळकर्णी लिहितात की, ग्रँट डफच्या "मराठ्यांच्या इतिहासातील व्यक्तींचे...अचूक स्वभावचित्रण पाहिले म्हणजे मराठ्यांबद्दल त्याच्या मनात आकस होता, द्वेष होता असे वाटत नाही. मराठ्यांच्या इतिहासाशी तो इतका समरस झाला होता की प्रसंगी तो स्वतःच चरित्रनायक बनतो..." तेव्हा प्रस्तावना-लेखक "साधु, साधु" असे म्हणत त्यांच्याशी सहमत होतो. मराठ्यांच्या इतिहासाविषयी आंच असल्याशिवाय काही ग्रँटने हे काम हाती घेतले नाही. पहिली आवृत्ती १८२६ साली प्रसिद्ध झाली व या कामी ग्रँट डफला १७०० पौंडाची पदरमोड करावी लागली हे प्रो. कुळकर्णी यांनी सांगितलेच आहे. त्याला रॉयल्टी मिळाली की नाही, मिळाली असल्यास किती मिळाली, हे समजण्यास मार्ग नाही. बहुशः मिळाली नसावीच. पण एक स्कॉटस्मन मराठ्यांचा इतिहास परिश्रमपूर्वक व तब्येतीशी झगडत लिहितो व आपण होऊन प्रसिद्ध करतो व या कामात स्वतःच्या पदराला खार लावून घेतो ही गोष्ट भारतीयांनी व विशेषतः मराठ्यांनी नीट समजून घेतली पाहिजे. आत्मीयतेशिवाय असे काम होणे नाही.

या आत्मीयतेच्या मागे कोणती प्रेरणा होती ? ग्रँट डफ हा स्कॉटिश, स्कॉटलंडचा रहिवासी होता[1] आणि पुणे-सातारा हा परिसर बराचसा स्कॉटलंडसारखा आहे. दऱ्या, खोरी, जंगले, उंच उंच डोंगर व त्यावरील डोंगरी किल्ले हे त्याला त्याच्या मायभूमीची आठवण करून देत असले पाहिजेत. या पुणे-सातारा परिसराचे हवामान स्कॉटलंडसारखे नाही, पण ते समशीतोष्ण आणि सुखद आहे. तेव्हा अशा या भूभागाची

---

१. एल्फिन्स्टन हाही ग्रँटसारखा स्कॉटसमनच.

ओढ हेही एक कारण या आत्मीयतेच्या मागे असणे शक्य आहे. स्कॉटलंडचा शूर व लढवय्या पुरुष रॉबर्ट ब्रूस व मराठावीर शिवाजी यांच्यातही साम्य आहे. तेही ग्रँटच्या नजरेपुढे असावे. एल्फिन्स्टनने पेशव्यांचे राज्य खालसा केल्यानंतर त्याने एक वर्षातच एक फार उद्‌बोधक अहवाल गव्हर्नरजनरलला सादर केला व १८२१ साली हा अहवाल पुस्तक रूपाने प्रसिद्धही झाला. पेशव्यांकडून घेतलेल्या नव्या मुलुखाच्या राज्यकारभारांची घडी नीट लावण्याकरिता त्याने चार सहकाऱ्यांची कलेक्टर म्हणून नेमणूक केली. खुद्द पुण्यात रॉबर्टसन, अहमदनगरला पॉटिंजर, खानदेशमध्ये ब्रिग्ज आणि धारवाडला थॅकरे.[२] पेशव्यांच्या अंमलाखालील मुलूख जरी खालसा केला तरी मराठ्यांचे छत्रपती सातारचे महाराज यांना बाजीरावाच्या जरबेतून मुक्त करून साताऱ्याला परत स्थानापन्न केले. ब्रिटिश राजनीतीचा खालसा महाराष्ट्रातील हा पहिला पवित्रा. या सातारच्या दरबारी ग्रँटची पोलिटिकल एजंट म्हणून नेमणूक झाली. ग्रँट हा एल्फिन्स्टनच्या खास मर्जीतला. त्याला त्याने अनेक कानमंत्र देऊन पाठविले होते. आणि एल्फिन्स्टनने जेव्हा आपल्या अहवालाची मांडणी करण्यास सुरवात केली तेव्हा त्याने हे चार कलेक्टर व साताऱ्याचा पोलिटिकल एजंट यांच्याकडे एक विस्तृत प्रश्नमालिका पाठविली. या प्रश्नमालिकेचा अभ्यास करून समर्पक उत्तरे तयार करणे हे एक मोठेच अभ्यासाचे काम होते.[३] अर्थातच हा अभ्यास करताना ग्रँटला मराठ्यांचा इतिहास, त्यांची राज्यपद्धती, ग्रामसंस्था, इत्यादि विषयांचा अभ्यास तातडीने करावाच लागला. आणि असा अभ्यास करीत असतानाच मराठ्यांच्या विस्तृत इतिहासाची पार्श्वभूमी त्याच्या मनात तयार झाली असे विधान केल्यास वावगे होणार नाही. हा इतिहास लिहिण्याचे त्याने मनावर घेतले तेव्हा त्याला एल्फिन्स्टनने सर्व तऱ्हेने प्रोत्साहन देऊन त्याच्याकडून कार्यसिद्धी करून घेतली. ब्रिग्जकडूनही तो अनेक गोष्टींचा खुलासा करून घेत असे. प्रो. कुळकर्णी यांनी ही सर्व हकीकत विगतवार व समर्पक दिलेली आहे. ग्रँटप्रमाणे ब्रिग्जही आपल्या स्वीकृत कार्यात मग्न होता. विलायतेहून हिंदुस्थानात नवीन येणाऱ्या तरुण अधिकाऱ्यास पत्रे (ही याच सुमारास म्हणजे १८२१ च्या आसपास पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली) ब्रिग्ज लिहीत होता व त्याचे महनीय कार्य म्हणजे फेरिस्ताचा इतिहास याची संहिता अनेक

---

२. याचा हुद्दा असिस्टंट कलेक्टर असा होता.

३. ही प्रश्नमालिका व उत्तरे कंपनीच्या चौथ्या रिपोर्टमध्ये प्रसिद्ध झालेली आहेत.

फार्सी हस्तलिखिते जमवून त्यांचा तौलनिक अभ्यास करून छापण्याकरिता तयार करीत होता. एका मौलवीच्या मदतीने तयार केलेला हा महत्त्वाचा ग्रंथ मुंबई सरकारने १८३१ मध्ये दोन भागांत प्रसिद्ध केला. ब्रिग्जने जमविलेली ही फार्सी हस्तलिखिते कदाचित सरकारी दप्तरखान्यात सापडतील अशा भाबडया आशेने प्रस्तुत लेखकाने १९४७–४८ च्या सुमारास बरीच खोज केली व अनेक फायली चाळल्या तेव्हा त्याला असे आढळून आले की मुंबई सरकारच्या ओरिएंटल ऑफिसमधील कागदपत्रे ७०–८० वर्षांपूर्वीच काढून टाकण्यात आली होती ! मोगल आले ते वक्तीच कागद गुम झाले असे नसून इंग्रजबहादुराच्या राज्यातही अशा घटना घडत असत ! !

ग्रँटच्या अभ्यासामागे एक फार मोठी सांघिक प्रेरणा होती. ही पाश्चात्यांच्या चौकसबुद्धीतून म्हणजे त्यांच्यात उपजतच असलेल्या Spirit of Enquiry मधूनच उत्पन्न झाली होती. या प्रेरणेचा मागोवा पाश्चात्य संस्कृतीचे मूळ जी ग्रीक संस्कृती तिचे विचारवंत सॉक्रेटीस, प्लेटो, अरिस्टॉटलपर्यंत जातोच पण त्यांच्याही आधी होऊन गेलेल्या हेरोडोटस-पर्यंतही जातो असे म्हणता येईल. या चौकस वृत्तीचा परिपाक म्हणजेच मेगॅस्थेनिसपासून आजपर्यंत पाश्चात्यांनी भारतीय इतिहास व संस्कृती यांच्या विविध पैलूंचा केलेला अभ्यास. या अभ्यासाचा इतिहास लिहावयाचा तर तोच एक माहितीपूर्ण व बोधप्रद असा ग्रंथ होईल. पण फिरंगी एकंदर हुन्नरी खरा. मसाल्याच्या शोधार्थ कोलंबस हिंदुस्थानास येण्यास म्हणून निघाला व त्याने अमेरिकेचा शोध लावला. अमेरिकन इंडियन्स किंवा रेड इंडियन्स या नावाचा उगम याच घटनेत सापडतो. मग आला वास्को-ड-गामा १४९८ साली कालिकत बंदरात आणि इसवी सनाच्या सोळाव्या शतकात पोर्तुगेजांनी आपले पाय भारतात जे भक्कम रोवले ते १९६१ पर्यंत. या काळात त्यांनी भारतविषयक अनेकविध ग्रंथ लिहिले व अजूनही लिहितात. या पोर्तुगेजांपैकी एक विद्वान डॉ. गार्सिया द ऑर्ता हा तर अहमदनगरच्या बुऱ्हान निझामशाह पहिला (१५०९–१५५३) याचा परममित्र व मुंबई बेटाचा मालक. आपल्या बंगल्याभोवती[४] त्याने अनेक औषधी वनस्पती, फुलझाडे व फळझाडे यांची काळजीपूर्वक जोपासना करून त्यांचा शास्त्रीय अभ्यासही केला होता. तो अहमदनगरला दोनचारदा तरी गेला होता व घाटावरील प्रदेशांत त्याने थोडाफार संचारही केलेला होता.

४. हा बंगला हल्लीच्या टाऊन हॉलच्या मागे बॉम्बे कॅसलचा जो परिसर आहे त्यात होता.

डोळसपणाने त्याने अनेकविध माहिती मिळविली व भारताच्या औषधी वनस्पतींवर एक पुस्तक तयार केले. हा एक कौतुकास्पद ग्रंथ आहे. या ग्रंथाचे नाव Coloqiós dos simples e drogas he cousas medicinais da India Compostos pello Doutor Garcia da Orta असे आहे. हा ग्रंथ एप्रिल १५६३ मध्ये गोव्यास छापून प्रसिद्ध झाला. हिंदुस्थानात छापले गेलेले हे तिसरे पुस्तक. पहिली दोन पुस्तकेही गोव्यातच छापली गेली. गार्सिया द ऑर्ताच्या ग्रंथाचे इंग्रजी अवतरण १९१३ साली प्रसिद्ध झाले; ही आवृत्ती फक्त २५० प्रतींची होती.

सोळाव्या शतकात गोव्यात स्थायीक झालेल्या दोन युरोपियन विद्वानांचा उल्लेख करण्यासारखा आहे. पहिला होता इंग्रज, त्याचे नाव थॉमस स्टीफन्स व दुसरा वलंदेज म्हणजे डच लिन्शहोटेन नावाचा. या लिन्शहोटेनने तर कमालच केली. त्याच्या देशाचे व स्पेन-पोर्च्युगालचे[५] संबंध स्नेहाचे नव्हतेच. उलट नेदरलँडस् हा स्पॅनिश वर्चस्वाखालील देश स्पेनविरुद्ध बंडाळी करून उठलेला होता. पण अशाही परिस्थितीत या पठ्ठ्याने गोव्याला निघालेल्या आर्चबिशपच्या परिवारात प्रवेश मिळविला व तो गोव्यास आला. पाच वर्षे तो गोव्यात राहिला व या काळात आर्चबिशपची मर्जी संभाळून व सेवा करून याने दुसरा एक प्रचंड उद्योग केला. तो कोणता तर भारतविषयक आर्थिक, व्यापारी, राजकीय व मिळेल त्या विषयावरील माहिती गोळा करण्याचा. १५९९ च्या सुमारास हा परत मायदेशी गेला व तयार केलेल्या ग्रंथाची माहिती त्याने त्याच्या सरकारला देऊन तो छापून प्रसिद्ध करण्याची परवानगी मिळविली. याच सुमारास डच ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झालेली होती. या कंपनीच्या लोकांना तर लिन्शहोटेनचा ग्रंथ छापून होईपर्यंतही धीर निघाला नाही. त्याची गॅली प्रुफेच आपल्या बरोबर घेऊन ते निघाले. लिन्शहोटेनचे कार्य म्हणजे आर्थिक हेरगिरीचा एक उत्तम नमुना आहे. डच व इंग्रज म्हणजे दोन्हीही दुकानदारांचेच देश. मसाल्याच्या व्यापारांत पोर्तुगेजांना ५०० ते ६०० टक्के फायदा मिळतो हे पाहून तर या दोन्ही देशांच्या लोकांच्या तोंडाला पाणीच सुटले. थॉमस स्टीफन्सने लिन्शहोटेन सारखी हेरगिरी केली नाही, कारण तो स्वतः जेसुइट होता. पण गोव्यात आल्यानंतर त्याने आपल्या वडिलांना लिहिलेल्या एकदोन पत्रांत त्याने गोव्याची भरभराट व व्यापारी परिस्थिती

---

५. १५८०–१६४० या कालखंडांत स्पेन व पोर्च्युगालचे एकच राज्य स्पॅनिश हॅप्सबर्ग घराण्याचे होते.

यांचे असे रसभरित वर्णन केले होते की त्यामुळे इंग्लंडमध्येही ईस्ट इंडिया कंपनीच्या कार्यास गती मिळण्यास हातभारच लागला. हाच ख्रिस्त-पुराणाचा कर्ता, मराठी भाषेचा प्रेमी व अभिमानी फादर स्टीफन्स.

इंग्लिश ईस्ट इंडिया कंपनी स्थापन होऊन तिने सुरतेस वखार उघडण्याची परवानगी जहांगीर बादशहाकडून मिळविली. कंपनीच्या नोकरानी हिंदुस्थानातून कंपनीच्या चालकांना लिहिलेली पत्रे म्हणजे हिंदुस्थानाबद्दलचा माहितीकोशच. Letters Received, Court Minutes, English factories in India व अशाच दुसऱ्या ग्रंथमालांमधून ही सामग्री प्रसिद्ध केली गेली आहे. पोर्तुगेजांची व डच ईस्ट इंडिया कंपनीची पण अनेक कागदपत्रे ग्रंथप्रविष्ट झालेली आहेत. पण इंग्रजी साधनांचा जसा मुक्त उपयोग आपणास करता येतो तसा या पोर्तुगेज व डच सामग्रीचा करता येत नाही ही खेदाची गोष्ट आहे. या सर्व सामग्रीचा उपयोग सोळाव्या व नंतरच्या शतकांमधील हिंदुस्थानच्या आर्थिक इतिहासाकरिता अगदी अव्वल दर्जाची साधने म्हणून होत आहे. राजकीय व सामाजिक बाबीतही ही साधने उपयोगाची आहेत. याशिवाय सर थॉमस रो व टेरी यांची प्रवासवृत्ते व कंपनीचे अनेक फॅक्टर्स यांनीही आपल्या रोजनिशा, प्रवासवृत्त व हकीकती लिहून ठेवलेल्या आहेत, त्यांमधून लंडनमध्ये कंपनीच्या चालकांना इत्थंभूत माहिती मिळत असे. अनेक ऐतिहासिक घटनांची या इंग्लिश व इतर कागदपत्रांतून नोंद केलेली आढळते. Foreign Biographies of Shivaji, English Records on Shivaji हे पुण्य-पत्तनस्थ विद्वानांनी प्रसिद्ध केलेले ग्रंथ या कागदपत्रातील माहितीवरच सजवले आहेत. युरोपियनांच्या उद्योगाची अशी किती माहिती सांगावी? पंधराव्या ते सतराव्या शतकाच्या अखेरपर्यंतच्या काळात आज उपलब्ध असलेले प्रसिद्ध झालेले प्रवासवृत्तान्तच मुळी तीनशेच्या वर आहेत. अनेक अजूनही इंग्लंड, फ्रान्स, पोर्तुगाल, हॉलंड, इटली, टर्की, रशिया, ईजिप्त या देशांतील दप्तरखान्यांत पडून आहेत.

हळूहळू इंग्लिश ईस्ट इंडिया कंपनीने हिंदुस्थानात हातपाय पसरण्यास सुरवात केली व अठराव्या शतकात प्लासीच्या लढाईनंतर तिने बंगाल-बिहारची दिवाणी खिशात घातली. इतके झाले तरी हिंदुस्थानातल्या

राज्यकर्त्यांनी हे टोपीकर कोण, कोठून आले, त्यांची संस्कृती व सभ्यता कशा तऱ्हेची आहे या गोष्टीबद्दल फारसे औत्सुक्य दाखविलेले ऐकिवात नाही. आता कंपनीचा कायापालट होत होता. तिचे व्यापारी स्वरूप बदलून तिने हिंदुस्थानच्या राजकारणात मुसलप्रवेशच केला होता म्हणाना. नुसतीच व्यापारी व आर्थिक बाबीची माहिती गोळा करण्याचे कमी करून इंग्रज हिंदुस्थानच्या प्रांतोप्रांतीच्या राजकारणात भाग घेऊ लागला होता. इंग्रज महाधूर्त, हिंदुस्थानांतील विस्कळीत होऊ पाहात असलेली राजकीय घडी आपणच नीट बसवू शकू व बसवणार या महत्त्वाकांक्षेने तो प्रेरित झाला होता. आणि आपल्या या नव्या अवताराचा पुरस्कार कर्तबगारीने करावयाचा तर हिंदुस्थानचा इतिहास व संस्कृती यांचा अभ्यास समर्पक-रीतीने केला पाहिजे ही मनोमन खात्री त्याने मनात बाळगली. आणि आपण हे मान्य केले पाहिजे की हे काम कंपनीच्या अधिकाऱ्यांनी फार प्रेमपूर्वक व कसोशीने केले. अठराव्या शतकाच्या अखेरीस कलकत्ता येथे एशियाटिक सोसायटी स्थापन करून Asiatic Researches हे मुखपत्र प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. या मुखपत्रातील विद्वत्ताप्रचुर निबंध आजही अव्वल साधने म्हणून वापरतात. सर विल्यम जोन्स हा या सर्व सांस्कृतिक खटाटोपाचा जनक. फार्सी, संस्कृत व इतर भाषांवर त्याने प्रभुत्व मिळविले व आपल्या विद्वत्ताप्रचुर निबंधांतून व ग्रंथातून भारताचे विविध दर्शन आपल्या देशबांधवांस त्याने करून दिले. १८०७ साली त्याचे हे सर्व लेखन इंग्लंडमध्ये तेरा खंडांत प्रसिद्ध झाले. होरेस हेमन विल्सन, ग्लॅडविन्, हॉलहेड, कोलब्रुक, प्रिन्सेप, अर्स्किन, जॉन लेडन, वानगीखातरच दिलेली ही नावे व इतर कंपनीचे मुलकी व सैन्यातील अधिकारी यांनी आपापल्या परीने अनेक विषयांचा अभ्यास करून ग्रंथ लिहिले. भारताचा इतिहास, पुरातत्त्व, संस्कृत, फार्सी, तामीळ, तेलगू, बंगाली, हिंदुस्थानी, मराठी इत्यादि भाषा, स्थापत्यशास्त्र, वनस्पतिशास्त्र व जंगले, वैद्यकशास्त्र, कायदा, धर्मशास्त्रे व तत्त्वज्ञान अशा सर्व विषयांवर त्यांनी विपुल लिखाण केले व हिंदुस्थानच्या मरगळलेल्या अस्मितेला खतपाणी घालून तिची जोपासना केली. त्यांचे हे थोर कार्य आजच्या हिंदवासीयांनी विसरून चालणार नाही, त्यांचे आपण ऋणीच राहू. वराहमिहिराने बृहत्संहितेत गर्गमुनींचे एक वचन उद्धृत केले आहे.

म्लेंच्छा हि यवनास्तेषु सम्यंक् शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते किं पुनर्दैवविद् द्विजः ।।

भारतीय संस्कृतीच्या अंगोपांगांचे अभ्यासपूर्वक दर्शन घडविणारे हे आजच्या भारतीय विद्वानांचे पूर्वसूरी खचितच या श्लोकात सांगितल्याप्रमाणे ऋषिवतच मानले पाहिजेत.

एल्फिन्स्टनचा सहकारी जेम्स ग्रँट हा असाच एक म्लेंच्छ यवन स्वतःला मराठा म्हणवून घेणारा. त्याचा व त्याच्या सहकाऱ्यांचा व समकालीनांचा बौद्धिक वारसा हा असा वर दर्शविल्याप्रमाणे थोर दर्जाचा होता. या वारश्याचा परिपाक म्हणजे त्यांनी उत्कटतेने व आपुलकीने केलेले कार्य जणू काही आपापसात वाटून घेतले आहे. अशा प्रेरणेने त्यांनी हे काम केले. विल्क्सने म्हैसूर व लगतच्या प्रदेशाचा सांगोपांग अभ्यास केला, टॉडने रजपुतांचा, स्टुअर्टने बंगालचा, मालकमने माळव्याचा, कनिंगहॅमने शिखांचा, ब्रिग्जने मुसलमानी रियासतींचा व ग्रँटने मराठ्यांचा अभ्यास करून आपापले ग्रंथ एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पावक्यात व त्या लगतच्या काळात प्रसिद्ध केले. त्यांचा नीट अभ्यास केल्याशिवाय आजचा संशोधक पुढे पाऊल टाकणार नाही. ग्रँट डफविषयी असा अभ्यास व त्याच्या कार्याचे आणि त्याच्या ग्रंथाचे मूल्यमापन व रसग्रहण प्रो. कुळकर्णी यांनी या प्रस्तुत प्रबंधात केले आहे. हा प्रबंध त्यांनी अकरा प्रकरणात विभागला आहे. त्याची जीवनगाथा, एल्फिन्स्टनपाशी केलेली उमेदवारी, साताऱ्याची त्याची कारकीर्द, मराठ्यांच्या इतिहासाचा सांगोपांग अभ्यास करून आपला ग्रंथ प्रसिद्ध करण्याची त्याची जिद्द, या इतिहासावर महाराष्ट्रात व इतर ठिकाणी झालेले रसग्रहण व परीक्षण हे सर्व तपशील प्रोफेसर कुळकर्णी यांच्या या ग्रंथात सापडतील. कीर्तन्यांनी ग्रँट डफच्या ग्रंथावर कॉलेज विद्यार्थी असताना केलेली टीका व पुढे त्यांचे विचार परिणत झाल्यानंतर त्यांनी या टीकेचे केलेले परिमार्जन व ग्रँट डफवर आपण थोडासा अन्यायच पहिल्या निबंधात केला ही प्रांजल कबूली, राजवाडे, खरे शास्त्री यांनी केलेले डफच्या ग्रंथाचे मूल्यमापन या हकीकती सांगितल्या आहेत. आणि हा सर्व ग्रंथ पुणे, मुंबई, लंडन (इंडिया ऑफिस) येथील मूळ सामग्री पाहून. शिवाय ग्रँट डफच्या घराण्यातील कागदपत्रेही त्यांना अभ्यासावयास मिळाली, त्यांचाही त्यांनी यथायोग्य उपयोग करून घेतला आहे.

ग्रँट डफच्या हयातीत त्याच्या ग्रंथाची दुसरी आवृत्ती छापण्याचा योग आला नाही. कदाचित ब्रिटिशांना मराठ्यांचा इतिहास डोळ्यापुढे विशेष नको होता असेच वाटते व या ग्रंथाच्या बाबतीत कंपनीची एकंदर चालचलणूक पाहिली म्हणजे या समजुतीस दुजोराच मिळतो. शिवाय ग्रँट मायदेशी परतल्यानंतर कंपनीने कांही काळानंतर छत्रपतीची छळणूक करण्यास सुरवात केली व त्याला पदच्युत करण्याचे डाव रचले. अशा परिस्थितीत दुसरी आवृत्ती काढणे ग्रँट डफला उचित वाटले नसावे. या ग्रंथाच्या २ ते ६ या आवृत्त्या ग्रँट डफच्या मृत्यूनंतरच आणि हिंदुस्थानांत प्रसिद्ध झाल्या. म्हणजे विलायतेत या ग्रंथाची फारशी चहा झाली नाही तरी हिंदुस्थानात मात्र त्याला बऱ्यापैकी मागणी होती. या आवृत्त्यांचा इतिहास प्रो. कुळकर्णी यांनी दहाव्या प्रकरणात दिला आहे. दुसरी म्हणजे १८६३ ची आवृत्ती प्रोफेसरसाहेबांच्या पाहण्यात नव्हती त्यामुळे त्यांनी तिचा मोघम उल्लेख केलेला आहे. ही तीन जिल्दी आवृत्ती मुंबईत १८६३ साली Exchange Press, Fort या छापखान्यात छापली. मुंबई सेक्रेटरियट रेकार्ड ऑफिसमध्ये हा दुसऱ्या आवृत्तीचा ग्रंथ पाहावयास मिळतो. केपनने केलेला मराठी तर्जुमा पण महाराष्ट्रात बरीच मान्यता पावला. या मराठी अनुवादाचाही परामर्श प्रो. कुळकर्णी यांनी घेतला आहे. आज एडवर्डसची सहावी आवृत्ती पण दुर्मिळ आहे. सातवी आवृत्ती प्रो. कुळकर्णी यांनी तयार केली असती तर ते योग्यच ठरले असते. पण नुकताच दिल्लीहून एका कल्पक प्रकाशकाने हा आज दुष्प्राप्य असलेला ग्रँट डफचा इतिहास प्रसिद्ध केला आहे.

ब्रिटिशांनी त्यांच्या हिंदुस्थानातील वर्चस्वाच्या काळात आपल्यावर जुलूम केला, अन्याय केला, हे कबूल. पण त्यांनी आपल्याला चांगल्या गोष्टी शिकविल्या हे मान्य केलेच पाहिजे. भारताभिमान, राष्ट्राभिमान, देशप्रेम, राष्ट्रीयत्वाची कल्पना आपल्यामध्ये ब्रिटिश अंमदानीतच उदयास आली. तेव्हा आता आपण "वाहिली ती गंगा राहिले ते तीर्थ" या उक्तीनुसार हिंदुस्थानातील ब्रिटिश रियासतीकडे पाहिले पाहिजे. प्रो. कुळकर्णी यांनी या अशा निकोप दृष्टिकोनातूनच हे पुस्तक सजविले आहे व एक चांगला पायंडा पुढील अभ्यासकांना घालून दिला आहे. प्रो. कुळकर्णी

वाचकाला ग्रँट डफच्या व्यक्तिमत्त्वाच्या पैलूंची माहिती याच दृष्टीने करून देत आहेत. न्याय कसा करावा हे त्याने छत्रपती प्रतापसिंहास त्याच्या जवळ बसवून शिकविले. दैनंदिन राज्यकारभार कसा चालवावा याच्या संथा त्याने छत्रपतीस दिल्या. राज्यकर्त्यांने जनतेकडे पाहण्याचा दृष्टिकोन काय व कसा ठेवावा, सारापद्धतीत कशा सुधारणा कराव्यात अशा सर्व राज्योपयोगी गोष्टी त्याने छत्रपतीस अंमलात आणण्यास शिकविले. इतकेच काय पण प्रतापसिंह महाराजास रोजनिशी ठेवण्याची पद्धत कशी हितकर आहे हे पटवून दिले. आज पेशवे दप्तरात या रोजनिशीचे २० भाग आहेत, त्यांच्यापैकी फारच थोडा मजकूर Selections from Peshwa Daftar या ग्रंथमालिकेतील एका भागात प्रसिद्ध झाला आहे. खानेसुमारी म्हणजे काय, तिचे यंत्र व तंत्र सातारा राज्याची खानेसुमारी १८२१ साली करवून त्याने छत्रपतीस राज्यशासनाच्या या एका अंगाचे महत्त्व पटवून दिले. एवंच, एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या अर्धात ब्रिटिश साम्राज्यकर्ते जे एक उदारमतवादी धोरण घेऊन येत असत त्याचा उत्कृष्ट परिपाक ग्रँटच्या साताऱ्याच्या राज्यकारभारात दिसून येतो. ब्रिटिश राजनीतीचा हा उत्तम भाग प्रो. कुळकर्णी यांनी फार समर्पक रीतीने विद्वानांपुढे मांडला आहे हेच त्यांच्या प्रबंधाचे महत्त्व. इत्यलम्

मुंबई
दि. १२-१-१९७१

**पु. म. जोशी**

# अनुक्रमणिका

# चित्रांची सूची

१

# जीवनगाथा

मराठी राज्याची स्थापना सतराव्या शतकांत झाली, अठराव्या शतकात हे राज्य कळसास पोहोचले, आणि एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीच हे राज्य संपुष्टात आले. आठराव्या शतकात भारतात प्रमुख सत्ता होती ती मराठ्यांची, आणि म्हणूनच भारताचा त्या शतकाचा इतिहास म्हणजे प्रामुख्याने मराठ्यांचाच इतिहास होय असे समीकरण मांडावे लागेल. १७६५ च्या प्लासीच्या लढाईपासून भारतात मूळ धरू लागलेल्या ब्रिटिश सत्तेला आपले प्रभुत्व स्थापन करण्यासाठी शेवटी झुंज द्यावी लागली ती मराठ्यांशीच. तेव्हा हे मराठे आहेत तरी कोण ? त्यांनी भारताच्या राजकारणावर आपला इतका प्रभाव कसा पाडला ? हे जाणून घेण्याच्या बुद्धीने जे परकीय इतिहासकार मराठ्यांच्या इतिहासाकडे वळले त्यांत ग्रँट डफचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. यापूर्वी स्प्रेंगेल (१७८५) या जर्मन आणि स्कॉटवेअरिंग (१८१०) या ब्रिटिश इतिहासकारांनी मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचे प्रयत्न केले होते. पण एक तर त्यांच्या काळात अद्याप मराठ्यांचा इतिहास घडत होता, आणि दुसरे या इतिहासास आवश्यक ती साधनसामुग्री त्यांना उपलब्ध झाली नव्हती. ग्रँटने मराठी राज्याचा शेवट पाहिला होता, तो घडवून आणण्यात भागही घेतला होता. आणि साताऱ्याचा पहिला पोलिटिकल एजंट बनण्याचा बहुमान मिळाल्यामुळे, मराठ्यांच्या इतिहासाचे एक प्रकारे भांडारच त्याच्यापुढे खुले झाले होते. त्यामुळे मराठ्यांचा आद्यइतिहासकार ही बिरुदावली सार्थपणे भूषविण्याचे भाग्य कॅप्टन ग्रँट डफला लाभले आहे यात संशय नाही.

ग्रँट डफचा मराठ्यांचा इतिहास १८२६ साली प्रसिद्ध झाला आणि त्याचे भाषांतर १८२९ साली मराठीत झाले. या ग्रंथाचा परामर्ष घेण्याची कामगिरी जवळ जवळ चाळीस वर्षांनंतर, १८६८ साली पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधील "पूना यंग मेन्स असोशिएशन" या संस्थेच्या वतीने श्री. नीलकंठ जनार्दन कीर्तने या 'ज्यूनिअर स्टुडंट' ने बजावली आणि विष्णुशास्त्री चिपळुणकरांनी आपल्या निबंधमालेत या तरुणाची तोंडभर स्तुती करून या विषयाचे महत्त्व विशद केले.

वस्तुत: ग्रँट डफच्या इतिहासाचा सखोल अभ्यास करून कीर्तन्यांनी टीका लिहिली नव्हती. पण त्यामुळें लोकांचा असा समज झाला असावा की डफचा मराठ्यांचा इतिहास हा विपरीत आणि मराठ्यांना दूषण देणारा आहे.

पुढे भारतवर्ष या मासिकाच्या कार्यक्रमाविषयी (१८९८) दोन शब्द सांगताना संपादक रावबहादूर पारसनिसांनी प्रथमतःच ग्रँट डफच्या चरित्राचे महत्त्व विशद केले आणि रा. ब. कीर्तन्यांनी ग्रँटसंबंधी जे ग्रह करून दिले होते ते तपासून पाहण्याच्या दृष्टीने ग्रँट डफच्या चरित्राची आणि कार्याची माहिती देणारे दोन लेख प्रसिद्ध केले. ते म्हणतात, " कै. रा. ब. नीलकंठ जनार्दन कीर्तने यांनी ग्रँट डफच्या बखरीतील टीका प्रसिद्ध केल्यापासून ग्रँट डफ साहेबासंबंधानें लोकांचा एक प्रकारचा ग्रह झाला आहे. परंतु तसा ग्रह होण्यासारखी ग्रँटसाहेबांची कृती गर्हणीय नव्हती. ग्रँट डफ साहेबांनी लिहिलेल्या इतिहासात अनेक प्रमाद घडले असले तरी त्यांनी महाराष्ट्रावर चिरस्मरणीय उपकार केले आहेत. एतद्देशीय लोकांवर त्यांचे किती प्रेम होते, व त्यांच्या कल्याणाविषयी त्यांची किती आस्था होती हे सुदैवाने उपलब्ध झालेल्या त्यांच्या मूल्यवान पत्रव्यवहारावरून वाचकांस लवकरच दिसून येईल. ह्यांच्या चरित्रावरून पेशवाईचा लय झाल्यानंतर साताराच्या छत्रपतीची पुनः संस्थापना कशी झाली, महाराष्ट्रात इंग्रजी अंमल कसा संस्थापित झाला, मराठ्यांच्या इतिहासाची टोलेजंग इमारत कशी उभारली गेली वगैरे अप्रसिद्ध माहिती पुष्कळच व्यक्त होईल, व ग्रँट डफ साहेबांचे चरित्र मराठ्यांचे इतिहासकार ह्या नात्याने विशेष महत्त्वाचें व मनोरम वाटेल अशी आमची खात्री आहे."[१]

रा. बा. पारसनिसांचे वरील विचार अत्यंत मननीय आहेत. त्यांना उपलब्ध असलेल्या साधनांच्या साहाय्याने त्यानी जे ग्रँट डफचे चरित्र रेखाटले आहे ते त्रोटक आणि अपुरे आहे. त्याच्या चरित्राचे धागे जुळविण्यासाठी आणि त्याच्या इतिहासविषयक तथा शासनविषयक कार्याचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी आवश्यक असे बरेच साहित्य आता उपलब्ध झाले आहे. या साधनसामग्रीच्या आधारे कीर्तन्यांनी आपल्या टीकेमुळे प्रसृत केलेले ग्रँट डफविषयींचे ग्रह दूर करून पारसनिसांनी रेखाटलेल्या त्याच्या चरित्रातील अपुरेपणा भरून काढणे आज शक्य झाले आहे. पारसनीस म्हणतात त्याप्रमाणे ग्रँट डफचें चरित्र खरोखरीच किती

---

१. भारत वर्ष अंक, पृ. ६७.

'महत्त्वाचे आणि मनोरम' आहे हे या नवीन उपलब्ध झालेल्या माहितीच्या आधारे तपशीलवार मांडण्याचा उपक्रम प्रस्तुत प्रबंधात केला आहे.

स्कॉटलंडमधील बॉन्फ (Banff) या शहरांत दि. ८ जुलै १७८९ रोजी किन्करडिन ओ'निलच्या (Kincardine O'Neil) ग्रँट कुटुंबात जेम्सचा जन्म झाला. १७८९ साली फ्रान्समध्ये क्रांतीची ठिणगी पडली आणि सारे युरोपखंड ढवळून निघण्यास प्रारंभ झाला. अशा या क्रांतिकालात जेम्सचा जन्म झाला. त्याचे वडील जॉन हे १७९९ साली वारले. त्याची आई मार्गारेट मिल्न (Margaret Miln) ही इडनच्या डफ घराण्यातील होती. तिचा भाऊ विल्यम डफ हा १८२४ मध्ये वारला आणि डफ घराण्याची सारी जिंदगी मार्गारेटला मिळाली. त्यामुळे जेम्स ग्रँटला आपल्या मातुलगृहाचे उपनाम घ्यावे लागले व तो जेम्स ग्रँट डफ म्हणून ओळखला जाऊ लागला.

वयाच्या अवघ्या दहाव्या वर्षी जेम्सवरील पित्याचे छत्र नाहीसे झाले. पुढे काही दिवसांनी मार्गारेट आपल्या मुलाला घेऊन ॲबरडीन या उत्तर स्कॉटलंडमधील शहरात राहावयास गेली. आपला शालेय अभ्यासक्रम पूर्ण करून जेम्सने तेथील मारीशल (Marischal) कॉलेजमध्ये नाव घातले. प्रसिद्ध आंग्लकवी बायरन हा जेम्सचा समकालीन आणि याच कॉलेजचा विद्यार्थी होता.

मार्गारेटची इच्छा अशी की आपल्या मुलाने विश्वविद्यालयीन शिक्षण पुरे करून ईस्ट इंडिया कंपनीत एखादी हुद्याची जागा मिळवावी. हिंदुस्थानच्या आणि पर्यायाने युरोपच्या राजकारणात कंपनीला बरेच महत्त्व येऊ लागले होते. प्लासीच्या विजयाने इंग्रजी राज्याची पायाभरणी झाली होती, बंगालमधील दुहेरी राज्यव्यवस्थेमुळे तिला राज्यकारभारातही प्रवेश मिळाला होता. त्यावेळी मराठ्यांची सत्ता अधिक प्रबल होती. पण त्यांच्या आपापसातील तंट्यामुळे इंग्रजांना राजकारणात प्रवेश करून घेण्यास फारसे सायास पडले नाहीत. राघोबा इंग्रजांना मिळाला आणि हेस्टिंग्जने मराठ्यांच्या विरुद्ध युद्धाचे रणशिंग फुंकले. १७८३ च्या सालबाईच्या तहान्वये मराठ्यांच्या विजयावर शिक्कामोर्तब झाले असले, तरी मराठ्यांचा हा विजय पोकळ आहे हेही उघड झाले होते. १७९५ पर्यंत मराठ्यांनी कसाबसा आपला डौल राखला होता. १७९६ साली बाजीराव मसनदीवर आला आणि मराठ्यांच्या ऱ्हासास सुरवात झाली. मराठ्यांच्या हातून सत्ता हिसकावून घेणारा माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन याच वर्षी ईस्ट

इंडिया कंपनीच्या नोकरीत दाखल झाला आणि बनारसच्या मॅजिस्ट्रेटचा मदतनीस म्हणून भारतात आला. वेलस्लीच्या विस्तारवादी धोरणाने या देशात चांगले मूळ धरले होते, आणि त्याने स्वीकारलेल्या तैनाती फौजेच्या वर्चस्वाखाली लहान-मोठी राज्ये येऊ लागली होती. मराठी सरदारांतील बखेडे शिगेला पोहोचले आणि वसईच्या तहाने १८०३ साली एकप्रकारे मराठी राज्यच इंग्रजाकडे गहाण टाकले गेले. थोडक्यात, ईस्ट इंडिया कंपनीच्या या वाढत्या यशाचे आकर्षण इंग्रज लोकांना दिवसेंदिवस अधिक वाटू लागले आणि अशा या कंपनीत लहान-मोठी नोकरी मिळविण्यासाठी तरुण मंडळी धडपडू लागली.

जेम्सने आपला अभ्यासक्रम पुरा करून कंपनीच्या सनदी नोकरीत प्रवेश करावा असे त्याच्या आईला वाटत असले तरी अशी नोकरी मिळविण्यासाठी जो कालावधी लागणार होता, तो जेम्सला नको होता. त्यापेक्षा मिळेल ती नोकरी पत्करण्याचा मनाशी बेत करून, विद्यालयीन शिक्षणाला रामराम ठोकून वयाच्या १६ व्या वर्षी (१८०५) त्याने मायदेशाचा निरोप घेतला.

युरोपातून भारतास येणे १९ व्या शतकातही अत्यंत कष्टप्रद होते. केप ऑफ गुड होपला वळसा घालून जलमार्गाने यावयाचे म्हणजे किमान सहा महिने लागत. वाटेत अपघात आणि चाचेगिरी यांची सतत भीती असेच. ब्राझील येथील केप सेंट रोक ( Cape st. Roque ) येथे त्याच्या बोटीला अपघात झाला आणि त्याचे सर्व साहित्य बुडाले. यात त्याची काही खाजगी कागदपत्रे देखील होती. १८०६ साली कॅ. बेअर्डने (Baird) केफ ऑफ गुड होपवर हल्ला केला त्यावेळी ग्रँट तेथे होता. तो यावेळी समुद्रात बुडून मरावयाचाच पण त्याच्या पोहण्यातील वाकबगारीने त्याला हात दिला आणि तो जगला.

१८०६ साली मुंबईच्या किनाऱ्यावर त्याचे पाय लागले आणि त्याने त्वरित मुंबईच्या लष्करी नोकरीत एक साधा कॅडेट म्हणून प्रवेश मिळविला. या संस्थेतील प्राथमिक अभ्यासक्रम यशस्वीपणे पूर्ण करून, त्याने २३ एप्रिल, १८०७ रोजी एनसाईन (Ensign) हा हुद्दा मिळविला, आणि बॉम्बे नेटिव्ह इन्फन्ट्री अथवा बॉम्बे ग्रेनेडिअर्स येथे त्याची नेमणूक झाली.

१८०८ साली काठेवाडातील लुटारूंच्या 'मालिया' (Mālia) या बालेकिल्ल्यावर हल्ला चढविण्याची कामगिरी त्याच्यावर सोपविण्यात आली असता लोकांच्या नजरेत भरेल असे शौर्य आणि धाडस त्याने या प्रकरणात

दाखविले. साहजिकच त्याची वरच्या जागेसाठी शिफारस झाली आणि १८१० साली म्हणजे फक्त चार वर्षांत तो लेफ्टनंट बनला. फार्सी भाषा त्याने आत्मसात केली होती त्यामुळे पलटणीचा फार्सी दुभाषा म्हणूनही त्याचीच निवड झाली होती. साहजिकच, वयाने तरुण असूनही पलटणीवर त्याचा अधिक प्रभाव पडू लागला. त्यामुळे त्याच्या सहकाऱ्यांना त्याच्याविषयी असूया वाटू लागली आणि क्वचित प्रसंगी त्यांच्याशी त्याची भाडणे होऊ लागली.

जेम्स ग्रँट जेव्हा मुंबईच्या लष्करात आपले स्थान स्थिर करीत होता त्याच वेळी माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टनही पुण्यात ब्रिटिश रेसिडेंट कर्नल क्लोजचा मदतनीस म्हणून काम करीत होता. पुढे १८०८ ला त्याची रवानगी काबूलकडे झाली. पण पुढे दोनच वर्षांनी म्हणजे १८१० साली पुण्यास रेसिडेंट म्हणून त्याची बदली झाली. पेशवाई कमकुवत झाली असली तरी अद्याप नेस्तनाबूत झाली नव्हती. त्यामुळे पेशव्यांशी टक्कर देण्यासाठी त्याला चांगले मुलकी आणि लष्करी अधिकारी हवे होते. १८०८ साली गुजराथेत अतुल पराक्रम दाखवून जेम्सने जो बंडाचा बीमोड केला होता त्याची वार्ता एल्फिन्स्टनला होती. एल्फिन्स्टनने पुढे त्याला पॉटिंजर, ब्रिग्ज, चॅपलिनसारख्या आपल्या निकटवर्तियांत दाखल करून घतले, आणि १८१७ च्या आणीबाणीच्या प्रसंगी तो पुण्यास एल्फिन्स्टनच्या सेवेस हजर झाला.

१८१७ च्या खडकीच्या अथवा गणेशखिंडीच्या युद्धात त्याने विशेष लक्षणीय कामगिरी बजावली होती. त्याचा प्रसंगावधानपणा कंपनीच्या यशास प्रामुख्याने कारणीभूत झाला होता. एल्फिन्स्टनला त्याने अप्रत्यक्षरीत्या जो सल्ला दिला त्यामुळे खडकीच्या युद्धाचे स्वरूप बदलून गेले. ग्रँट हा स्वतः या युद्धाशी निगडीत असल्यामुळे त्याच्या इतिहासातील या प्रसंगाचे वर्णन अत्यंत बोलके झाले आहे, आणि त्याच्या ग्रंथातील एक 'सौंदर्यस्थळ' म्हणून या त्याच्या वर्णनाचा उल्लेख करता येईल. आपल्या नावाचा चुकूनसुद्धा उल्लेख न करता मोठ्या विनयाने ही सारी घटना त्याने नोंदविली आहे. खडकीची लढाई हा त्याच्या आयुष्यातील एक महत्त्वाचा क्षण म्हणावा लागेल.

ग्रँट पुण्यास आला तेव्हा इंग्रज–मराठे यांचे संबंध बिनसत चालले होते. इंग्रजांवर हल्ला चढविण्याचे मार्ग मराठे आपल्यापरीने काढीत होते, आणि मराठ्यांच्यावर मात कशी करावयाची याचे मनसुबे इंग्रज रचीत होते. संघर्ष अटळ आहे याची जाणीव उभयपक्षांना असली तरी

चालढकलीचे राजकारण चालूच होते. एकीकडे तहाची बोलणी करीत असता पेशवे युद्धाचीही तयारी करीत होते. एल्‌फिन्स्टनला बाहेरून मदत मिळण्यापूर्वीच त्याच्यावर अचानक हल्ला करावयाचा मनसुबा मराठ्यांनी रचला होता. त्यांनी घोड्यावर खोगीर बांधले, तोफा रणगाड्यावर चढविल्या आणि पायदळ सज्ज ठेवले. २८ ऑक्टोबर, १८१७ च्या मध्यरात्री ही बातमी एल्‌फिन्स्टनला कळली, आणि क्षणभर त्याच्या मनात विचारांचे काहूर उठले. बचावाचे की चढाईचे धोरण स्वीकारावयाचे असा संघर्ष त्याच्या मनात निर्माण झाला. संगमावरील रेसिडेन्सीत आणि छावणीत भीषण शांतता पसरली होती. सारे रहिवासी निश्चिंतपणे झोपी गेले होते.

पेशव्यांच्या छावणीत मात्र बरीच हालचाल, कोलाहल, गोंधळ उडालेला होता. संगम बंगल्याच्या गच्चीवरून एल्‌फिन्स्टन हे सारे पाहात होता आणि त्याच्या मनात विचार येत होते की आता मराठे चालून आले तर या आपल्या साऱ्या लोकांना त्यांच्या तलवारींना बळी पडू द्यावयाचे की त्यांना जागे करून हाती शस्त्र धरून लढता लढता मरण्याचे सुख मिळू द्यावयाचे ?. बाजीराव विश्वासघातकी आहे याबद्दल त्याच्या मनात अणुमात्रही शंका नव्हती. त्याचबरोबर त्याला असेही वाटत होते की इतर मराठे सरदार त्याला साथ देणार नाहीत. तेव्हा सबूरीचे धोरण स्वीकारावे असे त्याने ठरविले. रात्रीच त्याने ही बातमी आपल्या छावणीत पसरविली असती तर गोंधळ झाला असता. पण त्याचे नशिब बलवत्तर. हेरांनी बातमी आणली की चढाई करावयाची की नाही याचा पेशवा अद्याप विचार करतो आहे. शहरातील कोलाहल कमी कमी होत विराम पावत होता, रात्रही सर्‌सर् सरत होती आणि प्रतिहल्ल्याचा विचार निदान काही तास तरी पुढे ढकलणे एल्‌फिन्स्टनला शक्य झाले होते. ग्रँटने एल्‌फिन्स्टनच्या मनातील ही खळबळ इतक्या प्रभावीपणे टिपली आहे की त्यावरून असे वाटते की संगम बंगल्याच्या गच्चीवरून चिंताग्रस्तपणे फेऱ्या मारणाऱ्या, थांबूनथांबून शहराकडे पाहणाऱ्या एल्‌फिन्स्टनच्या सहवासात त्यावेळी ग्रँट असला पाहिजे.

चाल करून येतील असे वाटत होते ते मराठे पुढे आलेच नाहीत. २८ ऑक्टोबरची मध्यरात्र त्यांना अनुकूल होती. पण बाजीरावाचा चंचल स्वभाव आड आला. एक आठवडा लोटला आणि शत्रू सावध झाला.[२]

२. ग्रँट डफ, भाग २, पृ. ४७५–७७.

मोर दीक्षितांची दिलजमाईची सारी बोलणी फिसकटली. विठोजी नाईक हा बाजीरावाचा हुजऱ्या ५ नोव्हेंबरच्या दुपारी दोन वाजता एल्फिन्स्टनच्या बंगल्यावरून आला आणि बापू गोखल्याच्या आज्ञेनुसार मराठी फौजेच्या हालचाली खडकीच्या दिशेनें सुरू झाल्या. मुळा-मुठा नद्यांच्या आश्रयाने उभयपक्षाच्या फौजा दबा धरून राहिल्या होत्या. मुठानदीच्या वायव्येस भांबुर्ड्यापासून चतुःश्रृंगीपर्यंतच्या भागात मराठ्यांच्या फौजा पसरल्या होत्या. इंग्रज मुळा नदीच्या उत्तरेस खडकी खेड्यात आपली छावणी ठोकून होते. मुळा नदीच्या वायव्येस दापोडीला कर्नल फोर्डची फौज होती. फोर्ड हा वास्तविक बाजीरावाचा नोकर, कवायती पलटणी करण्याकरिता नेमलेला. तो इंग्रजांना मिळू नये म्हणून मराठ्यांनी शिकस्त केली पण ते जमले नाही.

दुपारी तीन वाजता मराठी फौजा संगम बंगल्याच्या दिशेने धावू लागल्या. जरीपटक्याची काठी मोडून अपशकून झाला होता तरी मराठ्यांनी युद्धाचा मनसुबा बदलला नाही. मराठी फौजा इतक्या त्वरेनें येतील अशी इंग्रजांची कल्पना नसावी. संगमचे रक्षण करावे, तेथील कागदपत्र हलवावेत हे विचार टाकून अंगावर असलेल्या कपड्यानिशी एल्फिन्स्टन बंगल्याबाहेर पडला, आणि खडकीच्या छावणीत गेला. इकडे बाजीराव बायकामुलांसह पर्वतीवर जाऊन युद्धाची मौज पाहण्यास खिडकी धरून बसला.

दुपारी तीननंतर केव्हातरी संगम[३] बंगल्याने पेट घेतला. एल्फिन्स्टनची पुस्तके, नियतकालिके, पत्रे, हस्तलिखिते भस्मसात झाली. एल्फिन्स्टन मात्र

---

३. कॅप्टन क्लोजला पत्र ११–११–१८१७. कोलब्रुक भाग १, पृ. ३८२–८५.

"Within an hour after, out they came with such readiness that we had only time to leave the Sungum with the clothes on our backs, and crossing the river at a ford under Clieland's, march off to the bridge with the river between us and the enemy, and a little firing but no real fighting. The Sungum with all the records and all my books, journals, letters, manuscripts, etc. were soon in blaze, but we got safe to the Kirkee bridge, and soon after joined the line. While the men and followers were fording, we went ourselves to observe the enemy. The sight was magnificent as the tide rolled out of Poona.... Everything was hushed except the trampling and neighing of horses, and the whole ralley was filled with them like a river in flood." पृ. ३८३.

सुखरूपपण खडकीपुलापर्यंत आला. सर्वत्र भीषण शांतता होती. फक्त घोडयांच्या टापांचे आवाज आणि खिंकाळणे तेवढे मधूनमधून ऐकू येत होते, आणि नदीला महापूर यावा आणि सारा प्रदेश पाण्याने व्यापून टाकावा तद्वत त्या आवाजाने सारे खोरे भरून राहिले होते.

खडकीच्या युद्धाचे नेतृत्व कर्नल बर्र(Burr)कडे सोपविण्यात आले होते. एल्फिन्स्टनने त्याच्याशी विद्यमान परिस्थितीची संपूर्णपणे चर्चा केली होती आणि असे निश्चितपणे ठरविले होते की युद्धाला तोंड फुटले की कर्नल बर्रने मराठयांवर चालून जावे. प्रथमपासूनच आपण चढाईचे धोरण स्वीकारले म्हणजे आपला आत्मविश्वास वाढतो, सहकाऱ्यांना काम करण्यास उत्साह वाटतो, आणि शत्रूच्या हालचालींना अप्रत्यक्षपणे आळा बसतो, असे एल्फिन्स्टनचे धोरण होते. अर्थात या धोरणासंबंधी त्याने कर्नल बर्रबरोबर चर्चा केली असली तरी हल्ला करण्याची लेखी आज्ञा त्याला देण्यात आली नव्हती. केवळ अनवधानाने राहून गेलेली ही गोष्ट ग्रँटच्या लक्षात आली. कर्नल बर्रचा तो एक दुय्यम सहकारी होता. कदाचित त्याच्या हालचालीवरून हा काही चढाईचे धोरण अवलंबणार नाही असे ग्रँटला वाटले असावे, आणि म्हणूनच संधी मिळताच एल्फिन्स्टनपुढे त्याने हा विषय काढला, आणि घडलेली चूक दुरुस्त करून घेतली.

इंग्रज-मराठे यांच्यातील शेवटच्या लढयाचा साद्यंत वृत्तांत लेफ्टनंट कर्नल व्हॅलेन्टिन ब्लॅकर[४] यांनी प्रसिद्ध केला आहे. खडकीच्या युद्धानंतर सुमारे ४ वर्षांनी हे पुस्तक एल्फिन्स्टनच्या वाचनात आले. ब्लॅकरने या युद्धातील एल्फिन्स्टनच्या कार्याला गौणपद दिले होते, आणि सर थॉमस हिस्लॉपला यशाचा धनी बनविले होते. १८१७ च्या लढाईसंबंधीचा भाग वाचून एल्फिन्स्टन व्यथित झाला, आणि या कठीण प्रसंगी आपण नेमके काय केले होते याची तो आठवण करू लागला. ग्रँटला तो लिहितो—

" ... युद्धाला तोंड फुटले तर त्याने (क. बर्र) मराठयांवर हल्ला करून युद्धाला प्रारंभ करावा असे ठरले होते. आणि प्रत्यक्ष युद्धात पडेपर्यंत क. बर्र या धोरणापासून ढळला असेल याची मला कल्पना नव्हती. आपण नदी पार करीत असताना तूं मला सुचविलेस की कर्नल बर्रला

---

४. Lt. Col. V. Blacker : Memoir of the operations of the British Army in India during the Mahratta War of 1817, 1818 and 1819. London ( 1821 ).

चढाई करण्याचा सल्ला मी द्यावा. ही तुझी विनंती मी कशी मान्य केली हे मला आता स्मरत नाही, पण मला असे वाटते की कर्नल बर्रने कूच करावयाचे हे निश्चितपणे ठरले होते, आणि ज्या क्षणी त्याला वाटेल की युद्ध सुरू झाले आहे त्या क्षणी त्याने कूच करावयाचे, पण नंतर मला माझी चूक लक्षात आली. माझा लेखी हुकूम असल्याखेरीज क. बर्रने मुळीच हालचाल केली नसती, आणि म्हणूनच पुढे जे घडले त्याबद्दल आम्ही तुझे ऋणी आहो."[५]

कर्नल बर्रने दापोडीच्या कर्नल फोर्डची वाट न पाहता चढाई करावी अशी एल्फिन्स्टनची इच्छा होती, आणि या साऱ्या गोष्टी पत्रातून लिहिणे शक्य नव्हते, म्हणून त्याने चर्चा करून सारे ठरविले होते. म्हणून ग्रँटने केलेली सूचना अनावश्यक आहे असे प्रथम एल्फिन्स्टनला वाटले. पण लगेच त्याने विचार बदलला आणि ग्रँटलाच दूत बनवून बर्रकडे पाठविले आणि गैरसमजामुळे ओढवणारा अतिप्रसंग टळला. अत्यंत संयमाने ग्रँटने हा प्रसंग आपल्या स्वतःच्या नावाचा उल्लेख न करता इतिहासात रंगविला आहे. क. बर्रने पुढे एल्फिन्स्टनपुढे कबुली दिली की तुमचा हुकूम आला नसता तर आपण काही हालचाल केली नसती. परंतु त्याला सूचना मिळताच त्याने चढाई केली आणि दुपारी चारच्या सुमारास दापोडीहून कर्नल फोर्डही त्याला येऊन मिळाला.

---

५. कोलब्रुक भाग २, पृ. १३८–३९. ग्रँटला पत्र २४–४–१८२२.

"As to the facts about Kirkee, the important thing is that Colonel Burr and I had talked the matter over most fully, and fixed most positively, that if ever war broke out he was to begin by attacking the Mahrattas, and from this I never knew, till we were actively engaged, that he ever swerved. When we were goining to cross the river you proposed to me to desire Burr to advance. I forgot in what terms I sanctioned the request, but my impression was that it was perfectly settled Burr was to advance, and that the moment he knew war was begun he would do so. It turned out that I was quite mistaken, and that Burr would not have stirred without an order; and we are therefore indebted to you for what happened."

ही लढाई निकाली नव्हती, तरीसुद्धा ५०० मराठे मृत्युमुखी पडले. "बाळाजी विश्वनाथाचें पुण्य तुम्हास तारो" हा बापू गोखल्याला बाजीरावाने दिलेला आशीर्वाद निष्फळ ठरला. श्रीमंतांच्या चंचल स्वभावाने परत एकदा उचल खाल्ली नसती आणि बापूच्या लढण्याच्या निर्धाराचा त्यांनी पाठपुरावा केला असता आणि इंग्रज मोडावयाचा नाही हे धोरण बाजूला सारले असते तर एल्फिन्स्टन, ग्रँट, कर्नल बर्र यांच्या कारवाया कदाचित् निष्फळ ठरल्या असत्या. परंतु जरीपटक्याची काठी एकदा मोडली ती काही उभी राहिली नाही.

थोडक्यात, खडकीची लढाई ही ग्रँटच्या आयुष्यातील एक महत्त्वपूर्ण घटना म्हणावी लागेल. हा माणूस आपल्याला पुढे खूप उपयोगी पडणारा आहे, अशी आपल्या मनाशी खूणगाठ एल्फिन्स्टनने त्याचवेळी बांधली असेल. त्याचे शहाणपण आणि प्रसंगावधान इंग्रजांच्या यशास कारणीभूत झाले होते. खडकीच्या लढाईच्या निमित्ताने निर्माण झालेली जवळीक पुढील काळातसुद्धा चांगलीच टिकून राहिली होती. सेवानिवृत्त झाल्या-नंतरही अगदी शेवटच्या क्षणापर्यंत उभयतांचा पत्रव्यवहार चालूच होता.

१८१८ साली ग्रँटला कॅप्टन हे पद मिळाले. मराठी राज्याची इतिश्री झाली होती, आणि पेशव्यांकडून जिंकलेल्या प्रदेशावर इंग्रजी अंमल बसवावयाचा होता. सातार्‍याचे स्वतंत्र राज्य ठेवावयाचा निर्णय कंपनी सरकारने घेतला होता. ही सारी कामे पाहण्यासाठी तरुण, कर्तबगार अधिकार्‍यांची एल्फिन्स्टनला गरज होती. अशा वेळी ग्रँटचे नाव नजरे-समोर येणे स्वाभाविक होते. १८१७–१८ या काळात सनदी आणि लष्करी क्षेत्रांत त्याने लक्षणीय कामगिरी बजावली होती. १८१७ च्या डिसेंबरात पेशव्यांच्या सैन्याशी उडालेल्या चकमकीत रसेल, पॉटिंजर, टोव्ही यांच्या बरोबरीने ग्रँट धैर्याने लढला होता. जिंकलेल्या प्रदेशाची निरवानिरव करण्याच्या कामी एल्फिन्स्टन त्याच्याशी अनेक वेळा विचारविनिमय करीत असे.

प्रतापसिंहाची सुटका करून सातारा राज्य निर्माण झाल्यावर एल्-फिन्स्टनने जेम्स ग्रँटची सातार्‍याचा पोलिटिकल एजंट म्हणून नेमणूक केली. त्याचे मासिक वेतन २००० रु. ठरविण्यात आले आणि शिवाय त्याला भत्ताही चांगला म्हणजे दीडहजार रुपये दिला होता.[६] आपल्याला

६. As Rs. 3500 a month makes one a much more interesting person than he otherwise might be. ( 15–12–21. )

एखाद्या राजपुत्रासारखे भत्ते दिल्याबद्दल त्याने एल्फिन्स्टनचे आभार मानले आहेत (२६–४–१८). साताऱ्याचे राज्य चालवावे कसे याबद्दल विस्तृत सूचना एल्फिन्स्टनने दिल्या आणि त्याबरहुकूम ग्रँटने साताऱ्याच्या राज्याची धुरा वाहिली. राजा प्रतापसिंहाने एका जाहीरनाम्याद्वारे (११-४-१८१८) ग्रँटला सातारा राज्याची व्यवस्था लावण्याचे सर्वाधिकार दिले होते. सुमारे १ वर्षानंतर राजा आणि कंपनी यांच्यात तह झाला (२५-९-१८१९) आणि राजाच्या नावे १८२२ पर्यंत ग्रँटने राज्यकारभार पहावा आणि नंतर सर्व सत्ता राजाकडे सुपूर्द करावी असे ठरले.

एल्फिन्स्टनच्या सूचनांची कार्यवाही करणे थोडेसे कठीण होते. राज्याच्या अंतर्गत व्यवहारात नवीन असे काही न करता राजाचा पाठिंबा इंग्रजांना मिळविणे ही जोखमीची कामगिरी त्याच्याकडे सोपविली होती. राज्यकारभाराची हकीकत बहुतेक रोज ग्रँट एल्फिन्स्टनला कळवून त्याचा सल्ला घेत असे. साताऱ्याशी संबंधित अशा सरंजामदार, जहागीरदार यांच्याशी त्याला स्वतंत्रपणे करारनामे करावयाचे होते. या नवीन राज्यात समस्यांचा तुटवडा नव्हता. बाजीरावाचे सहकारी, त्याची पत्नी वाराणसीबाई भ्रष्ट सरकारी अधिकारी, बंडखोर रामोशी, कामावरून कमी केलेले सैनिक या सर्वांचा बंदोबस्त करावयाचा होता. राजा आणि त्याचे अधिकारी यांना शासनाबाबत योग्य ते शिक्षण देण्याची जबाबदारी त्याची होती. १८१८ ते १८२२ ही चार वर्षे साताऱ्याचा पोलिटिकल एजंट म्हणून तो राहिला आणि या काळात आलेल्या आपत्तींना यशस्वीपणे तोंड देऊन साताऱ्याच्या राजाला तर सुसंस्कृत बनविलेच, पण त्याचा मुलुख देखील सुस्थिर केला. शिवछत्रपतीचा हा वंशज निळ्या मखमलीने मढविलेल्या टेबलखुर्चीवर बसून स्वतः पत्रे लिहितो, आपली रोजनिशी लिहितो हे पाहून एल्फिन्स्टन स्तिमित झाला आणि त्याने ग्रँटला धन्यवाद दिले.[७] ब्रिटिश सत्ता भारतात रुजविण्याच्या कामी ज्या व्यक्तींचे परिश्रम कारणी लागले आहेत त्यांत ग्रँटचा आवर्जून उल्लेख करावा लागेल.

---

७. कोलब्रुक भाग २ पृ. १८७–८.

"He is the most Civilized Mahratta I ever met with, has his country in excellent order.... I was more struck with his private sitting-room than anything I saw at Sattara. It contains a single table covered with green velvet, at which the descendent of Sivajee sits in a chair, and writes letters, as well as a journal of his transactions with his own hand." (15-11-1826)

साताऱ्याचे राज्यशकट हाकीत असतानाच त्याने मराठ्यांच्या इतिहासास आवश्यक अशी मराठी, इंग्रजी, फार्सी इत्यादि भाषांतील साधनसामुग्री मिळविली, टाचणे टिप्पणे तयार केली, इतिहासाचा आराखडा तयार केला. दैनंदिन राज्यकारभाराचे काम सांभाळून, रात्री रात्री जागून त्याने आपल्या संकल्पित इतिहासाचा मसुदा तयार केला आणि एल्फिन्स्टन, ब्रिग्ज, व्हॅन्स केनेडी यांसारख्या तज्ञांकडून तो बराचसा तपासून घेतला.

एक उत्तम प्रशासक म्हणून साताऱ्याच्या जनतेत ग्रँटने विशेष स्थान पटकाविले होते. साताऱ्यात त्याने वसुलाची जी व्यवस्था केली होती तिला ' ग्राट साहेबाचा सूड ' म्हणून लोक संबोधित असत.[८] लोकांचा तो भोक्ता होता. रयतेने आपली गाऱ्हाणी त्याला रस्त्यावर अथवा त्याच्या निवासस्थानी येऊन सांगितली तरी तो सारे सहानुभूतीपूर्वक ऐकून घेत असे. साताऱ्यास पवई नाक्याच्या पूर्वेस, माहुलीच्या रस्त्यावर फोडजाई देवीच्या मंदिराच्या शेजारी जी एक दुमजली छोटेखानी बंगली दिसते ते ग्रँटचे निवासस्थान होते. आज तो बंगला भुताटकीचा बंगला म्हणून ओळखला जातो. या बंगल्याच्या गच्चीवरून सातारचा किल्ला, राजवाडा आणि माहुलीचा रस्ता या सर्वांवर नजर टाकणे सोईचे होत असावे. हा बंगला इंग्लिश काऊंटी कॉटेजसारखा टुमदार आहे. पुढे पोर्च, उजव्या डाव्या बाजूस बंद व्हरांडे, त्यात दोन्ही बाजूस तीन खोल्या, दोन मोठे दिवाणखाने, त्यांना मध्ये कमान, रसोईघर, माडीवर दोन फक्त दिवाणखाने अशी या घराची रचना आहे. याच बंगल्यात बसून साताऱ्याचे प्रशासन आणि मराठ्यांच्या इतिहासाचे लेखन ग्रँटने केले असावे[९].

---

८. पारसनीस द. वा.—महाबळेश्वर पृ. ४१.

९. नोव्हेंबर १०, १८१८ रोजी एल्फिन्स्टनला घरासंबंधी ग्रँटने पुढीलप्रमाणे पत्र लिहिले होते—

" I proposed to you when you were here to build one room here on the foundation of the old house and to build a bungalow somewhere out of town, but I did not then know what an expensive place Satara was; it could not be done for double the sum I then estimated 10000 Rs.

I therefore confirm my present request to what is immediately required and in fact absolutely

आपल्या लोकोपयोगी आणि निर्मळ राज्यकारभाराने त्याने सातारच्या लोकांची मने आपल्याकडे आकर्षून घेतली आणि ग्रँट साहेबाचे नाव घरोघरी ऐकू येऊ लागले. एक समकालीन ब्रिटिश अधिकारी सर जेम्स फिट्जेम्स स्टीफेन सातान्यातील ग्रँटच्या कामगिरीविषयी म्हणतो, "वयाच्या अवघ्या २५ व्या वर्षी, शासनाचा पूर्वीचा कसलाही अनुभव नसताना, एका राज्याचा कारभार करण्याचे सर्वाधिकार कंपनीने या तरुणाला दिले आणि त्याने चातुर्य आणि कणखरपणा दाखवून राज्यकारभार केला आणि अक्षरशः एका जंगलमय प्रदेशाचे नंदनवन केले."[१०]

राज्यकारभार आणि इतिहासलेखन या दोन्ही गोष्टी एकाच वेळी साधण्यासाठी त्याला फार कष्ट उपसावे लागले, आणि त्याची प्रकृति फारच ढासळली. त्याला मनस्वी अशी डोकेदुखी होती, दर पाच दिवसांनी ती सुरू होई. एकदा सुरू झाली की सहा तासांपासून सोळा तासांपर्यंत तिचा अंमल राही. वेळेची टांगती तलवार सतत डोक्यावर असल्यामुळे, कपाळावर थंड पाण्याच्या पट्ट्या बांधून तो कामाला बसे. अशा वेळी रात्रभर जागून तो काम करी, आणि त्याच्या हातून लिखाणही बरेच चांगले होई. आपल्या डोकेदुखीबद्दल विनोदाने तो म्हणतो, 'माझ्या या नेमणुकी-मुळे माझे डोके फिरले आहे असे लोक म्हणतात. कदाचित ते खरे असेल.'[११] (१६-७-१९)

---

necessary—namely one large room with a varanda in front and two small rooms in the rear which can either answer as bed rooms to passengers or a place where ladies can retire to. There are old materials and the Raja has given me the house of an old foundation. So that I think with these advantages it may be built for about 6000 Rs."

ग्रँट पोलिटिकल एजंट झाला तेव्हा तो २९ वर्षांचा होता.

मूळच्या या छोटेखानी बंगलीत कालांतराने वाढ झाली असावी आणि तिला आजचे स्वरूप प्राप्त झाले असावे.

१०. The Life of Sir James Fitzjames Stephen by Leslie Stephen p. 171. ( London, 1895 ).

११. ..Furies take my head again. You will hear of me confined in the fort with a short jacket on some of these days. People may say and partly with truth that my head is turned by my appointment.

—ग्रँटचे एल्फिन्स्टनला पत्र (१६-७-१९)

प्रारंभीच्या काळात त्यांची प्रकृति चांगली धडधाकट असावी. आपल्या सहकाऱ्यांना तो मोठचा अभिमानाने सांगत असे की, " पोर्टवाईनची सबंध बाटली पचवून रात्री आपल्या बिछान्यापर्यंत अथवा निवासस्थानापर्यंत न ठेचकळता एकटचाने चालत जाण्याचे दिव्य, जे इतरांना जमणार नाही ते आपण करू शकतो." (१५-१२-१८२१). याच सुमारास त्याला एकदा कॉलरा झाला होता, पण त्या संकटातूनही तो सहीसलामत सुटला. या संदर्भात तो लिहितो, " माझ्या पायातील पेटका अगदी सौम्य प्रकारच्या असून त्या वरपर्यंत केव्हाच पोहोचल्या नाहीत." ब्रँडी आणि यु-द-कोलोन यातून दरताशी ८ ग्रेन कापूर आणि २ ग्रन अफू यांचे मिश्रण तो घेत असे. " तीन दिवसात आपण तीन ब्रँडीच्या बाटल्या पचविल्या आहेत यावरून फाटक्या अंगाची माझ्यासारखी माणसे धष्टपुष्ट माणसापेक्षा किती अधिक पचवू शकतात याची तुम्हाला कल्पना येईल "[१२] असे तो एल्फिन्स्टनला लिहितो.

ब्रँडीचे त्याला विशेष व्यसन असावे असे दिसते. मुंबईस जहाज आले की आपणासाठी ब्रँडीच्या बाटल्या खरेदी कराव्यात असे तो तेथील व्यापाऱ्यांना वारंवार लिहीत असे. कधी कधी प्रतापसिंहही त्याच्याकडे येऊन मद्यसेवन करीत असे.

अर्थात मूळची प्रकृती ठीक असली तरी क्षणोक्षणी वाढणारे सरकारी काम, त्याच बरोबर वाढणारी जीवघेणी डोकेदुखी आणि अनियमित असे एकाकी जीवन यामुळे त्याच्या प्रकृतीवर फार परिणाम झाला आणि दीर्घ-मुदतीच्या विश्रांतीची त्याला गरज भासू लागली. त्याची प्रकृती नादुरुस्त का झाली हे सांगताना त्याचा पुत्र माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ग्रँट डफ आपल्या चरित्रात म्हणतो, " साताऱ्यात तो पाच वर्षे राहिला, आणि या काळात आपल्या दैनंदिन कामात इतिहासलेखनाच्या कामाची अनावश्यक पण अत्यंत महत्त्वाची भर घातली. मराठचांचा इतिहास लिहिणे ही काही सामान्य बाब नव्हती. प्रशासन आणि इतिहासलेखन या दुहेरी परिश्रमाने त्याचे स्वास्थ्य बिघडले, आणि १८२३ साली त्याला हिंदुस्थान सोडावा लागला. हेतुपुरस्सर अथवा अभावितपणे नंतरच्या दोन वर्षांत भारतास परत न जाण्याचा एक महत्त्वपूर्ण निर्णय त्याने घेतला. एखादे महत्त्वाचे

---

१२. बॉलहॅचेट पृ. १८.

काम मायदेशात अथवा परदेशात स्वीकारण्याइतपत आपली प्रकृती ठीक नाही अशी त्याची भावना झाली होती. "[१३]

प्रतापसिंहाच्या हवाली राज्य केल्यावर आता थोडी विश्रांती घ्यावयास हरकत नाही असे त्याला वाटले, आणि २७ नोव्हेंबर १८२२ रोजी त्याने सातारा शहर सोडले आणि तो मुंबईस आला. प्रवासाची तयारी आणि इतिहासाचे राहिलेले काम उरकण्यात त्याचा महिना निघून गेला. जानेवारी १८, सन १८२३ रोजी त्याने भारताचा किनारा सोडला. १२ मे रोजी त्याची बोट इंग्लंडच्या किनाऱ्याला लागली. २५ जूनपर्यंत त्याचा मुक्काम लंडनला होता आणि ३ जुलैला तो इडनला पोहोचला. सुमारे १८ वर्षांनी तो आपल्या आईला भेटत होता. या दीडतपात त्याच्या प्रकृतीत बराच फरक पडला होता. नातलगांनी तर त्याला ओळखलेच नाही. पण त्याच्या शाळकरी मित्रांना मात्र त्याचा विसर पडला नव्हता.[१४]

---

१३. वुडब्रिज येथे श्रीमती शीला सकलोव्ह ग्रँट यांच्या घरी असलेल्या ग्रँटचा मुलगा माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन ग्रँट डफ याच्या कागदपत्रांत हे अपुरे हस्तलिखित मिळाले. त्यांतील काही वाक्ये अशी आहेत : -

"In that position (at Satara) he remained for five years but unhappily superadded to his ordinary work, which was exceedingly heavy, the writing of the Mahratta History which was no light task. The double labour ruined his health, and in the January of 1823 he left India. Wisely or unwisely he determined within the next year or two that he was quite unfit to return thither or indeed to take up any work of a serious kind at home."

कॅप्टन रॉबर्टसन्‌ला लिहिलेल्या एका पत्रांत (३-९-२०) ग्रँटने असेच विचार व्यक्त केले आहेत. तो म्हणतो,

"I am getting on by setting up half the night in my historical matter and though the labour is ruinous to my health, I begin to be exceedingly interested."

१४. JIH ग्रँटचे राजास पत्र (११-७-१८२३) पृ. २२२-२३.

मायदेशाची हवा त्याला मानवू लागली. पण आईची प्रकृती दिवसें-दिवस बिघडत चालल्यामुळे सुटीचे सुख त्याला लाभले नाही. अर्थात मायदेशी परतल्याचा आनंद काही वेगळाच होता. आपल्या गावाविषयी तो लिहितो, "नदीच्या दोन्ही तीरावर वसलेली माझी छोटी पण मनोहर वतनवाडी पाहून मला खूप आनंद झाला. या नदीत खूप मासे आहेत. या प्रदेशात ससे आणि कवडे भरपूर आहेत पण डुकरे मात्र नाहीत. मी अद्याप घोडी विकत घेतली नाहीत, पण ६०० रुपयांपर्यंत येथे उत्तम घोडा मिळू शकतो. दोन घोडी घेण्याचा माझा इरादा आहे. माझ्याकडे एक नोकर आहे आणि माझ्या आईकडे एक छोटा गडी, एक माळी आणि चार मोलकरणी आहेत. हा सरंजाम या देशाच्या मानाने भरपूरच आहे. पुरुषाचा मासिक पगार वीस रुपये तर बाईचा सुमारे ७ रुपये इतका असतो. येथील रयतेच्या परिस्थितीबद्दल अद्याप मला काही माहिती नाही....सध्या मला लोक 'मराठा' म्हणूनच ओळखतात. आणि त्यात थोडेसें तथ्यही आहे. मराठ्यांच्या चालीरीतींविषयी मला जितकी माहिती आहे तितकी मला माझ्या लोकांच्याविषयी नाही हे कबूल करावे लागेल. इथली सारी माणसे चांगली आणि अगत्यशील आहेत. पुष्कळांना लग्नाच्या मुली आहेत. पण इतक्यात 'शादी' करण्याचा आपला इरादा नाही. हवा थोडीशी थंड झाली म्हणजे फ्रान्स, इटली, स्वित्झरलंड या देशात भटकायला जाण्याचा विचार आहे." हे इतके मोकळे पत्र ग्रँटनें इडनला पोहोचल्यावर ८-१० दिवसातच आपला जिवाभावाचा मित्र प्रतापसिंह यास लिहिले आहे.

ग्रँटची आई मार्गारेट हिच्या प्रकृतीत काही सुधारणा होऊ शकली नाही. १८२४ साली ती मरण पावली आणि जेम्स ग्रँट अगदी पोरका झाला.

१८२३ ते २६ ही तीन वर्षे त्याने प्रामुख्याने मराठ्यांच्या इतिहासाच पक्का मसुदा तयार करण्यात घालविली. लंडनमधील प्रसिद्ध प्रकाशक जॉन मरे यांच्याकडे १७ जानेवारी, १८२६ रोजी, आपले मराठ्यांच्या इतिहासाचे सुमारे चार लक्ष शब्दांत सांगितलेले बाड, नकाशा, काही चित्रे अवलोकनार्थ पाठविली. ग्रंथाच्या नावावरून प्रकाशक आणि लेखक यांच्यात मतभेद झाल्यामुळे ग्रँट डफने आपले हस्तलिखित परत घेतले. रॉयल एशियाटिक सोसायटीचे एक संस्थापक, आणि रामोश्यावरील प्रसिद्ध अहवालाचे लेखक जेम्स मॅकिनटॉश त्यावेळी लंडनला होते. त्यांच्या मध्यस्थीने लाँगमन्स कंपनीने या पुस्तकाचे प्रकाशन करण्याचे मान्य केले आणि अवघ्या सहा आठवड्यांत 'मराठ्यांचा इतिहास' तीन खंडांत



श्रीमती कॅथेरिन ग्रँट डफ

जगाच्या बाजारात आला. या प्रकाशनाच्या आणि लेखनाच्या कामी ग्रँट डफचे सुमारे १७०० पौंड खर्ची पडले होते. इतिहासलेखनापायी प्रकृतीची हानी आणि प्रकाशनापायी वित्तहानी ग्रँटला सोसावी लागली. आणि असा 'तन-मन-धन' खर्च करून लिहिलेल्या इतिहासाबद्दल त्याला काय श्रेय मिळाले हा इतिहास मोठा मनोरंजक आहे.

इतिहासाच्या कामातून मुक्त झाल्यावर त्याने आपल्या भावी आयुष्याची दिशा निश्चित ठरविण्याचा विचार केला असावा. इतिहास-लेखनाची सबब सांगून 'शादी'चा लकडा लावणाऱ्या उपवर मुलींच्या पित्यांना फार वेळ टाळणे त्याला शक्य झाले नसावे. भारताला परत न जाण्याचा त्याचा निश्चय पक्का झाला होता. भारतातील नोकरीत असणाऱ्या माणसाने लग्नाच्या भानगडीत पडू नये असे त्याचे मत होते. त्याचा एक सहकारी पॉटिंजर याने जेव्हा लग्न करण्याचे ठरविले तेव्हा तो त्याला लिहितो, "या देशात (भारतात) लग्न करून राहणे म्हणजे पश्चात्तापाच्या मेजावर बसण्यासारखे आहे. लग्न म्हणजे काळज्या आणि जबाबदाऱ्या यांना आमंत्रण. सार्वजनिक कार्याला त्यामुळे खीळ बसते. तेव्हा सनदी नोकरीत असेपर्यंत या प्रकारापासून दूर राहणे हा शहाणपणा होय."[१५] (१३-८-१८२०)

नोव्हेंबर १८२७ मध्ये त्याने कंपनीच्या नोकरीचा राजीनामा दिला, आणि याच सुमारास म्हणजे वयाच्या ३८ व्या वर्षी त्याचे लग्न झाले. माऊंटस्टुअर्टच्या, त्याच्या मुलाच्या मते त्याचे लग्न १८२५ साली झाले असे आहे, पण एकंदरीत ग्रँटचा स्वभाव लक्षात घेता, ते त्या साली झाले असेल असे वाटत नाही. इतिहासाच्या जबाबदारीतून संपूर्णपणे मुक्त झाल्यावरच त्याने लग्न केले असावे हे सुसंगत वाटते. कदाचित १८२६ च्या मध्यावर हे लग्न झाले असावे.

---

१५. ग्रँटचे पॉटिंजरला पत्र १३-८-१८२०.

"...but I fear Pottinger that marriage in this country to the like of you is mounting the stool of repentance for life....marrying is mailing oneself to cares and duties which are clogs on all public exertions and therefore whilst in the public service it is best to stear clear."

ग्रँट डफची बायको कॅथेरिन ही सुप्रसिद्ध वैद्यकशास्त्रज्ञ आणि 'मटेरिया मेडिका ऑफ इंडिया' या ग्रंथाचे लेखक सर व्हाईट लॉ ॲन्सली यांची मुलगी. ही अत्यंत रूपवान आणि सुविद्य होती. तिच्या वडिलांकडे अनेक विद्वानांची ये-जा असे. त्यांत तत्त्वज्ञ, इतिहासकार, साहित्यिक यांचा भरणा असे, त्यामुळे कॅथेरिनची बहुश्रुतता वाढली होती. विवाहानंतर ग्रँटने संपूर्णतया आपल्या छोटया खेडयाचा आधार घेतला होता. ईस्ट इंडिया कंपनीची त्याने सुमारे १८ वर्षे नोकरी केली, पण या नोकरीपासून त्याला आर्थिक लाभ विशेष झाला असावा असे वाटत नाही. पैसा नसल्यामुळे शहरात राहून, इतर कंपनीच्या नोकरांप्रमाणे सार्वजनिक जीवनात अथवा तेथील भारतीय राजकरणात भाग घेणे त्याला परवडणारे नव्हते. शहरात राहावयाचे, आणि राजकारणात भाग घ्यावयाचा म्हणजे त्या दर्जाला शोभेल अशा इतमामाने राहण्यास मुबलक पैसा हवा होता.[१६]

१८२९ मध्ये त्याला पुत्ररत्न प्राप्त झाले. तत्पूर्वी त्याला एक कन्या झाली, तिचे नाव ॲलिस जेन असे होते. मुलाचे नाव कौतुकाने त्याने माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन असे ठेवले होते. एल्फिन्स्टनवर ग्रँटचे इतके नितांत प्रेम होते की आपल्या आयुष्यातल्या या महत्त्वाच्या घटनेशी तो निगडीत असला पाहिजे अशी त्याची भावना असावी. आपले साहित्यिक अपत्य त्याने एल्फिन्स्टनच्या चरणी सादर समर्पण केले होते, आणि आता मुलापुढेदेखील त्याच्या कार्याचा आदर्श राहावा म्हणून एल्फिन्स्टनचेच नाव त्याला दिले होते. आपला ९ महिन्याचा माऊंटस्टुअर्ट आता चालायला बोलायला लागला आहे असे मोठ्या कौतुकाने तो राजाला लिहितो.

माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन ग्रँट हा आयुष्यात बराच यशस्वी झाला. प्रारंभीच्या काळात त्याला आयुष्यात स्थिर करण्याच्या कामी एल्फिन्स्टनची बरीच मदत झाली असावी. एका पत्रात तो लिहितो, "माऊंटस्टुअर्टवर आपण जी कृपा केलीत त्याबद्दल मी आपला आभारी आहे. याबाबत तो आपला कृतज्ञ आहे आणि तो असला पाहिजे हे लिहावयास मला आनंद वाटतो" (१८-४-१८५२). माऊंटस्टुअर्ट पार्लमेंटचा सभासद होता, भारत सरकारचा अंडरसेक्रेटरी आणि पुढे मद्रासचा गव्हर्नर अशी निरनिराळी पदे त्याने भूषविली होती. याला चार मुलगे आणि चार मुली अशी विपुल संतती होती. यांचे वंशज अद्यापि आहेत. यांच्याच

---

१६. JIH पृ. २३५ (१७-११-१८२९).

पैकी एकाने ॲबरडीन येथील ग्रँटचे घर परत विकत घेऊन, ऐतिहासिक वास्तू म्हणून ती जतन केली आहे. माऊंटस्टुअर्टने आत्मचरित्र लिहिण्यास प्रारंभ केला होता, पण ते अपुरे राहिले. त्यापैकी पहिली २५ हस्तलिखित पाने श्रीमती शीला सकलोव्ह (Mrs. Shiela Sokolov Grant) ग्रँट, वुडब्रिज (लंडन) यांच्या संग्रही आहेत. श्रीमती सकलोव्ह या माऊंटस्टुअर्टचा मुलगा ॲड्रियन याच्या कन्या होत, म्हणजेच ग्रँट डफच्या पणती होत.

ग्रँट डफची मुलगी ॲलिस जेन (Alice Jane) हिने गॅसपर ऑबरिस्ट (Gaspar Obrist) या झुरिकच्या गृहस्थाशी लग्न केले. तिला दोन पुत्र झाले. दुसरा मुलगा एन्स्ली डगलस् (Ainslie Douglas) त्याने डफ हे उपनाम सोडून आपल्या अजोबांचे एनस्ली हेच उपनाम धारण केले होते. ग्रँट डफची दोन्ही मुले मातृभक्त होती. माऊंटस्टुअर्टने त्याच्या अप्रकाशित आत्मचरित्रात ज्या पद्धतीने आपल्या पित्याच्या कार्याचा उल्लेख केला आहे त्यावरून पिता-पुत्रांचे काही फारसे सख्य नसावेसे वाटते. ग्रँट डफने एल्फिन्स्टनला अथवा राजाला जी पत्रे लिहिली त्यात तो आपल्या कौटुंबिक जीवनाचा क्वचितच उल्लेख करतो.

ग्रँटची पत्नी जेन कॅथेरीन ही फार करारी स्वभावाची असावी. पॅरिसला आपल्या पित्याच्या घरी लाडात आणि एक प्रकारे निराळ्या वातावरणात वाढलेल्या या मुलीला स्कॉटलंडमधील इडनसारख्या एका छोट्या गावातील जीवन आकर्षक वाटत नसावे त्यामुळे ग्रँटला तिच्या मर्जीप्रमाणे वागावे लागत असावे. कारण एल्फिन्स्टनला एका पत्रात तो लिहितो, " तुम्हाला भेटावयाची इच्छा आहे. पत्नीकडून येथून जाण्याची किमान एक दिवसाची परवानगी मिळते का पाहतो. " ( ५-६-१८४० )

माऊंटस्टुअर्टला वाटत होते की ग्रँटच्या सान्निध्यात आणि इडन-सारख्या ठिकाणी राहिल्यामुळे आपल्या आईच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होऊ शकला नाही. तो म्हणतो, " माझ्या वडिलांचे जीवन वैचित्र्यपूर्ण होते. पहिला भाग हा संपूर्ण साहसाचा तर दुसरा अगदी कंटाळवाणा नसला तरी विशेष शांत असा होता. ज्या पद्धतीचे जीवन माझे वडील जगत होते त्याचा परिणाम अप्रत्यक्षरीत्या कितीतरी प्रकारे अनिष्ट असाच झाला आणि त्याची झळ माझ्या आईला विशेष पोहोचली. आयुष्याच्या ज्या एका कालखंडात माणसाचे व्यक्तिमत्त्व घडत असते, बौद्धिक विकास होत असतो, तो तिचा काळ फ्रान्स, इटली, स्वित्झरलंड सारख्या युरोपमधील देशात गेला. तिचे वडील बुद्धिवंतांच्या सहवासात पॅरिस येथे राहात होते.

या सर्व गोष्टींचा माझ्या आईला बराच फायदा झाला. पण लग्नानंतर लगेच तिला एका मागासलेल्या विभागात, असे म्हटले तर त्या विभागा-विषयी आपण फारच चांगले बोलतो असे होईल, तिला स्थायिक व्हावे लागल्यामुळे प्रारंभीच्या सुसंस्कृत जीवनाची काही भरपाई होऊ शकली नाही. तिचे वडील आणि त्यांचे मित्र ज्या विषयावर चर्चा करीत अशा प्रकारच्या विषयाची तोंडओळख असलेल्या व्यक्ति या खेड्यात भेटण्याची सुतराम शक्यता नव्हती. माझे वडील कर्तबगार होते पण...त्याना बौद्धिक क्षेत्रात विशेष रस नव्हता, आणि जो होता तो वयोमानाप्रमाणे कमी कमी होत गेला. बरे शेजारीपाजारी यांच्याशी बोलावे तर त्यांच्यात बौद्धिक बाबतीत सारी उदासीनताच होती. "[१७]

१८२४ मध्ये डफ घराण्याकडून त्याला जी जमीन मिळाली ती सुमारे ३००० बिघे होती, आणि त्यातला जवळजवळ अर्धा भाग तो स्वतःच्या देखरेखीखाली लागवडीस आणीत असे. लागवडीखाली अधिक जमीन कशी आणता येईल याच्या सतत प्रयत्नात असल्यामुळे शेतीच्या कामात त्याला गोडी वाटू लागली. राजाला आपल्या शेतीविषयी माहिती देताना त्याने आपल्या पत्रात 'लावणी', 'इनाम', 'देवस्थान' आदि शब्दांचा वापर केला आहे.[१८] जमिनीवरील मालकीहक्काचे स्वरूप साधारणपणे आपल्याकडील इनामजमिनीप्रमाणे होते. उत्पन्नाच्या $\frac{१}{५}$ भाग कराच्या रूपाने जात असे, पण हा पैसा बराचसा त्या जिल्ह्यातील देवस्थान, रस्तादुरुस्ती, तुरुंग, कारखाने, पूलबांधणी, शिबंदी, पंचायत आदि कामांसाठी खर्च केला जात असे.

मालमत्ता मिळण्याच्या बाबतीत ग्रँट बराच नशिबवान असावा. १८२४ साली जशी आईकडून वतनवाडी मिळाली तशीच १८५० साली त्याला पत्नीच्या मातुलगृहाकडून वारसाहक्काने काही मालमत्ता मिळाली. अर्थात त्यासाठी त्याला आपल्या उपनावात आणखी थोडी भर टाकावी लागली. तो आता जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ बनला.

वारसाहक्काने संपादित केलेली, आणि काही स्वतः विकत घेतलेली मालमत्ता यांवर देखरेख ठेवण्यात त्याचा नंतरचा काळ गेला. नागरी-जीवन सुटले आणि तो खास ग्रामीण नागरिक बनला. वारसाहक्काने मिळालेल्या दौलतीबाबत आपल्याला कोर्टकचेऱ्या कशा कराव्या लागल्या याची हकीकत तो एल्‌फिन्स्टनला कळवीत असे.

---

१७. अप्रकाशित चरित्रातील भाग.
१८. JIH पृ. २३७ (१७-११-२९).

इडन येथे त्याने एक टुमदार घर बांधले आणि तेथेच तो स्थायिक झाला. शेती, गोपालन, आणि वृक्षारोपण हे त्याचे प्रमुख व्यवसाय बनले. शेतीव्यवसायाकडे सतत लक्ष पुरवावे लागत असल्यामुळे स्कॉटलंडहून बाहेर पडणे त्याला मुष्किल झाले होते. मराठ्यांचा इतिहास लिहिल्यानंतर पत्रलेखनाखेरीज त्याने दुसरे कसलेही लेखन केले नाही. इतिहासाची सुधारित दुसरी आवृत्ती काढण्यासही तो तयार नव्हता. शेतीविषयीच्या एका ग्रंथाचे संपादन केल्याचा त्याच्या एका पत्रात उल्लेख असला तरी त्याविषयी विशेष माहिती उपलब्ध नाही. अर्थात जिंदगीची देखभाल करणे, त्यासाठी कोर्टकचेऱ्यात हेलपाटे घालणे, शेतीत नवे नवे प्रयोग करणे यात त्याचा बराच वेळ जात असल्यामुळे, आणि प्रमुख शहरापासून दूर राहिल्यामुळे, नवीन लेखन त्याच्या हातून काही विशेष घडले नसल्यास नवल नाही. मात्र शेतीविषयक व्यावहारिक ज्ञान त्याने बरेच संपादन केले असावे.

१८३० च्या सुमारास जगात सर्वत्रच मंदीची लाट पसरली होती. शेतीवस्तूंचे भाव एकदम खाली आले होते. ग्रँटला त्यामुळे मंदीची झळ बरीच जाणवली. गाव सोडणे अथवा दूरवरचा प्रवास करणे त्याला परवडत नव्हते. एल्फिन्स्टन त्याच्यापासून एक दिवसाच्या प्रवासाच्या अंतरावर होता; त्याला भेटण्याची त्याची इच्छा होती, पण पैशाभावी तो प्रवास रद्द करावा लागेल की काय अशी त्याला भीती वाटत होती.

माऊंटस्टुअर्टला मात्र आपल्या पित्याच्या शेतीविषयक ज्ञानाबद्दल शंका होती. तो म्हणतो, "माझ्या वडिलांना शेतीचे तात्त्विक अथवा व्यावहारिक असे कसलेही ज्ञान नव्हते. त्यामुळे त्याचे अनुभव नेहमी महाग पडत. अगदी सूडबुद्धीने त्याने हे अनुभव एकप्रकारे विकत घेतले आहेत. इडनमधील पहिल्या १५ वर्षांच्या काळात तेथील आपल्या मालमत्तेच्या किमतीएवढी रक्कम त्याने त्या मालमत्तेवर आपला हक्क शाबीत करण्यासाठी खर्च केली, आणि पुढे जेव्हा हक्क मंजूर झाला तेव्हा ती सुधारण्यासाठी सुमारे १२ वर्षे त्याने पाण्यासारखा पैसा त्यावर खर्च केला. पुढे जेव्हा मी ही सर्व मालमत्ता विकली तेव्हा मला साधारणपणे वडिलांनी खर्च केलेल्यापैकी साडेतीन टक्के रक्कम मिळाली. वेळेवरच हा निर्णय घेतला म्हणून बरे झाले. मी ती मालमत्ता विकल्यानंतर एकदोन वेळा तिचे हस्तांतर झाले, आणि त्यांना माझ्या वडिलांनी केलेल्या खर्चाच्या मानाने अगदीच कमी पैसे मिळाले."[१९]

---

१९. JIH पृ. २२५ (१–११–१८२४).

ग्रँटला प्रवासाची विशेष आवड असावी असे दिसते. १८२३ ते २६ या काळात प्रामुख्याने त्याने इतिहास पुरा करण्याचे काम केले असले तरी १८२४ मध्ये एकवार तो फ्रान्स, इटली, स्वित्झरलंड या भागांचा दौरा करून आला होता. प्रवासवर्णनाची लांबलचक अशी पत्रे तो एल्फिन्स्टनला वारंवार लिहीत असे. या त्याच्या पत्रातून अनेक विषय येत. रशिया–इंग्लंड संबंध, फ्रान्समधील तिसऱ्या नेपोलियनच्या काळातील राज्यक्रांती, जर्मनीच्या समस्या इत्यादी राजकीय विषयांपासून होमिओपथीसारखे विषयही त्यात येत. आपल्या बारीक पण वळणदार अक्षराने, उभा–आडवा मजकूर लिहून पानेच्या पाने तो भरून काढी. एल्फिन्स्टन आता वृद्ध होत चालला आहे, त्याचे डोळे खराब झाले आहेत, आणि आपल्या पत्रांच्या वाचनाचा त्याला त्रास होईल याची त्याला जाणीव होती. तो म्हणतो, " माझ्या या पत्रांतील गप्पांच्या वाचनामुळे तुमच्या डोळ्यांवर ताण पडत असेल असे मला प्रथमच वाटले असते तर यातील निम्मा भाग मी आगीत टाकला असता."[२०] (११–३–१८५४).

१८५२ मध्ये ग्रँटला आपण थकत चाललो आहोत याची जाणीव होऊ लागली असावी. तो लिहितो, " येथून पुढे मला अधिक शारीरिक हालचाली करता येतील असे वाटत नाही ".[२१] (४ जून, १८५२). १८५६ च्या एका पत्रात तो म्हणतो[२२], " माझी प्रकृती बरी आहे, पण माझी हृदयासंबंधीची जी जुनी तक्रार आहे त्याचा मला त्रास होतो, आणि माझी झोप उडते. मधून मधून डोळा लागतो. आता डोकेदुखी राहिली नाही. मात्र स्नायूंची शक्ती फार कमी झाली आहे असे अद्याप वाटत नाही. मला आता ६८ वे वर्ष चालू आहे. चाळीशी आपण ओलांडू शकू अशी माझी कल्पना नव्हती अथवा इच्छाही नव्हती ते दिवस मला आठवतात (२८–१०–५६).

---

२०. " If I thought you would read to strain your eyes with such gossip I would put half of what I have written into the fire. "

२१. " I am afraid I may not very long pursue my bodily activity. "

२२. " ....although I am very well, the old complaint of the heart which is now my only annoyance prevents sleep except by snatches, but I have no headaches, no great diminishing of muscular strength and am in my 68th year. I remember the time when I neither expected nor wished to survive my 40th.... " ( २८–१०–१८५६ )

ग्रँट पुढे फार दिवस जगला नाही. पण अगदी शेवटपर्यंत त्याचा एल्फिन्स्टनशी पत्रव्यवहार चालू होता. हिंदुस्थानात युरोपियन सोजीरच बंड पुकारतील असे १२ मार्च १८५८ च्या पत्रांत तो लिहितो. कंपनीची सत्ता आता संपुष्टात आली होती. ब्रिटिश सत्ता उदयाला आली होती. ग्रँटची शक्ती क्षीण क्षीण होत होती. शेवटी २८ सप्टेंबर १८५८ रोजी त्याने आपली इहलोकीची यात्रा संपविली.

आपल्या बापाने ६९ वर्षांपर्यंत तरी कसा पल्ला गाठला याचे माऊंटस्टुअर्टला आश्चर्य वाटते. तो म्हणतो, "इडनला मोकळचा हवेत राहिल्यामुळे, तसेच शिकार आणि मासेमारीत त्यांचा वेळ जात असल्यामुळे ते ६९ वर्षांपर्यंत जगू शकले. जर का ते परत हिंदुस्थानात गेले असते, अथवा इथल्या सार्वजनिक जीवनांत पडले असते तर कदाचित त्यांनी चाळीशी देखील ओलांडली असती किंवा नाही याची शंका वाटते."[२३]

---

२३. अप्रसिद्ध आत्मचरित्रातील भाग.

## २

# ऋणानुबंध

ग्रँट डफने १८२३ साली साताऱ्याचा निरोप घेतला, आणि परत तो भारतात कधीच आला नाही. आपल्या नोकरीचा देखील त्याने १८२७ साली राजीनामा दिला. त्याच्या राजीनाम्याची कारणे प्रकृतिअस्वास्थ्य, प्रापंचिक अडचणी ही असू शकतील. पण त्याबरोबर कंपनीच्या लष्करी आणि सनदी नोकरवर्गांत जो सत्तासंघर्ष सुरू झाला होता, त्याची झळ कदाचित आपल्याला पोहोचेल, आणि ज्या राजनैतिक कक्षेत (Diplomatic Line) आपल्याला वरची हुद्याची जागा मिळाली होती त्याचा त्याग करावा लागेल, याची देखील त्याला भीती वाटत असावी. तसेच त्याचा मित्र एल्फिन्स्टनही प्रकृतीच्या कारणावरून गव्हर्नर जनरलची बहुमानाची नोकरी सोडून परत येणार होता, हे एक कारण त्याला परावृत्त करण्यास पुरेसे झाले असावे.

कंपनीच्या नोकरवर्गांत असंतोष निर्माण झाला होता याचे प्रमुख कारण म्हणजे १८१७–१८ च्या सुमारास एल्फिन्स्टनने केलेल्या निरनिराळ्या नेमणुका हे होते. पेशव्यांशी युद्ध चालू असता एल्फिन्स्टनला विश्वासू माणसांची अत्यंत आवश्यकता होती. ही नवीन मंडळी केवळ कुशल प्रशासक असून भागण्यासारखे नव्हते. युद्धशास्त्राचे समर्पक ज्ञान त्यांना असणे जरुरीचे होते. त्यामुळे राजनैतिक कक्षेत त्याला युद्धविशारदांची नेमणूक करणे भाग होते. पेशव्यांकडून जिंकून घेतलेल्या प्रदेशावर या माहितगार सेवकांची त्याला गरज अधिक प्रकर्षाने भासू लागली आणि म्हणूनच महाराष्ट्रात एल्फिन्स्टनने ठिकठिकाणी लष्करी अधिकाऱ्यांची प्रशासक म्हणून नियुक्ती केली. पुण्यास कॅप्टन रॉबर्टसन, खानदेशास कॅप्टन ब्रिग्ज, अहमदनगरास लेफ्टनंट पॉटिंजर, साताऱ्यास कॅप्टन ग्रँट इत्यादी लष्करी अधिकाऱ्यांकडे प्रशासनाची कामगिरी सोपविण्यात आली.

एल्फिन्स्टनच्या या निर्णयामुळे साहजिकच कंपनीच्या खास मुलकी अधिकाऱ्यांना आपल्या हक्कांची बूज राखली नाही असे वाटू लागले. या त्यांच्या असंतोषातून पुढे हा संघर्ष निर्माण झाला. मुंबई कौन्सिलच्या अंमलाखालील ७५ मुलकी अधिकाऱ्यांनी नोव्हेंबर १८२० मध्ये आपले

ऱ्हाणे एल्फिन्स्टनपुढे मांडून ते कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडे प्रविष्ट करण्याची विनंती केली. अर्थात या निवेदनात काही आक्षेपार्ह आहे असे एल्फिन्स्टनला वाटले नाही. त्यांच्या भावनांची योग्य ती कदर करून आपल्या अभिप्रायासह ते निवेदन वरिष्ठांकडे पाठविले.

प्रस्तुत संदर्भात मुलकी अधिकारी, कौन्सिलचे सभासद, एल्फिन्स्टन, चीफ सेक्रेटरी, कोर्टाचा प्रेसिडेंट यांच्यामध्ये झालेला साराच पत्रव्यवहार मननीय आहे. एल्फिन्स्टनने प्रत्येक व्यक्तीच्या नेमणुकीचे समर्थन केले आहे. ग्रँटबद्दल त्याचे समर्थन असे की, "साताऱ्याचे नवे राज्य निर्माण केले तेव्हा त्यावर एका ब्रिटिश अधिकाऱ्याची नेमणूक करणे आवश्यक होते. कॅप्टन ग्रँट हा पुण्याच्या रेसिडेंटचा साहाय्यक होता, आणि पुण्याच्या कचेरीत राजनैतिक कक्षेतील दोन सद्गृहस्थांपैकी तो एक होता. बाजीरावाशी युद्ध चालू असता साताऱ्याच्या राजाकडे विशेष लक्ष पुरविण्याची कामगिरी त्याच्याकडे सोपविण्यात आली होती. राजाच्या सर्व प्रदेशाची संपादणी करून त्याची व्यवस्था लावण्याचे फार महत्त्वाचे काम त्याने केले. अद्याप तो राजाच्या चाकरीत आहे. राजनैतिक कक्षेतील एक महत्त्वाची जागा म्हणूनच त्याने हे पद स्वीकारले आहे."[१]

अर्थात एल्फिन्स्टनच्या पत्रामुळे सरकारचे संपूर्ण समाधान झाले नाही. लष्करी अधिकाऱ्याची एखाद्या मुलकी खात्यात कायम स्वरूपाची नेमणूक करू नये असेच सरकारचे मत होते. या सर्व घटनांकडे कदाचित ग्रँटचे लक्ष असावे, आणि भारतात परत गेल्यास पूर्वीच्या इतमामाने आपल्याला राहता येणार नाही असे वाटूनही त्याने कंपनीच्या नोकरीतून आपली कायमची मुक्तता करून घेतली असावी.

१८२३ साली ग्रँटने सातारा सोडले, पण अद्याप ऋणानुबंध संपले नव्हते. साताऱ्याचा राजा प्रतापसिंह साधारणपणे त्याच्याच वयाचा होता, त्यामुळे या दोघांची मैत्री लवकर जमली आणि ती शेवटपर्यंत टिकली. १८१८ ते १८२२ या चार वर्षांच्या छोट्या कालावधीत देखील ग्रँट या प्रदेशाच्या जीवनाशी समरस झाला होता. साताऱ्याचे राज्य, राजा आणि प्रजा यांच्या हिताची जाणीव त्याला शेवटपर्यंत होती. ग्रँट आणि राजा यांच्यामध्ये झालेला पत्रव्यवहार आज संपूर्णपणे उपलब्ध नसला तरी जी काही पत्रें हाती आली आहेत त्यावरून साताऱ्याच्या त्याच्या ऋणानुबंधाची कल्पना येते. राजाच्या आवडी-निवडी, राजाचे आप्त आणि अधिकारी,

---

१. महाराष्ट्र अर्काईव्हज् बुलेटिन नं. ६ पृ. १०.

प्रजा, शेतीव्यवसाय आणि सातारचे राज्य याबद्दल मधूनमधून त्याने विचारणा केली आहे. भारतातून एखादा माणूस आला तर प्रथम त्याच्याकडे तो राजाची चौकशी करीत असे.[२]

मायदेशी गेल्यावर अगदी पहिल्या आठदहा दिवसांतच ग्रँटने राजाला पत्र लिहिले आहे. त्यात तो म्हणतो, "साताऱ्याविषयी सगळ्या चांगल्या गोष्टी ऐकण्यास मी अत्यंत आतुर आहे. मेजर ब्रिग्ज मला लिहीलच, पण महाराजाना देखील माझा विसर पडणार नाही असा मला भरवसा आहे. जगातल्या कुठल्याही भागापेक्षा मला साताऱ्यात अधिक रस आहे." (११–७–१८२३)

ग्रँट नंतर ब्रिग्ज हा साताऱ्याचा पोलिटिकल एजंट झाला होता. राजाविषयी तो ग्रँटला वारंवार कळवीत असे. १८२४ च्या सुमारास युरोपच्या दौऱ्यावर असताना रोम शहरात त्याची गव्हर्नर जनरल लॉर्ड हेस्टिंग्जची भेट झाली. साहजिकच राजाविषयी बोलणे निघाले. आपल्या वैयक्तिक खर्चात कपात करून गरीब जनतेवरील करभार हलका करण्यासाठी राजाने केलेल्या प्रयत्नांची त्याने मुक्तकंठाने स्तुती केली होती. ग्रँटला समाधान वाटले. तो राजाला लिहितो, "मी जेथे जेथे जातो तेथे तेथे तुझ्या या सत्कृत्याचा पुनरुच्चार करण्यात मला फार अभिमान वाटतो." (१५–५–१८२४)

आपल्याविषयी आणि राज्याच्या उत्कर्षाविषयी ग्रँटला वाटणारी आस्था पाहून राजाचे मन भरून येते, आणि 'तुझ्या शिरस्त्याप्रमाणे मी राज्यकारभार करतो आहे; सारे ठीक आहे; तुझ्या प्रेमाने मी अगदी दडपून गेलो आहे असे तो त्याला लिहितो. (१–११–१८२४)

राजा सारे श्रेय ग्रँटला देत असला तरी राजा आणि त्याचे कारभारी हे देखील यशाचे वाटेकरी आहेत याची त्याला पूर्ण जाणीव होती, आणि म्हणूनच पत्रातून राजाबरोबरच तो विठोबा, दिवाण, दाजीबा, उपाध्ये, कुशाबा राजे, आप्पासाहेब, बळवंतराव राजे भोसले यांची वारंवार चौकशी करतो. विठोबा महाजनी दिवाण वारल्याचे वृत्त वाचून तो हळहळतो.

---

२. JIH पृष्ठे २२१ ते २३६; ३६८ ते ३८६.
डे. कॉ. रुमाल ५४ फा. १२ : ३१, ३२, ३३
पे. द. ४२ : ४५.

१८३० च्या शेवटी शेवटी रॉबर्टसनची त्याची भेट झाली. तो काही दिवस साताऱ्याचा रेसिडेंट होता. ग्रँटकडे त्याचा दोन दिवस मुक्काम होता. तेव्हा साहजिकच 'राजा आणि सातारा' या विषयावर दोघांचे मनसोक्त बोलणे झाले. त्यानंतरच्या पत्रात ग्रँट राजाला लिहितो "आपली सुकी(र्ति) व उत्तम नामना मेळविली आहे, श्रवण करून मला संतोष वाटला तो पत्रीं दर्शविता येत नाही; व ज्या गोष्टी आलीकडेस माझ्या श्रवणी आल्या आहेत तेणेकरून तर फारच हर्ष जाहाला. लॉर्ड उलियम बेनटिक कलकत्त्याचे गवरनर जनराल नुकतेच हिंदुस्थानांतून विलायतेस आले आणि आमच्या ऐकण्यांत आसे आले आहे की गवरनर जनराल साहेबांनीं आपले थोरपणाची उत्तम प्रकारे करून वाखाणी केली व बोलले की श्रीमंत माहाराज आपले रयतेला बहुत सुंदर आणि योग्य आहेत, आपले राज्य मोठ्या दक्षतेने आणि उदारत्वे करून चालवितात व आपला देश सुरक्षित राखिला आहे. इतके आसून कंपनीसरकारशी आत्रिम श्नेह करून मिळून आसतात. याजप्रा ो मी सदोदित आपेक्षा करितो कि जे जे उत्तरोत्तर गवरनर जनराल तिकडे येतील त्याणी आपली स्तुति बादशाहापासी करावी, जीपासून मला जल्मवर समाधान होईल."[३]

राजाला इंग्लंडहून काही मौल्यवान वस्तू विकत घेऊन पाठविण्याचे ग्रँटने कबूल केले होते, आणि त्याकरिता राजाने त्याच्याकडे काही रक्कम दिली होती. राजाला इंग्लंडहून एक चांगला कोच (बगी) हवा होता. त्याची किंमत ९७० ते १००० पौंडापर्यंत जाणार होती. १८२४ मध्ये तो त्याने पाठवून दिला. साताऱ्याला पाठविण्यापूर्वी लंडनच्या रस्त्यावर त्याचे सार्वजनिक प्रदर्शन घडविले होते. इतका भव्य कोच जगातील कुठल्याही राजपुत्रासाठी क्वचितच बांधला गेला असेल असे तेथील लोक म्हणत होते हा कोच तुला आवडला की नाही असे त्याने राजाला विचारले आहे (१५ मे, १८२४). तलवारी, पिस्तुले, काचेचे सामान इत्यादि वस्तू राजाच्या आवडीप्रमाणे पाठविल्या जात. एकदा त्याने एक कंकण आणि सोन्याचा दागिना पाठविला होता. कंकणात एक सुरेख घडयाळ बसविले होते. या वस्तू त्याने आपल्या पत्नीच्या पसंतीने घेतल्या होत्या. ग्रँटला वाटत होते की ते कंकण महाराजांच्या मनगटाला अथवा हाताला फारच लहान दिसेल. त्यावर कॅथेरिन, ग्रँटची बायको म्हणाली, "ठीक आहे. तसे

३. पे. द. ४२ : ४५ हे पत्र २९ डिसेंबर १८३३ च्या मूळ इंग्रजी पत्राचें भाषांतर आहे. येथे तारीख २५-८-१८३५ दिली आहे.

झाले तर मग राणीसाहेब ते वापरतील." यावर ग्रँट डफ लिहितो, "पाहिलस, बायका परस्परापासून कितीही दूर असल्या तरी आपल्या जातीचे हित साधण्यासाठी जवळ येतात त्या अशा." (१ जुलै, १८३०)

पैशाच्या बाबतीत ग्रँटचे व्यवहार चोख असत. राजाचे अद्याप २७०० रुपये त्याच्याकडे शिल्लक होते. ते तो फोर्बस आणि कंपनी अथवा कोणी व्यापाऱ्याच्या नावे पाठविणार होता (२४–८–१८३१). पण ग्रँट डफच्या एका पत्रावर टिपण लिहिताना आमच्याकडील एका संशोधकाने म्हटले आहे, "किमत (बिलोरी सामानास) जबर पडलेली दिसते. कदाचित डफचे कमिशनही त्यात असेल. डफ खर्चाचे बाबतीत ओढगस्तीत आला होता हे त्यानेच आपल्या प्रस्तावनेत लिहून ठेवले आहे. त्याला १७०० पौंड ब्रह्मस्व होते व त्याच्या पेचात तो होता."[४] वास्तविक ग्रँटला प्रथम असे वाटत होते की राजा आपले काही येणे लागतो, आणि म्हणून त्याने जेव्हा सारा हिशेब मांडला तेव्हा त्याला कळून चुकले की आपणच राजाचे सुमारे २७०० रु. पर्यंत देणे लागतो, आणि म्हणून त्याने ते हुंडीच्या रूपाने पाठविण्याची व्यवस्था केली आहे. प्रस्तुत संदर्भात राजा त्याला लिहितो, "तुम्ही स्नेहधर्माने, जे या युगात वागणूक इकडील लोकाविसी खरेपणाची ठेविली असे लोक थोडके. इकडील दिलात बहुत खुषी जाहाली त्याचा विस्तार लिहावा तरी फार बयान होतो सबब हंसील भाव लिहिला आहे."[५] (३–७–१८३२)

सातारा शहर सुंदर दिसावे असे ग्रँटला वाटत होते. त्याप्रमाणे त्याने रस्तेबांधणी आणि इतर काही लोकोपयोगी कामे हाती घेतली होती. प्रतापसिंहाने हे काम पुढे नेटाने चालू ठेवले. रस्ते बांधले, नहर बांधले, नळ टाकले, दोन तीन नवे बंगले बांधले, बागा केल्या, प्रताप-गडावर बंगला बांधला, भवानीच्या देवळाची दुरुस्ती केली, माल्कम पेठ वसविली, आणि पुरेसा पैसा उपलब्ध झाल्यावर साताऱ्यात ४–५ तळी बांधण्याचा आपला मनोदय बोलून दाखविला. या बातम्या वाचून आणि ऐकून ग्रँटला फार समाधान होई. आपल्या आणि पत्नीच्या मनात सातारा शहर एकदा येऊन पाहावे असे फार आहे असे तो राजाला लिहितो.

---

४. भा. इ. सं. म. त्रै. वर्ष ४ शके १८४५–४६, आबा चांदोरकर पृ. ९६–९७.

५. डे. कॉ. रु. ५५ फा. १२ (३१).

शैक्षणिक कार्यात राजा जातीने लक्ष घालतो याचे ग्रँटला फार कौतुक वाटे. १८२७ साली एल्फिन्स्टनने आपले गव्हर्नरपद सोडले तेव्हा त्याला निरोप देण्याचा मोठा समारंभ झाला आणि त्याला योग्य असे मानपत्र देण्यात आले. एल्फिन्स्टनची स्मृती कायम राहावी म्हणून त्याच्या नावे कॉलेज काढावयाचे निश्चित झाले होते. एल्फिन्स्टनला देण्यात आलेल्या मानपत्रात राजाचे नाव अग्रभागी पाहून ग्रँटला आनंद झाला· एल्फिन्स्टनसारखी व्यक्ती पुन्हा होणे नाही अशीच राजांची आणि इतरांचीही भावना होती. तो लिहितो, "या कॉलेजात योग्य प्राध्यापकाची निवड होईल याकडे तुम्ही जातीने लक्ष पुरविले पाहिजे. इंग्लंडमधून जे प्राध्यापक येतील त्यांनी फक्त पाश्चात्य विज्ञान येथील लोकांना शिकवावयाचे आहे याची त्यांना समज द्यावी." (८-६-१८२८). राजाच्या उदार आणि शिक्षणप्रेमी वृत्तीची कदर त्याला रॉयल एशियाटिक सोसायटीचे सभासदत्व देऊन करण्यात आली होती.

पण ग्रँटचे विशेष लक्ष होते ते त्याच्या राज्यकारभाराकडे. ब्रिग्ज, रॉबर्टसन, हेस्टिंग्ज आणि एल्फिन्स्टन यांनी त्याची तारीफ केली असली तर असेही त्याच्या कानी आले होते की राजा आता थोडासा आळशी बनला असून राज्यकारभाराचा बराचसा भाग तो वाड्यातच बसून करतो. याबाबत ग्रँटने त्याला बजावले आहे, हे तुझे करणे योग्य नाही; तुझ्या सरकारचे हित तू सर्व कारभार सार्वजनिकपणे कचेरीत बसून करण्यात आहे. कारण यथा राजा तथा त्याचे अधिकारी. तू जसे उदाहरण घालून देशील तसे तुझे अधिकारी वागतील. थोडक्यात कार्यप्रवणता, सावधानता, काटकसर आणि उदारता ही तुझ्या कार्याची चतुःसूत्री असली पाहिजे. ( Be active, vigilant, economical and liberal ) ( ८-६-२८ ).

यावर राजाने कळविले आहे की आपण आळशी तर बनलो नाहीच, पण कामात बराच वक्तशीरपणा आणला आहे. "राजवाड्यात बसूनच तू बरेच काम करतोस." असा जो आरोप त्याच्यावर केला होता, त्याबाबत तो म्हणतो की, "मी तुझेच अनुकरण करीत आहे. लोक तुला तुझ्या बंगल्यावर येऊन गाऱ्हाणी सांगत असत. आम्हालाही असेच वाटते की राजवाड्यावर येऊन लोक जास्त मोकळेपणाने बोलू शकतील. तुझ्या-प्रमाणेच अगदी रस्त्यावर देखील लोक भेटले तरी त्यांची विचारपूस करतो. ( १८-७-१८२९ )

राजाकडून आपल्या अपेक्षा पूर्ण होताहेत याची ग्रँटला खात्री पटत होती. तो म्हणतो, "तुझ्या राज्यकारभाराविषयी मी काही विचारू नये, पण तू निष्कर्जी आहेस, कंपनीशी झालेल्या तहाचे पालन करतोस, रयतेवरील करभार शक्य तेवढा कमी करतोस आणि प्रजेला न्यायाने वागवतोस असे मला सतत ऐकावयास मिळाले म्हणजे मला खरोखर अत्यानंद होईल."

कॅप्टन ग्रँटचा एक अत्यंत विश्वासू सहकारी अॅडॅम सातान्यात सर्व्हेअर म्हणून त्याच्यावेळेपासून अद्याप काम पाहात होता. अॅडॅम हा ग्रँटचा बालमित्र. त्याची बदली सातान्यास करून घेण्यासाठी ग्रँटला एल्फिन्स्टनकडे बरीच रदबदली करावी लागली होती. सातारा प्रांताची संपूर्ण पाहणी करून साराबंदी निश्चित करण्याचे काम त्याच्याकडे होते. अडॅम आपले काम उत्तम प्रकारे करीत होता. राजाचा देखील तो एक विश्वासू मित्र आणि सल्लागार बनला होता.

पण अॅडॅम हा सातान्यातच अचानक मरण पावला. त्याच्या या अकाली मृत्यूमुळे राजा आणि ग्रँट या दोघांना अत्यंत दुःख झाले. सातान्याची अॅडॅमने बरीच सेवा केली होती. राज्याची पाहणी केली, सातान्याचा विस्तृत नकाशा तयार केला, आणि राजाला वेळोवेळी मोलाचा सल्ला दिला. त्याच्या मृत्यूपर्यंत ( १८२९ ) सातान्यात सारे काही ग्रँट साहेबाच्या दस्तुराप्रमाणे चालले होते. सातारकरांना त्यांची स्मृती कायम राहावी म्हणून त्याचे थडगे बांधावे अशी त्याने राजाला सूचना केली आणि राजाने ती मान्यही केली होती.

ग्रँट जसा राजाला विसरला नव्हता तसेच सातान्याच्या लोकांनाही तो विसरला नव्हता. 'रयतेचे सुख' राजाने सतत आपल्या डोळ्यासमोर ठेवले पाहिजे असे त्याचे म्हणणे असे. राजाच्या हिताचे असे त्याला जे वाटे ते तो निर्भीडपणे सांगत असे. आपला सल्ला नेहमीच कदाचित शहाणपणाचा नसेल, पण त्यात अप्रामाणिकपणाचा वास तरी कोणाला येणार नाही याची त्याला खात्री वाटे. ( १७-११-१८२९ )

राजाने वर्षातून किमान एक पत्र तरी लिहावे अशी ग्रँटची अपेक्षा होती. साधारणपणे एप्रिलमध्ये हे पत्र लिहावे कारण या सुमारास महालातील जमाबंदी संपते, आणि सारा मजकूर मार्चअखेरपर्यंत समजून येतो 'नंतर पत्री लिहिण्यास नीट पडते.'[६] त्यावेळी सामान्यतः सहा महिन्यांनी पत्र लंडनला पोहोचत असे.

---

६. डे. कॉ. रु. ५५ फा. १२ (३१).

साताऱ्यात रयतवारी पद्धती रूढ करण्यात आली होती. अर्थात ही पद्धती राबविण्यास अत्यंत त्रासदायक आणि खर्चाची असली तरी ती परिणामी हिताची आहे अशी ग्रँटची समजूत होती. कारण राजाला आपल्याला काय मिळणार आहे आणि प्रजेला आपल्याला काय द्यावे लागणार आहे याची निश्चित कल्पना या पद्धतीमुळे येते. कायमधाऱ्याची पद्धती अस्तित्वात आली तरी रयतेला आवश्यक तेव्हा सूट दिली पाहिजे. एखाद्याने जिरायत जमिनीचे बागायतीत रूपांतर केले तर अशा प्रकारच्या कार्याला उत्तेजन म्हणून पहिली पाच वर्षे तरी साऱ्यात वाढ करू नये, आणि पुढेसुद्धा तो क्रमाक्रमाने वाढवावा अशा सूचना ग्रँटने दिल्या होत्या आणि जाहीरनामे काढून राजाने त्याच्या काही सूचनांचे पालनही केले होते.

पण शेतीव्यवसाय हा सर्वस्वी पर्जन्यावर अवलंबून असल्यामुळे रयतेचे हित सातत्याने साधणे कठीण पडत असे. तशात १८३० साली एक प्रकारची मंदी सर्वत्र पसरली होती. त्यामुळे शेतीमालाचे दर पडले होते, रोजगार बसले होते. राजा लिहितो, " हाली माहालाची जमाबंदी स्वस्ताईमुले व दरसाल प्रजन्य कमी व रयतलोकास रोजगार अगदी नाही व जिनसाचा खपही होत नाही यामुले वसूल फार कमी होतो तथापि जमेविसी व खर्चाविसी बहुत मेहनत करून जमाखर्चास मेळ घालून कर्ज न होता वहिवाट चालविली आहे."[७]

जमिनीवर मालकी हक्क कोणाचा याबद्दल त्यावेळी बरीच चर्चा इंग्रज अधिकाऱ्यांत चालू होती. ब्रिग्ज याने या विषयावर अभ्यास करून एक पुस्तकही लिहिले होते. त्याच्या मते जमिनीवर मालकी राजाची अथवा कोणत्याही सरकारची नसून ती त्या गावाची म्हणजे त्या गावच्या रहिवाश्यांची आहे. त्यामुळे जमिनीची मोजणी करणे आणि प्रत्येक रयतेला सारा बांधून देणे या गोष्टी इष्ट नाहीत. ब्रिग्जच्या या विचारसरणीशी ग्रँट सहमत नव्हता; पण इंग्लंडमधील लोकांना हिंदुस्थानच्या परिस्थितीचे पूर्ण ज्ञान नसल्यामुळे, त्यांना कदाचित ब्रिग्जची विचारसरणी मान्य होईल अशी त्याला भीती वाटत होती. ग्रँटचे म्हणणे असे होते की, जमिनीची मोजणी आणि पीकपाणी या आवश्यक बाबी आहेत. जमिनीचा सारा वीस वर्षांकरिता बांधून द्यावा, पण हा सारा निदान पहिली दह

---

७. डे. कॉ. रु. ५५ फा. १२ (३१).

वर्षे तरी पाहणीतून निर्माण होणाऱ्या दरापेक्षा कमी असावा. ही पद्धती राबविण्यात अडचणी आल्या तरी हा प्रयोग करून पाहिला पाहिजे.

साताऱ्याच्या शेतीचा विचार करीत असताना संपूर्ण भारताच्या आबादीचाही विचार आणि तेही भारत देश कायमचा सोडून गेल्यावर त्याने कसा केला आहे हे पाहणे स्तुत्य ठरेल. रयत दुःखी आहे याचे मूळ कारण दारिद्र्य, आणि त्याच्या जोडीला आपल्या वित्ताविषयी आणि जीविताविषयी तिला वाटणारी भीती. पण जमिनीची पाहणी करून सारा निश्चित केला आणि कसण्यासाठी लांब मुदतीने जमिनी दिल्या, आणि लागवडीखाली आणलेल्या प्रत्येक जमिनीच्या तुकडयावर साऱ्यात काही टक्के सूट दिली तर अगदी थोडया काळांत लोकांची स्थिती सुधारेल. ही योजना सर्वत्र लागू झाली आणि साखर, तंबाखू, मसाले आणि काही औषधी-द्रव्ये इत्यादि भारतीय मालाची निर्यात होऊ लागेल, आणि या देशातील आयातीवरील कराचे दर थोडे कमी झाले म्हणजे भारत आणि इंग्लंड या दोन्ही देशांची उन्नती होईल. या मार्गात सध्या जरी काही अडचणी असल्या तरी भविष्यकाळात या गोष्टी निश्चित घडतील असा त्याचा भरवसा होता.

भारत हा शेतीप्रधान देश असल्यामुळे शेतीचे उत्पादन वाढणे आवश्यक होते. औद्योगिक क्रांतीतून निर्माण झालेल्या अवजारांचा या कामी कितपत वापर करता येईल याचाही विचार ग्रॅंटने केला होता. इंग्लंडमध्ये या सुमारास गहू, बार्ली, वाटाणे इत्यादि कडधान्यांची मळणी करण्यासाठी एका यंत्राचा वापर केला जात असे. या यंत्रामुळे कडब्यातून सारा दाणा मळला जात असे, आणि धान्याची नासाडी कमी होत असे. ग्रॅंटला वाटत होते की या यंत्राचा वापर ज्वारी, बाजरी, मठ, मूग इत्यादि कडधान्यांच्या मळणीसाठी भारतही करू शकेल, आणि या पद्धतीमुळे किमान $\frac{1}{4}$ अधिक धान्य मळता येईल असा त्याचा विश्वास होता. शिवाय वेळेची बचत होणार होती. एका दिवसाचे काम हे यंत्र एक तासात करू शकले असते. वाया जाणाऱ्या धान्यामुळे किती लोकांची पोटे भरली असती याचा जरी विचार केला तरी ही योजना स्वागतार्ह होती. हे यंत्र चालविण्यास, पाणी, वारा, वाफ, घोडे, बैल यांपैकी कोणतीही शक्ती चालली असती. ग्रॅंटने राजासाठी एक छोटे, सहजासहजी हलविता येईल आणि बैलांच्या मदतीने चालविता येईल असे स्वतंत्र यंत्र तयार करून घेण्याचे योजिले होते. राजाकडून संमती आली असती तर ते तो तयार करून घेणार होता. तसे घडले असते तर हे नवे यंत्र भारतात प्रसृत करण्याचे श्रेय राजाला मिळाले असते आणि एक दिवस असा उजाडला असता की या यंत्राचा खेडयाखेडयातून

प्रसार झाला असता. एक ओतीव लोखंडाचा भाग सोडला तर या यंत्राचे बरेचसे इतर भाग भारतात तयार करता येतील आणि कालांतराने भारतात लोखंडी कारखाने सुरू झाले म्हणजे सर्वच भाग करता येतील असे त्याचे म्हणणे होते. (१–७–१८३०)

या पत्रावरून सातारा आणि भारत यांची आर्थिक उन्नती व्हावी, रयत सुखी व्हावी याचा ग्रँट कसा विचार करीत होता याची कल्पना येते. महाराजांनी मात्र या यंत्राच्या बाबतीत विशेष उत्साह दाखविला नाही.

१८३० च्या मंदीसंबंधी ग्रँटने आपल्या एका पत्रात बरीच विस्तृत चर्चा करून राजाने या काळात कसे वागावे यासंबंधी मार्गदर्शनही केले आहे. जगांतील बऱ्याच सरकारांनी या काळात सारा कमी करून आपल्या खर्चात कपात केली होती. या मंदीचे प्रमुख कारण म्हणजे या सुमारास अमेरिकेच्या सोनेचांदीच्या खाणीतील उत्पादनात झालेली घट, आणि त्याच्या जोडीला ब्रिटिश सरकारने स्वीकारलेली सुवर्णमुद्रा चलनपद्धती ही होत. त्यामुळे इतर ठिकाणचे सुवर्ण कमी झाले, आणि पैसा महाग आणि वस्तू स्वस्त अशी परिस्थिती निर्माण झाली. ही परिस्थिती कशी सुधारता येईल यासाठी सेवानिवृत्त अधिकाऱ्यांच्या मुलाखती घेतल्या जात होत्या. ग्रँटने आपल्या मुलाखतीत असे सुचविले होते की, भारतीय मालाच्या युरोपातील आयातीवर अगदी कमी कर आकारला तर भारतीय जनतेवरील अरिष्ट टळेल. भारताचे हित साधण्यासाठी ब्रिटिश पार्लमेंट योग्य ती कारवाई करील असे त्याला वाटत होते.

परंतु तरीसुद्धा प्रस्तुत संकटाला तोंड देण्यासाठी, रयतेवरील करात आणि सरकारी खर्चात कपात करावी, आणि याची सुरवात राजाने स्वतः-पासून करावी असे त्याने सुचविले आहे. राज्यकारभार कार्यक्षम आणि निर्मळ असावा, दिखाऊपणासाठी, विशेषतः घोडी आणि घरे यांवर होणाऱ्या खर्चात कपात करावी असे त्याचे मत होते. राजाने सातारा शहर सुधारण्याची योजना हाती घेतली होती. एकेकाळी त्याला या गोष्टीचे फार कौतुक होते. मॉरिस आणि ॲडॅम या आपल्या जुन्या सहकाऱ्याकडून साताऱ्याच्या या बदलत्या स्वरूपाबद्दल त्याने खूप ऐकले होते. ते सारे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहण्याची इच्छा त्याने व्यक्त केली होती. पण मंदीच्या काळात कारागीर आणि मजुरांना उत्तेजन देण्यासाठी राज्याच्या एकाच भागावर इतका पैसा खर्च करणे योग्य ठरणार नाही, अशा वेळी राजधानीची

वाढ हे राज्याच्या भरभराटीचे लक्षण नसून विनाशाचे आहे हे विसरता कामा नये, असे त्याने बजावले होते. आपले म्हणणे अधिक स्पष्ट व्हावे म्हणून त्याने विजापूर शहराचा दाखला दिला आहे. आदिलशाही राजवटीत विजापुरास भव्य इमारतींचे बांधकाम झाले ते तेथील लोकांना पिळून होय. त्या इमारती म्हणजे राजाच्या मूर्खपणाची कायमची नोंद, जागती निशाणी असेच म्हणावे लागेल. थोडक्यात अनावश्यक अशा दिखाऊपणाच्या गोष्टींवर होणाऱ्या खर्चात कपात करून शहाणपणाचा आदर्श इतरांपुढे ठेव असे ग्रँट राजाला आग्रहपूर्वक बजावतो.

रयतेचे शोषण करता कामा नये, तिच्या हाती विपुल पैसा राहील असे करणे हीच एक उत्तम बचतयोजना होय. या योजनेची किमया अशी की राजाला इतर कोणत्याही संचयापासून मिळणार नाही इतके भरघोस व्याज मिळेल. सारा कमी ठेवण्याच्या मागचा प्रमुख हेतू म्हणजे राजाला प्रजेने शिव्याशाप देण्याऐवजी धन्यवाद द्यावेत असा होता.

काटकसर म्हणजे पगारकपात नव्हे हे ग्रँटने स्पष्ट केले आहे. काट-कसर म्हणजे खाजगी खर्चात कपात, ज्या गोष्टी विनासायास टाळता येतील त्या टाळणे, असे ग्रँटचे म्हणणे होते. जमीनसारा एकदा ठरविलेला आहे, त्यात बदल होणार नाही अशी ताठर भूमिक घेऊ नये; मालाच्या किमती आणि उत्पादनखर्च यांचा विचार करून त्यांत आवश्यक ते बदल करावेत, असा सल्ला त्याने दिला आहे.

जमिनीवरील खंडाचे प्रमाण कमी करणे आणि खर्चात कपात करणे ही तत्त्वे राजाने मान्य केली होती. राजाचा त्याच्या मागे सारखा एक लकडा असे आणि तो म्हणजे तू तुझ्या खाजगी जीवनाबद्दल लिहीत जा. पहिल्या एकदोन पत्रांत ग्रँटने आपल्या वतनवाडीचा, पत्नीचा, मुलांचा उल्लेख केला आहे पण पुढच्या साऱ्या पत्रांत राजा आणि सातारचे राज्य याखेरीज दुसरा विषय नाही. कदाचित हा विषय निघाला की तो स्वतःला विसरून जात असेल अथवा तो म्हणतो त्याप्रमाणे, मी याशिवाय दुसरे काय लिहिणार? पत्र लिहिताना आपल्याला राजाशी संभाषण केल्यासारखे वाटते असे म्हणून एकदम तो हिंदुस्थानीत लिहायला प्रारंभ करतो, "हम नु लिखते राजा को तख्त पर—मैं लिखता हूं अपने दोस्त को—उसके खिलवत खाने मे—कुभु दो बात की सुलत बोता कुभी दसबात छूप अपन गपशप आदत से अलबत्ता लिखने चाहिये, लेकिन माहाराज को मालूम है कि खुशमद की बात मेरा दस्तुर नहीं कोई वक्त महाराज बहुत घूपा होया होयेगा मेरे उप्पर—लेकिन महाराजने अपने दिलको पूछा

किस के करनेसे हमारा आच्छा होया अगर अब माहाराज दुश्मन के खुशमदसे, (इंग्रजींत म्हण आहे की, उघड शत्रू कदाचित शाप असेल, पण छुपा मित्र हा त्याहून भयंकर असतो) और बुरा अदबसे चाहता नु इस तरह किया दोस्ती कु भला हम किया" आणि पुढे कबुली देतो की आपले हिंदुस्थानी आता विसरू लागले आहे.[८]

१८३३ नंतरचा राजा आणि ग्रँट यांच्यामधील पत्रव्यवहार उपलब्ध नाही. राजा आणि रेसिडेंट यांचे जहागिरदार आणि सरंजामदार यांच्या प्रश्नावरून खटके उडावयास सुरवात झाली होती. सातारा राज्यावर संकटे आली असता चुकते कोठे यासंबंधीचे आपले विचार निर्भीडपणे त्याने एल्फिन्स्टनला वारंवार कळविले होते. पण कंपनी सरकार त्याचा सल्ला घ्यावयास तयार नव्हते. सातारा राज्य आणि राजा वाचले पाहिजेत अशी त्याची भावना होती. "सातारा देश माझा खासगत असता तर इतके अगत्ये केले नसते, परंतु आपले देशाचे सर्वकाळ हित व्हावे"[९] हीच त्याची भावना होती. राजाबद्दलचे त्याचे प्रेम पाहून या दोघांचे जन्मोजन्मीचे ऋणानुबंध असावेत असा भास व्हावा.

पुढे १८३९ ला प्रतापसिंहाला जेव्हा पदच्युत करण्यात आले आणि आप्पासाहेबाला गादीवर बसविले, तसेच १८४८ साली हे राज्य खालसा केले गेले तेव्हा वेळोवेळी ग्रँटने आपली मते निर्भीडपणे एल्फिन्स्टनला कळवून कंपनी सरकारचे कसे चुकले हे दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे. साताऱ्याचा राजा आणि त्याचे राज्य हे अशा रीतीने आपल्या डोळ्यादेखत नाहीसे व्हावे, आपण लावलेले रोपटे, जे डौलाने वाढत चालले होते ते असे एकाएकी उखडून टाकले जावे याची खंत त्याला शेवटपर्यंत लागून राहिली. साताराप्रकरणात ब्रिटिशांची वागणूक प्रामाणिकपणाची नव्हती याबद्दल त्याच्या मनात शंका नव्हती.

अशा रीतीने ग्रँट मराठ्यांच्या जीवनाशी तद्रूप झाला होता. लोक मला येथे मराठा म्हणतात, मराठ्यांच्या चालीरीतींचे मला जितके ज्ञान आहे तितके इथल्या लोकांच्या चालीरीतींचे नाही याची कबुली देणारा, आपल्या पत्रांतून मधूनमधून मराठी शब्दांचा आणि वाक्प्रचारांचा वापर करणारा ग्रँट डफ, तो म्हणतो त्याप्रमाणे खरोखरीच 'एक गरीब मराठा माणूस होता', ब्रिग्जप्रमाणे गाय मारणारा तुर्क अथवा पठाण नव्हता. आणि

८. IIH पृ. ३८३ ता. २९-१२-१८३३.

९. पे. द. ४२ पृ. ९०.

म्हणूनच मराठ्यांचा इतिंहास लिहिण्यास तो अधिक योग्य होता. मराठ्यांच्या इतिहासाचे स्वरूप वैचित्र्यपूर्ण आहे, त्याच्या मर्यादा विस्तृत आहेत. पण असे असले तरी या लोकांच्या इतिहासलेखनाचे प्रचंड काम एकट्याने कमीत कमी वेळात केले हा ग्रँट डफचा मोठा विक्रमच मानला पाहिजे.[१०]

कृष्णराव रामराव चिटणीस या समकालीनाने निरनिराळ्या वृत्तांत आणि पद्यमय भाषेत प्रतापसिंहाचे चरित्र रचले आहे, त्यातील ग्रँट डफ संबंधीचे उद्‌गार मोठे सूचक आहेत.

ग्रांटसाहेब बडो धूर । सब राजनमो महशूर ।
उसे राजा प्रताप चतुर । मिलाय लिया अपनेमे ।। ११ ।।

चार बरस उसके साथ । बहुत मिठी बोलत बात ।
हा मनजा नोक बहुभात । सबहि राजराजकी ।। १२ ।।

जैसा बात कहत ग्रांट । वैसा दिलमो करत साट ।
राजकारन सबही बाट । लई ध्यान आपने ।। १३ ।।

दोन दील करके पाख । मुलुख कमाय तीस लाख ।
साहेब पास बडी साख । प्रतापसिंग राजकी ।। १४ ।।

---

१०. भारतवर्ष : श्रीप्रतापसिंह चरित्र, पृ. ९ (मंडळप्रत पृ. ५३८).

# ३

# सातारा

ब्रिटिशांची सत्ता महाराष्ट्रात रुजविण्याच्या कामी ज्या व्यक्ती कारणीभूत झाल्या त्यात एल्फिन्स्टनचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. १७९६ ते १८२७ या त्याच्या ३१ वर्षांच्या ईस्ट इंडिया कंपनीच्या सेवेतील २५ वर्षे पुण्यामुंबईत गेली होती. तो प्रथम पुण्यास आला तो कर्नल क्लोज या रेसिडेंटचा दुय्यम सहकारी म्हणून. पुढे १८०८ साली त्याची काबूलच्या कामगिरीवर रवानगी झाली, पण तेथून १८११ साली परत आला तो पुण्यास रेसिडेंटच्या जागी. १८१८ मध्ये पेशव्यांचा पाडाव करून जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था करण्याचे काम पर्यायाने त्याच्याकडे आले. पुण्यास आता रेसिडेंटची आवश्यकता नव्हती, म्हणून एल्फिन्स्टनच्या हुद्यात कमिशनर असा बदल केला. पुढे १८१९ चे १८२७ ही आठ वर्षे मुंबई इलाख्याचा गव्हर्नर म्हणून तो राहिला. सतत २५ वर्षे महाराष्ट्रात राहिल्यामुळे, हा प्रदेश, येथील लोक, त्यांच्या चालीरीती याची त्याला बरीच माहिती झाली होती. खोल दऱ्या आणि उंच उंच गिरीशिखरे असलेल्या या राकट, दगडांच्या देशात परकीय सत्ता स्थिर करणे फार जिकीरीचे काम होते. आजपर्यंतचा इतिहासाचाही दाखला तसाच होता. परंतु ब्रिटिशराज्य महाराष्ट्रात विनासायास आणि द्रुतगतीने प्रस्थापित झाले याचे बरेचसे श्रेय एल्फिन्स्टन आणि चॅपलिन, पॉटिंजर, रॉबर्टसन, ब्रिग्ज आणि जेम्स ग्रँट डफ या त्याच्या सहकाऱ्यांनाच द्यावे लागेल.

एल्फिन्स्टन हा मूलतः उदारमतवादी होता. एक उत्कृष्ट प्रशासक म्हणून त्याने जी कीर्ती संपादन केली त्याचे मर्म त्याच्या उदारमतवादी विचारसरणीत आणि सहानुभूतीच्या धोरणात आढळेल. एकापरीने एल्फिन्स्टन हा वृत्तीने सनातनी होता. महाराष्ट्रातील स्थानिक संस्था, समाजरचना यात क्रांतिकारक बदल केले पाहिजेत असे त्याला वाटत नव्हते. ही समाजाची चौकट, या संस्था अद्याप टिकून आहेत तेव्हा त्या त्याज्य कशा मानता येतील, असे त्याचे म्हणणे होते. नवीन राजवटीत त्यांचे निर्मूलन करण्यापेक्षा त्या अधिक कार्यक्षम बनविल्या तर परिणामी ते लोकांच्या हिताचे ठरेल अशी त्याची समजूत होती. ब्रिटिश मुत्सद्दे-

गिरीचा हा पारंपारिक सनातनीपणा एल्फिन्स्टनने भारताच्या राज्य-कारभारासाठी स्वीकारला होता असे म्हणावे लागेल. तो म्हणत असे की परकीय सत्ता ही लोकांना निःसंशयपणे जाचक वाटते. तेव्हा विजेत्यांनी हे जाचकतेचे प्रमाण किती अंशी कमी करता येईल याचा विचार करावयास हवा.

त्याच्या अशा या विचारसरणीतूनच सातारा राज्याची निर्मिती झाली आहे. गव्हर्नर जनरलने साताऱ्याबाबत दोन पर्याय सुचविले होते. पहिला असा की राजाला एक जहागीर देऊन त्याला स्वस्थ बसवावे. दुसरा पर्याय असा की राजाला मर्यादित सार्वभौमत्व द्यावे. एल्फिन्स्टनने दुसरा पर्याय स्वीकारला. याच्यामागे अर्थात काही मुत्सद्देगिरीचा वास येणे स्वाभाविक आहे. साताऱ्याचे स्वतंत्र राज्य निर्माण केल्याने छत्रपती आणि त्याचे अनुयायी यांचे सहकार्य त्याला निश्चितपणे मिळाले असते. शिवछत्रपतीच्या वंशजाला गादीवर बसविल्याचे श्रेय इंग्रजांना मिळाले असते. कंपनीने लोकांची अशी समजूत करून देण्याचा प्रयत्न केला होता की, त्यांचा लढा शिवशाहीशी नसून तिच्या पुंड अधिकाऱ्यांशी म्हणजेच पेशव्यांशी आहे. छत्रपतींकडून 'मराठी सत्ता' पेशव्यांनी बळकावली, आणि 'ब्राह्मणी मसनद' प्रस्थापित केली. ती मसनद नष्ट करून लोकांना या जुलमी राजवटीतून मुक्त करण्याचे व लोकांचा राजा जो छत्रपती त्याला मर्यादित स्वरूपाचे का होईना पण राज्य द्यावयाचे आपले धोरण कंपनीने जाहीर केले.

२० फेब्रुवारी १८१८ रोजी झालेल्या गोपाळ अष्टीच्या लढाईने मराठी सत्तेचा नाश जवळ ओढून आणला. आपल्या अंगावरील जखमा शालजोडीने बांधून बापू गोखला मोठ्या शर्थीने लढला, पराक्रमाची शिकस्त केली, पण शत्रूच्या निकराच्या माऱ्यापुढे त्याचा टिकाव लागला नाही. बापू गोखला रणांगणावर पडला, तसा मराठी सैन्याचा धीर खचला, ते सैरावैरा पळू लागले, आणि इंग्रजांची सरशी झाली. अष्टीच्या लढाईचे महत्त्व म्हणजे, या लढाईने मराठी राजा इंग्रजांच्या हाती लागला.

राजा इंग्रजांच्या हाती आला ही फार मोठी घटना घडली होती. ब्रिटिश इंडियन ॲडव्होकेट या नियतकालिकात म्हटले आहे, "राजाची सुटका झाली अथवा तो आपणहून आमच्या स्वाधीन झाल्यामुळे दक्षिणेतील युद्ध संपुष्टात आले. मराठे सरदार, जहागीरदार हे पेशव्याला—बाजी-रावाला मान देत होते याचे कारण तो राजाचा प्रतिनिधी होता. अष्टीच्या लढाईतील आपल्या यशाला महत्त्व प्राप्त झाले आहे ते आपल्या पराक्रमा-

मुळे, अथवा पेशव्यांचा पराभव झाल्यामुळे अथवा बापू गोखले धारातीर्थी पतन पावल्यामुळे नसून राजाला आपल्या सुदैवाने आपण हस्तगत करू शकल्यामुळे होय. सैन्याबरोबर असलेला आमचा पोलिटिकल एजंट एल्फिन्स्टन आणि मुंबई सरकार यांना या घटनेचे महत्त्व पुरेपूर कळले होते आणि म्हणूनच त्यांनी ही बातमी तातडीचे जहाज पाठवून मायदेशातील आपल्या सरकारला कळवून त्याला धन्यवाद दिले. त्या काळात तातडीचे जहाज अगदी क्वचित आणि फारच महत्त्वाच्या प्रसंगी पाठवीत असत."[१] यावरून राजा हाती येणे ही घटना किती मोलाची होती याची कल्पना येते.

एल्फिन्स्टनने सातारा शहर आणि किल्ला यापूर्वीच काबीज केला होता, पण राजा अद्याप गवसला नव्हता. राजा आणि मातुश्री आईसाहेब यांच्याशी त्याची गुप्त बोलणी चालू होती. ११ फेब्रुवारी १८१८ रोजी त्याने हे राज्य छत्रपतींचे होईल असे जाहीरही केले होते. कदाचित छत्रपतींच्या पूर्वसंमतीनेच त्याने अशी घोषणा केली असेल, आणि म्हणूनच राज्य स्वाधीन करण्यासाठी राजा हाती येणे आवश्यक होते. या जाहीरनाम्यात म्हटले होते :—

"बाजीराव पेशव्याच्या कैदेत असलेल्या सातारच्या महाराजांना आम्ही मुक्त करणार आहो; व त्यांना व त्यांच्या कुटुंबियांना सुखाने व

---

१. The British Indian Advocate P. 477.
(Quoted in भारतवर्ष) "The rescue of the Raja or rather, his giving himself to us at the battle of Ashta terminated the Deccan War. The tributory chiefs of the Maratha empire owed obedience to Bajee Rao, the Peshwa, only in so far as he was the organ of the Raja. Our victory at Ashta, owed its importance not to the gallant action, or to the defeat of the Peshwa, or to the death of Gokhla, but our good fortune in obtaining the person of the Raja. The Hon'ble Mr. Elphinstone, the Political Agent with the army, foresaw this, the Govt. of Bombay also foresaw it,—and, in consequence sent an overland express to communicate it, with their congratulations to the Govt. at home. An overland express in those days was only had recourse to upon some rare and important occasion."

वैभवाने राहता येईल एवढ्या मोठ्या विस्ताराचे स्वतंत्र राज्य करून देणार आहो. याच उद्देशाने आम्ही सातारचा किल्ला व त्यावर महाराजांचा झेंडा उभारला आहे. "[२]

या जाहीरनाम्याच्या आधारे लोकांची मने तयार करावयाची व राजा हाती लागताच बाजीरावाला पदच्यूत करावयाचे असा इंग्रजी कावा होता. अष्टीच्या लढाईने इंग्रजांना हात दिला, आणि माईसाहेब, प्रतापसिंह आणि त्याचे दोन बंधू ही राजकुटुंबीय मंडळी जनरल स्मिथच्या हाती लागली. त्याची हकीकत सांगितली जाते ते अशी—

"बापू गोखले मृत्यू पावल्यानंतर पेशव्यांचे सैन्य उधळून जाऊन चारी दिशेस पळू लागले व त्यांचे मागे इंग्रज सैन्य एकसारखे पाठलाग करू लागले. त्यावेळी सातारचे महाराज आपले मातुश्रीसह एका झाडाखाली बसले होते. त्यांच्याकडे काही गोरे स्वार धावत आले व त्यांनी हे शत्रूचे लोक समजून त्यांजवर हल्ला केला. त्यांनी हल्ला करताच सातारचे बालराजे प्रतापसिंह ह्यांनी आपली समशेर उपसून ती सज्ज केली. युरोपियन स्वारांनी समशेर खाली ठेवण्याबद्दल आग्रह केला, परंतु हे पाणीदार छत्रपती ती खाली ठेवीनात. युरोपियन स्वार आपल्या मुलांचा आता संहार करणार असे पाहताच छत्रपतींच्या मातुश्री दुःखाने आक्रंदू लागल्या व त्यास 'हे सातारचे महाराज' म्हणून सांगू लागल्या. परंतु ते घोडेस्वार काही केल्याने ऐकेनात. त्यांनी सातारच्या महाराजांचे शौर्य पाहून त्यांच्यावर तलवार फेकली, तोच कर्नल प्रिंगल टेलर नामक एक जनरल स्मिथ ह्यांच्या हाताखालचे सेनापती तेथे धावत आले, आणि त्यांनी आपल्या तलवारीचा हात एकदम पुढे करून छत्रपतीवर पडणारा वार मोठ्या शिताफीने वरच्यावर झेलून घेतला, आणि घोडेस्वारास मागे परतवून सातारच्या महाराजास आपल्या छावणीमध्ये नेले. "[३]

---

२. "The Raja of Sattara, who is now a prisoner in Bajirao's hands, will be released and placed at the head of an independent Sovereignty, of such an extent as may maintain the Raja and his family in comfort and dignity. With this view the fort of Sattara has been taken, the Raja's flag has been set up in it. . . . "

Maharani Sagunabai's Appeal P. 107. (र. गो. राणे: प्रतापसिंह महाराज पृ. ८३.)

३. भारतवर्ष, ग्रँट डफचे चरित्र भाग २ पृ. १३; मराठी दप्तर रुमाल नं. २ पृ. २८.

स्मिथला अर्थात राजाचा कब्जा मिळाल्यामुळे फार आनंद झाला. राजाचा सांभाळ करणे ही मोठी जोखमीची कामगिरी होती, म्हणून एल्फिन्स्टनला तो लिहितो की, "तू सत्वर या राजाचा ताबा घे, राजाची मंडळी म्हणजे मला एक कटकट झाली आहे. त्यांना सोडून मी कोठे जाऊ नये असा त्यांचा लकडा माझ्या मागे आहे, आणि ही सारी मंडळी माझ्याबरोबर असल्यामुळे मी काही महत्त्वाचे काम करू शकत नाही.... शिवाय तुला भेटण्याची त्यांची तीव्र इच्छा आहे, तेव्हा तू लवकर येऊन माझी सुटका कर."[४] (२०-२-१८१८)

स्मिथच्या पत्रानुसार एल्फिन्स्टन राजाला भेटावयास ४ मार्च १८१८ रोजी स्मिथच्या छावणीत आला. राजा आणि त्याचा परिवार यांना तो प्रथमच भेटत होता. तेव्हा ही सारी मंडळी दिसली कशी, वागली कशी याची नोंद एल्फिन्स्टनने ठेवली आहे. तो म्हणतो, "राजा हा सुमारे २० वर्षांचा[५], फारसा रूपवान नाही, मोकळ्या मनाचा, आनंदी आणि तरतरीत वाटला. त्याचे भाऊ त्याच्यासारखेच, पण थोडेसे देखणे वाटले. माईसाहेब या बुद्धिमान आणि कुशाग्र अशा वाटल्या. या उतारवयात देखील त्या सुंदर दिसत होत्या, आणि त्यांचे डोळे सुरेख होते."[६]

माईसाहेबाविषयी एक इंग्रज प्रवासी म्हणतो, "ही बाई घोड्यावर बसण्यात फार प्रवीण होती. मूळच्याच सौंदर्यास तिचा भरजरी पोशाख चांगला खुलून दिसे. ती पड्यातून उघडपणे बाहेर येऊन भेटी घेई त्यावेळी तिचा बोलका व प्रेमळ स्वभाव सहज निदर्शनास येई. हिंदू स्त्रियांचे अंगी सामान्यतः भित्रेपणा असतो तो तिच्या ठिकाणी मुळीच नव्हता. व्यवहारचातुर्य व प्रसंगावधान या गुणांच्या योगाने तिची कर्तबगारी विशेष झळकत असे."[७]

अशा या राजघराण्यातील मंडळींची जेव्हा प्रथम भेट झाली तेव्हा एल्फिन्स्टनचे स्वागत पूर्वेकडील देशात रूढ असलेल्या सार्वभौमत्वाच्या कल्पनेला अनुसरून अगदीच औपचारिक असे झाले. एक परका माणूस आत आल्यानंतर उठून उभे राहावे, आणि त्याच्या नमस्कारास प्रतिनमस्कार

---

४. कोलब्रुक भाग २ पृ. २८.

५. राजाचा जन्म १७९३ मधील आहे. म्हणजे तो २५ वर्षांचा होता.

६. बॉलहॅचेट पृ. १८.

७. मराठी रियासत उ. वि. ३ पृ. ५१३.

करावा हे या पद्धतीत बसू शकत नव्हते, अशी एल्‌फिन्स्टनने नोंद केली आहे.[८]

भेटीस येण्यापूर्वी एल्‌फिन्स्टनने राजाला पत्रे पाठवून खूप धीर दिला होता, आणि आश्वासन दिले होते की, "आपण राज्य करीतील जो आपला हुकूम यात बाजीराव याचा हात सिरू देणार नाही. आपण खावंद या उपरि आता काही फिकर नाही. सातारियास जाऊन तख्तावर बसून राज्य करावे. बाजीराव याची कदापि आपणास इजा लागणार नाही. तो राज्यात येऊ पावणार नाही...बाजीराव याचा तह या उपरि होणार नाही आपण कालजी तिलमात्र करू नये."[९]

४ मार्च रोजी जनरल स्मिथचा तळ बेलसर (सातारा) येथे होता. एल्‌फिन्स्टनबरोबर बाळाजीपंत नातू आला होता. रसेल, ग्रांट, स्मिथ, बिलिमोर इत्यादि मंडळी त्या छावणीतच होती. या पहिल्या भेटीत अर्थात राज्याच्या हद्दीचा प्रश्न निघाला तेव्हा, राजाचे म्हणणे आपण लाट-साहेबापुढे मांडू, असे अश्वासन एल्‌फिन्स्टनने दिले. त्यावर राजा म्हणाला, "आमचे लाट वगैरे सर्व तुम्हीच.. तुम्ही पाहिजे तसे करावे." राजाने अशा रीतीने एक प्रकारे मुखत्यारपत्रच एल्‌फिन्स्टनला देऊन टाकले.

कंपनीच्या अधिकाऱ्याबरोबर राजा मजल दरमजल करीत, आपल्या लवाजम्यासह साताऱ्याच्या दिशेने वाटचाल करीत होता. मार्गात लागणारे किल्ले जिंकून घेतले जात. २५ मार्च १८१८ रोजी चंदनवंदन (सातारा जिल्हा) किल्ले सर झाल्याचे वृत्त ग्रँटने दिले. याच दिवशी एल्‌फिन्स्टनने परत एकदा राजाची भेट घेतली. "माहाराज व अलपीष्टन साहेब

---

८. बॉलहॅचेट पृ. १८.

९. डे. कॉ. रु. ५५ फा. २. : 'राजा प्रतापसिंहाच्या शके १७३९–४० मधील हालचाली' श्री. वि. ल. भावे यांनी मराठी दप्तर रुमाल (म. द. रु.) २ मध्ये छापल्या आहेत. या रोजनिशीचा काल बाजीरावाच्या भ्रमंतीपासून सुरू होतो आणि शेवट बाजीरावाच्या शरणागतीच्या बातमीने होतो. डेक्कन कॉलेजमध्ये प्रस्तुत रोजनिशीतील काही पाने आहेत, आणि त्यांत आलेल्या मजकुराच्या आशयात फारसा फरक नसला तरी तो बराचसा संक्षिप्त आहे. सातारा दप्तरातील हे कागद असल्यामुळे ते विश्वसनीय मानावयास हरकत नाही. येथे प्रामुख्याने त्यांचा वापर केला आहे.

खलबतास बनातीचे डेऱ्यात जाऊन बसून माईसाहेबाकड आले आणि बोलले जे आमचे मनांत आपणाकडे भीमेचे अलिकडे व वारणा अलिकडे कृष्णेचा व भीमेचा संगम जाला तेथपर्यंत मुलुक शयाद्रीपासोन द्यावा असे मनांत आले आहे लाटसाहेबाकडे लिहिले गेले आहे त्याचे उतर येत आहे तो आम्हीही कर्नाटकातून साहेब येतात त्यास भेटून ते व आम्ही येतो नंतर बंदोबस्त करू आजच किलेकोट स्वाधीन करावे तरी बैदा मिटला नाही बाजीराव तिकडे आहेतच याजमुळे किल्ल्याचा बंदोबस्त आम्ही करीतो परंतु निशाण भगवे लावितो असे बोलून गेले. फिरोन ग्रँटसाहेब बोलले की आम्हास आपलेकडील वकिलीचे काम सांगितले माईसाहेबानी माहाराजानी व भाऊ-साहेबानी आप्पासाहेबानी जे बोलण ते आम्हासी बोलावे परभारे बाळाजी-पंताकडे कोण्ही बोलू नये. बाळाजीपंतास आम्ही आपले जवळ ठेऊन घेतले आहे ते कागदपत्राची माहितगारी व न समजेल ते विचारण ते आम्ही विचारू तुम्ही परभारे बोलू नये असे सागो गेले.''[१०]

वरील नोंद एका दृष्टीने महत्त्वाची आहे. साताऱ्याचा वकील म्हणून ग्रँटने या सुमारास सूत्रे हाती घेतली होती आणि त्याच्या मदतीस बाळाजीपंत नातूची नेमणूक झाली होती हे या नोंदीवरून स्पष्ट होते. तसेच बाळाजीपंत नातूच्या कामाच्या मर्यादाही ग्रँटने सर्व राजकुटुंबियां-समोर स्पष्ट केल्या होत्या हेही यावरून दिसते. बाळाजीपंत हा अधिकारी नाही, त्याच्याशी परभारे बोलणी करावयाची नाहीत, त्याची नेमणूक आपणास येथील कागदपत्रांची व रीतिरिवाजांची माहिती करून देण्यासाठी केली आहे. याचा खुलासा करून कोणत्याही प्रकारच्या गैरसमजाला थारा राहू नये याची अगदी प्रारंभापासूनच काळजी घेतली आहे.

साताऱ्याच्या राज्याच्या हद्दी निश्चित करणे हा फार महत्त्वाचा प्रश्न होता. पेशव्यांकडून राज्य इंग्रजांनी जिंकून घेतले तो सारा प्रदेश वस्तुत: छत्रपतीचा होता. तेव्हा बाजीरावाची हकालपट्टी करावयाची आणि छत्रपतीला गादीवर बसवावयाचे म्हणजे जिंकलेला सारा मराठी मुलूख प्रतापसिंहाच्या हवाली करणे आवश्यक होते. पण हा सारा मुलूख राजाला देण्याचे कंपनीचे धोरण नव्हते. त्यातला फक्त काही भाग ज्याच्या उत्पन्ना-वर राजाला सुखासमाधानाने जगता आले असते तेवढाच भाग त्याला

---

१०. डे. कॉ. रु. ५५ फा. २:१; म. द. रु. २ यामध्ये वरील मजकूर पृ. ४६ वर आला आहे. पण शेवटचा ग्रँट आणि बाळाजीपंता-संबंधीचा मजकूर मात्र आधीच्या म्हणजे २१ मार्च, १८१८ च्या नोंदीखाली, पृ. ४५ वर आला आहे.

द्यावयाचा होता. छत्रपती आणि जहागिरदार या दोहोंमधला अधिकारी अशा तऱ्हेची अवस्था सातान्यात निर्माण करून त्यावर प्रतापसिंहाची 'राजा' म्हणून नेमणूक करण्याचा कंपनीचा निश्चय पक्का होता.

राज्याच्या सरहद्दीसंबंधी एल्फिन्स्टनशी झालेल्या बोलण्याचे संपूर्ण आकलन राजाला झाले नसावे. कारण २६ मार्चला त्याने बळवंतराव चिटणीसाला बाळाजीपंताकडे पाठवून "हादी महालमुलुकाच्या बोलण्यात आल्या परंतु समजुतीत न आले शयाद्री पलीकडून की अलीकडून" याचा खुलासा करून येण्यास सांगितले. बाळाजीपंताने एल्फिन्स्टनचे म्हणणे समजावून सांगितले, आणि संपूर्ण राज्याचे धनी छत्रपती होणार नाहीत याची स्पष्ट कल्पना दिली. अर्थात बाळाजीपंत दोष कंपनीला देत नाही तर "बाजीराव याचे आग्रहानी व मोहानी हे दशा जाली ध्यानात यावे" असे प्रतापसिंहाला बजावतो.[११]

मराठ्यांचे राज्य हस्तगत करण्याच्या कामी ज्या इंग्रज अधिकाऱ्यांची नियुक्ती झाली होती त्यात सर थॉमस मन्रो ही एक प्रमुख व्यक्ती होती. राजा हस्तगत झाल्याचे वृत्त ऐकून त्यालाही आनंद झाला होता आणि राजाला शक्यतो लवकर मसनदीवर बसवावे असे त्याने एल्फिन्स्टनला लिहिले होते. तसे झाले म्हणजे लढाईचा शेवट जलदीने होईल आणि प्रदेशाची नीट व्यवस्था लावता येईल. त्याचे म्हणणे असे होते की, राजाने बाजीराव पेशवे आणि त्याचे इतर मराठी सरदार यांना बोलावून घ्यावे, आणि त्यांनी राजाचे स्वामित्व मान्य केले नाही तर बाजीराव आणि त्याचे सहकारी यांना बंडखोर ठरवावे. सर्व सरदार राजाच्या आज्ञा शिरसावंद्य मानतील अशी अपेक्षा मन्रोने व्यक्त केली होती. आणि तसे झाले म्हणजे सर्व सरदार त्याला सोडून जातील व बाजीराव एकाकी पडेल, आणि सारा प्रदेश काबीज करणे सुलभ होईल असे त्याला वाटत होते.

एल्फिन्स्टन, सर थॉमस् मन्रो यांच्या या विचारावरून कंपनीच्या धोरणाची स्पष्ट कल्पना येते. मराठीराज्य हस्तगत करावयाचे असेल तर प्रथम पेशवा नाहीसा केला पाहिजे, लोकांच्या मनातून त्याची प्रतिमा पार उतरली पाहिजे, आणि लोकांच्या मनांत कंपनी सरकारविषयी कसल्याही प्रकारचा संशय येऊ द्यावयाचा नसेल तर त्यासाठी छत्रपती राखणे जरूर होते. साताऱ्याचे राज्य हे अशा राजनैतिक धोरणांतून जन्माला आले.

---

११. म. द. रु. नं. २, पृ. ४७.

चंदनवंदन घेतल्यानंतर साताऱ्याच्या दिशेने स्वारीने कूच केली, आणि तांबी येथे मुक्काम केला. ७ एप्रिलला वासोटा किल्ला, जेथे महाराजांना नजरकैदेत ठेवले होते तो घेतला, आणि ९ एप्रिलला तांबीहून कूच केली. साताऱ्यात सरकार स्वाऱ्यांना एल्फिन्स्टनकडून पहिली मेजवानी होणार होती. तांबीनजिक असलेल्या मेढे या ठिकाणी राजा आणि इतर प्रतिष्ठितांच्या सल्ल्याने मेजवानीस कोणती मंडळी बोलवावयाची, त्यांना वस्त्रे किती द्यावयाची याची नावनिसी यादी तयार केली होती.[१२] लोकांना त्यांच्याच पद्धतीने वागून खूष ठेवण्याची कला एल्फिन्स्टनला चांगलीच साधली होती.

१० एप्रिलला करंज्याजवळच्या आंबराईत स्वारी उतरली, आणि साताऱ्याला जाण्याची सिद्धता झाली. 'मोठ्या समारंभाने राजपुत्राला शोभेल अशा थाटात आणि शाळकरी मुलाच्या आनंदात राजाने राजधानीत प्रवेश केला' असे एल्फिन्स्टन म्हणतो.[१३] "त्रितीय प्रहरी मुहुर्तानी मोठे समारंभे बराबर आलपिष्टन व सर्व साहेब लोक खासे त्रिवर्ग...सिव्हासनारूढ जाले. डावे बाजूस सर्व साहेब लोक बसले वरकड हुजूरची मंडळी व शहरांतील थोर थोर आले नाच वगैरे समारंभ जाला नजरा जाल्या विडे अतर गुलाब होऊन सर्वास निरोप जाला आलपिष्टन सुधा सर्वास खुसी तोफा जाल्या."[१४]

मॅकलोड हा ब्रिटिश अधिकारी या समारंभास हजर होता. त्याने या प्रसंगाचे मोठे मनोज्ञ वर्णन रेखाटले आहे. "राजा आणि त्याचे बंधू हत्तीवर स्वार झाले आणि मोठ्या लवाजम्यानिशी शहरातून मोठी मिरवणूक काढण्यात आली. मिरवणूक जेव्हा वाड्यापाशी आली आणि राजा अंबारीतून उतरला तेव्हा ३–४ बकरी मारण्यात आली आणि पवित्रजल ओतले गेले. राजवाड्याच्या चौकात एक मोठा मंडप घातला होता, आणि तेथे छत्रपतीचे सिंहासन ठेवण्यात आले होते. हे सिंहासन छोटेसे, जुन्या पद्धतीच्या कोचासारखे आणि भरजरी वस्त्रांनी आच्छादिलेले होते. मॅकलोडच्या मते हा मंडप अगदी सामान्य होता आणि कसल्याही प्रकारची

---

१२. म. द. रु. २, पृ. ५४.

१३. कोलब्रुक २, पृ. ३१.
(with the pomp of a prince and the delight of a schoolboy)

१४. म. द. रु. २, पृ. ५५.

रोषणाई अथवा नृत्य यांची योजना या प्रसंगी नव्हती. राजा स्वतः सिंहासनावर जाऊन बसला.''[१५]

११ एप्रिल रोजी शाहूनगर येथे एल्फिन्स्टनची पूर्वनियोजित मेजवानी झाली. १२ एप्रिलला कंपनी सरकार व छत्रपती सरकार यांची दोस्ती झाल्याचे शे-दोनसे जाहीरनामे कंपनीच्या रीतीचे शिक्के, मोर्तब निशाण होऊन काढण्यात आले आणि ते अंमलबजावणीसाठी ग्रँटच्या स्वाधीन करण्यात आले. १३ एप्रिलला महाराजांकडून इंग्रजांचा मानसन्मान झाला, एल्फिन्स्टनला तिवट, शालजोडी, किनखाप, महमुद्या, कंठी मोत्याची, सिरपेच, दोन पोच्या, घोडा, हत्ती, इत्यादि ११ वस्तू आणि इतरांना त्यांच्या दर्जाप्रमाणे सात, साडेपाच, साडेतीन अशा वस्तू देऊन सन्मान केला. निरोप-समयी हिऱ्याची अंगठी माईसाहेबांनी एल्फिन्स्टनला भेट म्हणून दिली आणि १४ एप्रिलला महाराज किल्ल्यावर राहावयास गेले.[१६]

अशा रीतीने साताऱ्याचा राजा आणि राज्य ग्रँटच्या हवाली करून एल्फिन्स्टन निघून गेला. ग्रँटला फार हुशारीने आणि चातुर्याने सारे व्यवहार करावयाचे होते. साताऱ्याची व्यवस्था कशी करावी यासंबंधी एल्फिन्स्टनने त्यास एक विस्तृत सूचनापत्रक दिले होते (८ एप्रिल, १८१८). आणि त्या चौकटीत राहून त्याला काम करावयाचे होते. त्याला दिलेल्या सूचनांपैकी सर्वात महत्त्वाची सूचना म्हणजे राजाची मर्जी संपादन करावयाची आणि त्याचबरोबर ब्रिटिशांची जरब त्याच्यावर राहील असे वागावयाचे. राजाचा विश्वास संपादून राजकुटुंबियांशी सलोखा निर्माण करणे, त्यांच्या खर्चावर नियंत्रण घालणे, आणि स्वतःविषयीच्या त्याच्या अवास्तवी कल्पनांना काबूत ठेवणे, आणि हे सारे घिसाडघाईने एकदम नाही, तर संथपणे क्रमशः साधणे अशी एक सूचना होती. राजाचा झेंडा खेड्या-खेड्यांतून उभा करावयाचा आणि तेथील लोकांच्या मनावर असे बिंबवायचे की ते राजाचे प्रजाजन आहेत आणि त्याचबरोबर त्यांना अशीही जाणीव द्यावयाची की प्रस्तुत राज्य म्हणजे शिवछत्रपतींच्या साम्राज्याची पुनर्स्थापना नव्हे. अशी ही दुहेरी कामगिरी त्याला बजावावयाची होती. राजाशी चांगले संबंध तर प्रस्थापित करावयाचे, आणि असे करीत असता त्याला याची पूर्ण जाणीव द्यावयाची की ब्रिटिश सरकार हे सर्वोच्च असून राजाला दिलेली सत्ता ही मर्यादित स्वरूपाची आहे. एल्फिन्स्टनचे म्हणणे असे होते

---

१५. बॉलहॅचेट पृ. १९. म. द. रु. २, पृ. ५८.

१६. म. द. रु. २ पृ. ६१–६२.

की, हे जर साधता आले नाही तर आपण उभी केलेली ही यंत्रणा आपल्याच मागे भस्मासुरासारखी लागेल.[१७]

ग्रँटने सूत्रे हाती घेतली तेव्हा साताऱ्यात सर्वत्र गोंधळ होता. राजा हा अननुभवी असल्यामुळे सारी सत्ता त्याच्याकडे एकदम सुपूर्द करणे हिताचे नव्हते. कंपनी सरकारचा पैसा आणि सैन्य यांच्या साहाय्यानेच प्रथम स्थैर्य निर्माण करणे आवश्यक होते. राजाला प्रथम शासनाचे धडे द्यावयाचे, आणि त्याला राज्यकारभारात वाकबगार करावयाचे. राज्याचा वसूल वाढू लागला आणि राजाला निरनिराळ्या व्यवहारांचे आकलन होऊ लागले म्हणजे क्रमाक्रमाने राज्यकारभार त्याच्या हवाली करावयाचा, हे ब्रिटिशांचे धोरण ठरले होते.

साताऱ्याचा राज्यकारभार सुरळीत चालण्यासाठी प्रजेच्या सहकार्याची देखील अत्यंत आवश्यकता होती. हे राज्य परकीयांचे नाही, इंग्रज अधिकारी हे आपले मदतनीस आहेत आणि त्यांना साहाय्य केल्याने या नवनिर्मित राज्याची उन्नती होणार आहे असे आश्वासन राजाने प्रजेला देऊन विश्वास संपादन करणे आवश्यक होते. तेव्हा ग्रँटने १४ एप्रिल १८१८ रोजी राजाच्या नावे दोन जाहीरनामे काढले.

पहिल्या जाहीरनाम्यात म्हटले होते, "सरदार किलेदार, जहागीरदार, सरंजामी, पागे, पथके, शिलेदार, शिबंदी, जमीनदार, इनामदार, दुमालदार, आणि बाजे लोक आणि इतर सर्व रयत लोक ह्यास असे जाहीर करण्यात येते की बाजीराव रघुनाथ प्रधान ह्यांच्या दुर्वर्तनामुळे राज्याची फार अव्यवस्था झाली, त्यांनी आमच्याशी व आमच्या गादीशी कपटाचे व बेइमानपणाचे वर्तन केले... प्रजेवर जुलूम केला, इंग्रजांशी वैर धरून त्यांच्याबरोबर युद्ध केले, सबब त्यांच्या हातून आम्ही आपल्या राज्याचा सर्व कारभार काढून घेतला आहे. बाजीराव व इंग्रज ह्यांचे युद्ध चालले असता आम्ही, प्रजेचे व राज्याचे संरक्षण व्हावे अशा उद्देशाने इंग्रज लोकांवर विश्वास व भरवसा ठेऊन त्यांच्या छावणीत गेलो, तेथे त्यांची व आमची परस्पर दोस्ती घडून आली आहे. ह्याकरिता इतःपर कोणी बाजीरावाशी कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवू नये व त्यांशी पत्रव्यवहार करू नये. इतकेच नव्हे तर सर्वांनी आपापल्या जागी शांतपणे राहावे, दंगाधोपा कोठेही व कोणाशीही करू नये. ह्याप्रमाणे जे कोणी ऐकणार नाहीत त्यांचे उत्पन्न सरकारातून जप्त केले जाईल व त्यास योग्य शासन होईल."

१७. बॉलहॅचेट पृ. १८.

दुसऱ्या जाहीरनाम्यात म्हटले होते, "पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणे आमची व ब्रिटिश सरकारची दोस्ती होऊन आम्ही आमच्या राजधानीत आलो व आमचे सैन्यही आले आहे. ह्या सर्वांच्या समक्ष आम्ही सिंहासनारूढ झालो आहो. आमच्या संस्थानाकडे जो प्रांत येईल त्याचे उत्तम संरक्षण झाले पाहिजे आणि आमच्या ताब्यातील प्रजेवर कोणी जुलूम करील त्याचा चांगला बंदोबस्त झाला पाहिजे, आणि गुन्हेगारास योग्य शिक्षा झाली पाहिजे, आणि हे सर्व लोकांस मालूम झाले पाहिजे ह्याकरिता क्याप्टन ग्रांट बहादूर ह्याजकडे आम्ही सर्व राज्यकारभार सोपविला आहे ते आमच्या राज्याचे कल्याण व भरभराट होईल अशा रीतीने सर्व राज्यकारभार चालवतील आणि गैरचालीने वागणारास व दुसऱ्याच्या मालमत्तेचा अपहार करणारास व लाचलुचपत खाणारास आणि प्रजेवर जुलुम करणारास योग्य शासन करतील."[१८]

ग्रँटची एल्फिन्स्टनवर दृढ श्रद्धा होती. त्याचा हुकूम शिरसावंद्य मानून त्याने आपल्या कार्याला प्रारंभ केला. राजाचा विश्वास संपादन करणे ही त्याच्या कार्यक्रमाची पहिली आणि महत्त्वाची पायरी होती. राजाच्या सद्वर्तनाशी त्याचे भवितव्य निगडीत झाले होते. तेव्हा एल्फिन्स्टनच्या आज्ञांचा भंग करणे हे परिणामी हितावह ठरणार नाही याची राजाला त्याने समज दिली होती. एल्फिन्स्टन हा किती कडक प्रशासक आहे याची त्याला पूर्ण कल्पना होती. आपल्याकडून काही कसूर झाली तर आपली येथून तात्काल उचलबांगडी होईल हे तो जाणून होता. तेव्हा एल्फिन्स्टनला खूष ठेवणे, त्याच्या हुकुमांचे पालन करणे किती आवश्यक आहे हे तो राजाला पटवून देत असे. तो म्हणतो, "मित्र म्हणून तो एक फार मोठा माणूस आहे, पण एकदा का तो संतापला म्हणजे त्याच्या सारखा भयंकर माणूस नाही."[१९]

सहवासाने ग्रँटचे राजाविषयीचे मत बरेचसे अनुकूल बनू लागले, त्याचे स्वभावदोष पत्करूनही तो त्याच्याकडे सहानुभूतीने पाहू लागला.

राजकुटुंबियांचा तनखा ठरविणे ही एक अत्यंत नाजूक बाब होती. आपल्या सूचनापत्रात एल्फिन्स्टनने सुचविलेला आकडा राजकुटुंबियांच्या गळी उतरविणे फार कठीण होते. तीन लाखांची लक्ष्मणरेषा एल्फिन्स्टनने

१८. भारतवर्ष २, पृ. १७–१८.

१९. Great in your friendship and you are terrible in your wrath. (२३–४–१८)

घालून दिली होती. तेव्हा तनख्याची बोलणी सुरू करण्यापूर्वी राजाची मर्जी संपादन करून आपल्या दोघांचे हितसंबंध परस्पराशी कसे निगडीत आहेत हे त्याच्या मनावर बिंबविण्याचा तो प्रयत्न करू लागला. आपली उन्नती ही तुझ्या भावी मोठेपणावर अवलंबून असल्यामुळे आपण एकमेकांना मदत केली पाहिजे, अंतःकरणे मोकळी केली पाहिजेत, खुल्या दिलाने चर्चा केली पाहिजे. तो त्याला सांगत असे, "खरी मैत्री ही प्रामाणिकपणा आणि मोकळेपणाशिवाय अपूर्ण राहील." त्याच्या मते दुर्दैवाने या देशातील लोकांना, विशेषतः ब्राह्मणांना सत्याची चाड नाही; पण समाधानाची बाब म्हणजे महाराजांनी मात्र प्रत्येक वेळी मोकळेपणा दाखविला आहे, हा त्याचा गुण उल्लेखनीय आहे, आणि त्यामुळे हा राजा निश्चितच मोठा आणि शहाणा होईल असा त्याला भरवसा वाटत होता.

अशा रीतीने तनख्याचा विषय काढण्यासाठी योग्य अशी पार्श्वभूमी ग्रँटने तयार केली. राजाने त्याला प्रतिसादही चांगला दिला. तो म्हणाला, "मला अशा मित्राची गरज आहे जो मला या बाबतीत योग्य ते मार्गदर्शन करू शकेल. तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास असल्यामुळे मी काय करावे हे तूच मला सांग."

यावर दोघांमध्ये बरीच चर्चा झाली. ग्रँटने राजाकडे आवश्यक खर्चाच्या बाबींची यादी, तसेच सेवक आणि आश्रितांचे टिप्पण मागितले. तनख्याचा आकडा निश्चित करण्यास या गोष्टी आवश्यक होत्या.

राजाने पहिला आकडा ५० लाखांचा सांगितला. इतकी रक्कम मंजूर होणे असंभवनीय आहे असे ग्रँटने समजावून दिल्यावर राजाने अगदी स्पष्टपणे कबुली दिली की हा आकडा आपण इतरांच्या सल्ल्याने निश्चित केला आहे. या त्याच्या सल्लागारांनी असे सांगितले होते की, "आपली मागणी नेहमी भरघोस असावी. कंपनी सरकार तुझ्यावर खूष आहे तेव्हा अर्धा लाख आणि अर्धा कोट या रकमा त्यांच्या खिजगणतीत सारख्याच होत." तदनंतर तो म्हणाला, येत्या वर्षासाठी आपल्याला बीस लाख द्यावेत, तेवढ्यावर आपण या वर्षी कसेतरी भागवू. आता ग्रँटला आपली मर्यादा काय आहे हे राजाला स्पष्ट सांगणे भाग होते. 'तीन लक्षांचा' आकडा ऐकताच राजा ताडकन उत्तरला, 'ते शक्य नाही'. ग्रँट त्याला पटवून देत होता, "एल्फिन्स्टनने मंजूर केलेली रक्कम ही वाजवी आहे असे तुला देखील वाटले पाहिजे, आणि माझ्याशी तुझे जे जिव्हाळ्याचे

संबंध आहेत त्यावरूनही तू अशी काही भलतीसलती मागणी करशील असे मला वाटले नव्हते."

राजाला ग्रँटचे बोलणे रुचले नाही. ग्रँटने परोपरीने राजाची समजूत काढण्याचा प्रयत्न केला त्यामुळे अधिकाधिक कटुताच निर्माण होण्याची लक्षणे दिसू लागली. शेवटी अगदी थंडपणाने दोघांनी परस्परांचा निरोप घेतला. असे पूर्वी कधीही घडले नव्हते.

राजकुटुंबियांची चौकशी करण्याकरिता म्हणून आपले दैनंदिन काम उरकल्यानंतर रात्री आठच्या सुमारास किल्ल्यावर जाण्याचा ग्रँटचा नित्यक्रम होता. पण ग्रँटचे हे नित्य येणे त्याच्या गणगोताला रुचत नसे. ते राजाला पढवीत, ब्रिटिश प्रशासक हा जर असा सतत किल्ल्यावर येऊ लागला तर त्याला येथे कायमचे ठेवून घ्यावे लागेल, आणि बाजीरावापेक्षाही करडी नजर त्याची आमच्या सरकारवर राहील. ही सारी खलबते ग्रँटच्या कानावर येत असत, पण जणु काय ते सापल्या गावीच नाही अशी तो बतावणी करी. बाळजीपंत नातूला मात्र त्याने राजाला सावध करण्याचा इशारा दिला होता.

तनख्याच्या प्रश्नाने कटुता निर्माण झाली होती म्हणून ग्रँट किल्ल्यावर तीन दिवस गेला नाही की राजाचीही भेट घेतली नाही. हे काम आता आपल्याच्याने होणार नाही अशी त्याची खात्री झाली तेव्हा आपला साहाय्यक बाळाजीपंत नातू याला त्याने पुढे केले. बाळाजीने शेवटी फड जिंकला, आणि राजाने महिना २५००० अथवा वार्षिक तीन लाखाला संमती दिली. धर्मादायांसाठी म्हणून मासिक २००० रु. अधिक द्यावेत अशी विनंती राजाने केली होती, दानधर्मात पैसा खर्च करणे मूर्खपणाचे आहे असे ग्रँटला वाटत होते तरी देखील त्याने शेवटी मासिक १००० रु. मंजूर केले. म्हणजे एल्‌फिन्स्टनच्या आकड्यापेक्षा फक्त १२००० रु. त्याला अधिक द्यावे लागले. या प्रकरणांत बाळाजीपंताची सरशी झाली; ग्रँट आणि एल्‌फिन्स्टन यांनी त्याची स्तुती केली पण माईसाहेब आणि राजा यांच्या मनांतून मात्र तो उतरला.

राजवाड्यात सेवकांची भाऊगर्दी होती. खर्चात कपात झाल्यामुळे काहींना निरोप देणे क्रमप्राप्त होते. हे कटुकाम राजाकडे सोपविण्यात आले. काही जुनी कर्जे होती. ग्रँटने प्रथम तिकडे कानाडोळा केला पण नंतर हळूहळू ती प्रकरणे निकालात काढली.

'२० मे, १८१८ रोजी सरकार, माईसाहेब, आप्पासाो व वाड्याकडील वगलाले खर्च चालू झाले रुा २६००० सवीस हजार पाौ नेमणूक

खर्च नेमून दिल्हा मुदबख सेवेची माणसे घोडी हाती उंट वगैरे सर्व आपले आपले इतमाम ज्याचे त्याणी पाहून करावयास प्रारंभ जाला

| | | | |
|---|---|---|---|
| १४२८१।। | माहाराज छत्रपति | २२७३ | मातुश्री माईसाहेब |
| १३४३ | वाडा पहिला | ३७५० | भाऊसाहेब |
| ६०२।। | मर्जी | ३७५० | आप्पासाहेब |
| १६२२७ | | ९७७३ | |

२६०००

खेरीज जिलबीचे वगैरे लोक शंभर यासी रोजमुरा रुा व स्वार आसामी पंधरा यास रोजमुरा रुा या प्रा परभारा इंग्रेजाकडून पावावे ठरले."[२०]

अशा रीतीने बाळाजीच्या मध्यस्थीने राजाच्या खाजगी खर्चाच्या प्रकरणाचा निकाल लावला. या संदर्भात ग्रँट एल्फिन्स्टनला लिहितो, "हा तंटा तोडणे फार कठीण होते पण राजाचे समाधान होईल अशा रीतीने हा प्रश्न मिटल्यामुळे माझ्या मार्गातील निम्या कटकटी दूर झाल्या. '**कसकस**' हे प्रकरण मिटल्यामुळे मी माझ्या दैवावर फार खूष आहे. त्याची मागणी ३० लाखाच्या घरात जात होती, पण हे प्रकरण ३½ लाखांवर मिटले."[२१] (२६-४-१८१८)

२०. म. द. रु. २ पृ. ६६. इंग्रजी पत्रव्यवहारात ही विभागणी अशी दाखविली आहे—

| | |
|---|---|
| राजा | १५०७५ |
| राणी | ११५२ |
| राजाचे बंधू | ७५०० |
| राजाची आई | २२७३ |
| | २६००० |

पाहा बॉलहॅचेट पृ. २१ तळटीप.

२१. "..It has, I assure you, been a troublesome business and in having just matters settled to the Raja's satisfaction I really think half my difficulties are over. I am quite elated at my good luck in having mastered *Kusakusa.*"

२८ मेला एल्फिन्स्टन पुण्याहून आला आणि राजाला भेटण्यासाठी किल्ल्यावर गेला. बाजीराव अद्याप शरण आला नव्हता. तेव्हा अद्याप खबरदारीने राहणे भाग होते. राजाच्या भेटीत बाजीरावाविषयी बोलणे निघाले तेव्हा तो म्हणाला, "बाजीराव बोलणार बहुत सावध लिहिणार वगैरे सर्व चांगला, परंतु, बोलल्याप्रमाणें चालावयाचे नाही दगलबाजी फार." बाजीराव राजाला आपल्याकडे वळवून घेण्याचे प्रयत्न करील अशी एल्फिन्स्टनला भीती वाटत असावी म्हणून त्याच्या 'दगलबाजी'ची आठवण त्याने राजाला करून दिली आहे.

याच भेटीत दुसऱ्या दिवशी मन्रो, ग्रँट यांच्या समवेत एल्फिन्स्टनने "स्वराज्य व सरदेशमुखी व चौथाई एकूण तीन फर्मान पारसी बादशाई पहावयास मागितली आणि महाराजांनी ती दाखविली."[२२] बाळाजी विश्वनाथाने शाहूसाठी ही फर्माने मोगलांकडून १७१९ साली आणली होती.

साताऱ्यात पोलिटिकल एजंट म्हणून नेमणूक झाल्यावर राजाशी त्याचे संबंध कसे राहिले, एल्फिन्स्टन आणि कंपनी सरकारने प्रस्तुत संदर्भात त्याच्यावर टाकलेली जबाबदारी त्याने कितपत पार पाडली हे प्रथम पाहणे आवश्यक आहे. राजाचे आणि त्याचे संबंध कसे दृढ होत गेले हे एल्फिन्स्टनला त्याने वेळोवेळी लिहिलेल्या पत्रातून दिसून येते.

राजाची मर्जी संपादन करून त्याला उत्तम प्रशासक बनविणे हे ग्रँटचे एक प्रमुख कार्य होते. अगदी थोड्या अवधीत त्याने साताऱ्याच्या परिस्थितीचे आकलन करून घेतले होते. राजा आणि त्याचे कुटुंबीय यांच्यात संघर्ष निर्माण होणार याची स्पष्ट चिन्हे त्याला दिसत होती. तेव्हा सर्व तंटे शक्यतो सामोपचाराने मिटवावेत अशी त्याची इच्छा होती. राजाला मोठा तनखा, विस्तृत प्रदेश हवा होता तर माईसाहेबांना रीजंट बनून आपल्या भावाला दिवाणपद द्यावे असे होते.

इंग्रजांसंबंधी लोक काय बोलतात याकडेही त्याचे लक्ष असे. 'राजाच्या खर्चावर नियंत्रण येईल.' "सर्व राज्य शाहूचे आहे आणि इंग्रज माणूस व्यवहाराला 'नेक' असल्यामुळे बहुतेक सर्व राज्य ते राजाच्या हवाली करतील." अशा तऱ्हेच्या बातम्या सतत उठत होत्या. याबाबत ग्रँटचे म्हणणे असे की अशा विचारांना जास्त प्रसिद्धी मिळण्यापूर्वीच आपण निर्णय घेतला पाहिजे. राजाकडे मर्यादित राज्य द्यावे, त्याच्या अपेक्षा अधिक वाढणार नाहीत याची काळजी घ्यावी; जेवढ्या प्रदेशाचा कारभार

२२. म. द. रु. २, पृ. ६७.

त्याला करता येईल तेवढाच प्रदेश त्याच्याकडे द्यावा; त्याला राज्याधिकार एकदम न देता ते क्रमाक्रमाने द्यावेत आणि राजाची अशी भावना झाली पाहिजे की आपल्याला राज्य मिळाले ते आपल्या कर्तृत्वामुळे, केवळ आपला हक्क आहे म्हणून नव्हे, असे त्याचे मत होते.[२३]

राजाशी त्याची मनमोकळी मित्रत्वाची बोलणी होत. तो त्याला बहुतेक रोज भेटत असे. राणीसाहेबांचीदेखील त्याला अनेक प्रकरणात समजूत काढावी लागे. राजाच्या नावाने जे सुरवातीला जाहीरनामे काढले त्याला बाईंचा थोडासा विरोध होता. माईसाहेबांना जाहीरनाम्याच्या मसुद्यात काही फेरफार सुचवावयाचे होते. त्यावर शिक्का मारावयाचा किंवा नाही याचा निर्णय घ्यावयाचा होता. याबाबत जी बोलणी होत ती माईसाहेब

---

२३. " The people now about the Raja have begun to speak of his being controlled in his expenses, that the whole country is The Shaaw Rajas—that some say that we are a just people and it is to be seen how much of the ancient Raj we shall restore. There ought to be a silent but a strong check on these opinions before they come to be discussed and leave an impression on the better dispositions of the family which it is natural they should at this period feel.

It being intended that his highness should be put in possession of a very limited Raj, it is particularly necessary that his expectations should not be raised beyond his condition, at the same time it is desirable to place as much as the Govt. of the country in his hands as he can manage, and I am aware that an appearance of control in the interior of his Govt. might defeat much of the object you have in view, but I would use him to power sparingly and first laying down rules for his guidance. (of course through his Dewan and in the manner least likely to offend) I would gradually bring him into power and rather let him feel it conferred on his ability and becomming conduct than allowed at once as his right. " एप्रिल १८१८.

आणि त्यांचे सहकारी यांच्यामध्ये होत. राजाला गाठून सर्व खुलासा करण आणि जाहीरनामे शक्यतो लौकर काढणे आवश्यक होते. शेवटी राजाला एकट्याला गाठून ग्रँटने हा विषय काढला. चिटणीस, फडणीस, ५-६ अखबारनीस तेथे जमा झाले आणि त्यांच्यामध्ये जोरजोरात वादविवाद सुरू झाले की जाहीरनामा लिहावयाचा कोणी? वाचावयाचा कोणी? शिक्का कोणी धरावयाचा? तो कागदावर मारावयाचा कोणी? या प्रश्नांचा विचार करण्यासाठी जुन्या माणसांना बोलावण्यात आले. मोठा विचित्र प्रसंग निर्माण झाला होता. पण नेहमीप्रमाणे महाराजांनी मध्यस्थी करून आणि सगळ्यांचे समाधान होईल असा मार्ग शोधून काढला, जाहीरनाम्यावर सह्या झाल्या, शिक्कामोर्तब झाले आणि ते सारे उपस्थितांना वाचून दाखविण्यात आले.[२४]

एल्फिन्स्टनच्या आज्ञांचे, धोरणांचे पालन केले पाहिजे ही गोष्ट राजाच्या मनावर सतत बिंबविण्याचा प्रयत्न ग्रँटला करावा लागत असे. एल्फिन्स्टनने तुझ्या सुखासाठी अनेक गोष्टी केल्या आहेत, तेव्हा त्याचा उपदेश तू धुडकावून लावता कामा नये असे राजाला पटवून द्यावे लागे राणीसाहेबाची समजूत काढणे फार कठीण असे. त्या अनेक शंका व्यक्त करीत. आपण राजाच्या हिताचे जे असेल तेच फक्त करतो अशी हमी देऊन राणीसाहेबाकडून सहकार्य अपेक्षिले. काही काही वेळा राणीसाहेब खूप आकांडतांडव करीत, बाळाजीपंतापुढे रडत असत पण बाळाजीपंत इतका कठीण हृदयाचा होता की त्याच्यावर अशा गोष्टींचा काहीच परिणाम होत नसे. आपल्याला सती जाण्यापासून ज्या लोकांनी परावृत्त केले त्यांना दोष देण्यास बाईंनी सुरवात केली. 'आता फक्त काशीला जाण्याचे उरले आहे. विधवेचे कर्तव्य म्हणजे मुलांना मार्गदर्शन करणे, पण तोही अधिकार आपल्याकडे राहिला नाही' अशी माईसाहेबांची तक्रार होती. अर्थात त्यांची रीजंट बनण्याची कल्पना बाळाजीने हळूहळू त्यांच्या डोक्यातून काढून टाकली.[२५]

---

२४. २० एप्रिल १८१८.

२५. "The old lady loudly abused the persons who had prevented her burning with her *poor dear* Husband's body, that now she seemed to have nothing left to go to Cassee—that a widow ought only to live to direct her children and she found herself of no use." २४ एप्रिल, १८१८.

राजाकडे येणाऱ्याजाणाऱ्यावर त्याला सतत नजर ठेवावी लागत असे. अक्कलकोटकरांचा कारकून परस्पर राजाला भेटावयास गेला याबद्दल आपली नापसंती व्यक्त करून अशा कृत्यापासून राजाला परावृत्त करण्याचा प्रयत्न तो करीत असे. (१८–५–१८१८).

राजाच्या भोवतालचे लोक कंपनीसरकारविरुद्ध त्याचे कान फुंकीत. अशा लोकांपासून सावध राहावे असे राजाला वारंवार बजावावे लागे. ग्रँटविषयी राजाचे मत कलुषित कसे होईल याचा सतत प्रयत्न हे लोक करीत. आणि हे सारे राजा ग्रँटला येऊन सांगत असे. तो म्हणतो, "विठ्ठलपंत मामा (राजाचा आप्त आणि त्रिंबकजी डेंगळ्याचा सहकारी) अगदी वाईट माणूस आहे. मी तुझ्याशी आणि इंग्रज लोकांशी कसे वागावे याबद्दल तो काही बदसल्ला देत होता. माझी तुझ्याशी असलेली सलगी ही माझ्या दर्जाला शोभणारी नाही; एल्फिन्स्टनचे जे कारभारी आहेत त्या सर्वात ग्रँट हा फार लुच्चा आहे, आणि जोपर्यंत साताऱ्यात आपण आहोत तोपर्यंत राजाचे काही चालू देणार नाही असे तो म्हणतो; वरून जरी तो गरीब दिसत असला तरी तो अत्यंत दुष्ट माणूस आहे, त्याच्या अतिक्रमणांना आपण पायबंद घातला पाहिजे, इत्यादि तो सांगत होता." राजाने सांगितलेली ही हकीकत ऐकून ग्रँटला खूप हसू आले, पण राजा मात्र गंभीर झाला.[२६]

२३ मार्च १८१९ रोजी साताऱ्यासंबंधीचा पहिला विस्तृत अहवाल सादर केला त्यात प्रामुख्याने राजा आणि त्याचे आप्तस्वकीय यांच्या

---

२६. "Witthulpant mama (formerly mamlitdar at Jumkeree a—friend of Trimbakjee) is a very bad man—he was giving me some very bad advice about how to regulate my conduct with you and with the English people—that our intimacy was not becoming in my situation and that Grant was the most cunning of all Mr. Elphinstones Karbarees. That whilst I was here, there would be no Raja in Satara and though I looked '*ghureeb*' I was *very wicked*—that it required a steady man of business to resist my encroachments and in short that he was the man....this of course made me laugh but the little Raja looked grave for a minute or two." (२३-६-१८१८)

संबंधीची हकीकत अधिक सांगितली आहे. या राज्याची व्यवस्था कशी लावली आहे हे राजाला समजावून सांगण्याची जबाबदारी त्याने विठ्ठलपंत फडणीस या साताऱ्याच्या मामलेदाराकडे सोपविली होती. या अहवालात राजाभोवती कशा प्रकारच्या लोकांचे कोंडाळे आहे हे समजावे म्हणून, त्याने एक अत्यंत मामुली, जिचे सरकारी अहवालात प्रयोजन नाही, अशी एक घटना नमूद केली आहे.

एका पंचायतीच्या मामल्यात राजाने अनुचितप्रकारे हस्तक्षेप केला. ग्रॅंटने त्याची ही चूक तात्काळ त्याच्या नजरेला आणली. पण राजाला आपला दर्जा सांभाळावयाचा होता. हा त्याच्या प्रतिष्ठेचा प्रश्न होता म्हणून त्याने ग्रॅंटला चूक दुरुस्त करण्यास काही अवकाश द्यावा अशी विनंती केली. ग्रॅंटचे म्हणणे न्यायदानाच्या कार्यात न्यायाखेरीज दुसरा कसलाही विचार येता कामा नये. पण राजाच्या सल्लागारांना वाटे राजाला आपल्या इच्छेप्रमाणे वागता येत नसेल तर त्याच्या राजेपणाचा काय उपयोग ? दाजीबा उपाध्ये याने हा प्रश्न उपस्थित केल्यावर राजा स्वतःच हसून म्हणाला, " दाजीबा, तुमच्या डोक्यांत कांहीं प्रकाश पडणार नाही. मला हवे ते मी करू शकतो पण माझे ते कृत्य रास्त, कायद्याला धरून असले पाहिजे, येवढेच. "

यावर कोणीतरी मोठ्याने पुटपुटले, " म्हणजेच तसे करण्याचा तुम्हाला हुकूम झाला असेल तर ". बऱ्याच लोकांनी या पुटपुटण्याला साथ दिली. ग्रॅंटकडे एक कटाक्ष टाकून त्याच्या ध्यानी ही गोष्ट आली का हे जाणून घेण्याचा तेवढ्यात राजाने प्रयत्न केला.

वरील उल्लेखावरून ब्रिटिशांचा संस्थानी राजकारणांतील हस्तक्षेप काहींना रुचत नव्हता हे स्पष्ट दिसते.

राजा तसा स्वभावाने अगदी मोकळा आहे, आपण केलेल्या कृतज्ञतेची त्याला पुरेपूर जाणीव आहे, तो आपल्या सल्ल्याप्रमाणे वागणारा आहे हे ग्रॅंटला मान्य असले तरी भोवतालच्या नालायक आश्रितांपासून त्याची मुक्तता करणे फार कठीण आहे असे त्याला वाटते. राजाचा ग्रॅंटवर खूप विश्वास होता आणि त्याला विश्वासात घेऊन राजाने जर काही गोष्टी सांगितल्या नसत्या तर त्यांचे ज्ञान त्याला कदापीही झाले नसते.

राज्य ताब्यात घेण्यास अर्थातच तो बराच उत्सुक होता, पण अद्याप आवश्यक तेवढा अनुभव मिळाल्याची त्याला खात्री नव्हती. त्याने खूप मेहनत केली पाहिजे, शिवाजी महाराजांचा आदर्श डोळ्यापुढे ठेऊन काम

केले पाहिजे असे त्याला वाटे. तो म्हणतो, "शिवाजी महाराजांनी तलवार केली बहुत थोर नाव झाले. आपण आकलेनी थोर नाव करावे. मेहनत फार फार करावी. राज्य आलेवरी होणार नाही. थोडे दिवस उरले. मेहनत फार फार करावी. फडणीस चिटणीस मर्जी जोग बोलतील. स्पष्ट बोलणार नाहीत. महाराजानी मनात आणून वागावे."[२७]

राजा हा जसा चांगला आहे तसाच धूर्त आणि कावेबाज पण आहे, आणि यालाच येथील लोक चालाखी म्हणतात अशी ग्रँटची तक्रार होती. कारस्थानाची त्याला थोडी आवड आहे, आणि त्याची ही वृत्ती धोकादायक आहे. कारण याबाबतीत कोणी त्याला प्रवृत्त केल्यास तो त्याला बळी पडण्याची शक्यता आहे याची त्याला भीती वाटे. सुखी जीवनाचा त्याग करून तो कंबर कसून काम करील याबद्दल तो साशंक होता.

अर्थात त्याला सल्लागार चांगले मिळाले तर परिस्थितीत खूप सुधारणा होईल याची त्याला खात्री होती. या प्रदेशातील ब्राह्मण जात हुशार आहे, पण ते स्वतःहून राजाला योग्य ते शिक्षण देणार नाहीत; मराठ्यांच्या कडून, काही अपवाद वगळल्यास, सामान्यपणे राज्यकारभार व्यवस्थित होणार नाही असे त्यांना वाटते. बाळाजीपंत नातूसारखा माणसदेखील म्हणत असे, "शाहू महाराजांनी हे राज्य एका ब्राह्मणाच्या स्वाधीन केले हा फार मोठा शहाणपणा केला; नाहीतर मराठी साम्राज्य यापूर्वी केव्हाच लयाला गेले असते,"[२८] थोडक्यात, राजा आणि त्याचे सल्लागार विशेषतः ब्राह्मण सल्लागार यांच्याविषयी ग्रँटने आपली मते अगदी अल्पकाळात बनविली होती.

राजाचा दिवाण विठ्ठलपंत महाजनी हा प्रामाणिक, व्यवहारी होता, पण कुशाग्रबुद्धी नव्हता; तो समजूतदार आणि सरळ प्रवृत्तीचा होता. दिवाण होण्यापूर्वी तो मामलेदार होता, आणि त्या पदावरून त्याने आपली कामगिरी फार उत्तमरीत्या पार पाडली होती. राजाने दिवाणपदासाठी ज्या दोन माणसांची शिफारस केली होती त्यात प्रथम क्रमांक विठ्ठलपंत आणि दुसरा दाजीबा उपाध्ये याचा होता. ग्रँटच्या मते दाजीबा हा

---

२७. पे. द. ४२, पृ. ३०. ता. ११–८–१८१९.

२८. "Shaow Mahraj..was a wise man; if he had not given over his Empire, to a Brahmin, the Maratta Empire would long ere this have fallen to pieces." (४–५–१८१८).

सार्वजनिक कामास अयोग्य माणूस होता, पण राजावर त्याचा बराच प्रभाव असल्यामुळे त्याच्याशी समझोता करणे त्याला भाग होते.

प्रतापसिंहाची भावंडे, माईसाहेब यांच्या स्वभावाविषयी ग्रँटने बरीच माहिती या अहवालात दिली आहे. तो म्हणतो, "राजाचा भाऊ राजाराम ऊर्फ भाऊसाहेब हा रूपवान आहे, पण कार्यक्षम आणि बुद्धिमान नाही. त्याचा पोशाख नीटनेटका असतो, तो घोड्यावर चांगला बसतो, पण त्याच्यात दिखाऊपणा अधिक आहे. तो आळशी आणि उधळ्या असला तरी हिंमतवान आहे. आईचा आदर्श त्याने आपल्यासमोर ठेवला आहे आणि तिचे बरेच वर्चस्व त्याच्यावर आहे. या वर्चस्वापासून त्याला जर मुक्त करता आले तर त्याच्यापासून काही अपेक्षा बाळगावयास हरकत नाही." भाऊसाहेबाचे लग्न तारळ्याच्या कुशाबाराजांच्या मुलीशी झाले होते. भाऊसाहेब काही फार दिवस जगला नाही. १८२० मध्ये तो मरण पावला.

राजाचा धाकटा भाऊ शहाजी ऊर्फ आप्पासाहेब याच्याविषयी ग्रँटचे मत मुळीच चांगले नव्हते. पुढे त्याला जेव्हा राजपद मिळाले तेव्हाही त्याने आपले त्याच्याविषयीचे प्रतिकूल मत एल्फिन्स्टनपुढे स्पष्टपणे सांगितले होते. "हा अत्यंत दुराग्रही आणि दुर्वर्तनी आहे. राजाने त्याला अनेक कानपिचक्या देऊनही त्याच्यात सुधारणा होत नाही. त्याची बायको मोहित्यांच्या घराण्यातील असून आपल्या सासूची वागणूक तिला सर्वस्वी नापसंत आहे."[२९]

आनंदीबाई ऊर्फ माईसाहेब–राजाची आई–यांच्याविषयी देखील ग्रँटचा ग्रह बरा नसावा. बाईच्या लावण्याची, लाघवीपणाची आणि धीटपणाची त्याने स्तुती केली असली तरी तिचे आणि तिच्या माहेरच्या माणसांचे राजावरील वर्चस्व त्याला बिलकुल पसंत नव्हते.[३०]

चतरसिंगाचा मुलगा बाळासाहेब भोसले हा ग्रँटच्या विशेष पसंतीला उतरलेला राजघराण्यातील पुरुष होय. लोक त्याला सेनापती म्हणत. तो आपल्या बापासारखाच दिसतो आणि वागतो असे लोकमत होते. आपल्या बापाप्रमाणेच लोकप्रिय होण्याचे गुण त्याच्या अंगी निश्चित आहेत असे ग्रँटचे मत होते. तो अत्यंत स्वाभिमानी होता, आणि राजाशी त्याचे संबंध परमस्नेहाचे होते. पण राजाच्या मनात त्याच्याबद्दल असूया असावी असा ग्रँटला संशय होता.

---

२९. Dr. R. D. Choksey : The Aftermath, p. 267.
३०. कित्ता.

१८१९ सालीं राजाविषयी बनविलेली त्याची मते अधिक सहवासामुळे बदलत गेली. राजाने कष्टात कसूर न करता राज्यकारभाराचे ज्ञान करून घेतले. त्यामुळे सत्तांतराचा जो निर्णय कंपनी सरकारने केला होता त्याची कार्यवाही सुलभ होणार होती. १८२१ साली ईस्ट इंडिया कंपनीच्या चार्लस् ग्रँट याला साताऱ्याविषयी लिहिलेल्या पत्रात राजाविषयी आपला अनुभव फार चांगला आहे असे प्रथमच नमूद करून तो म्हणतो, "परंतु त्याच्याकडे सत्ता सोपविल्यानंतर तो कसा वागेल हे पाहिले पाहिजे. अर्थात आपण आपल्या अपेक्षांबाबत जास्त आशापूर्ण असावे असे नाही. प्रत्यक्ष वर्चस्वाखाली असताना अधिक समर्पक वर्तन करणारी माणसे जेव्हा त्यांच्यावरील वर्चस्व केवळ नैतिक स्वरूपाचे असते तेव्हा अगदी निराळी बनतात.

राजाला मी सुयश चिंतितो, कारण तो अत्यंत सुस्वभावी आणि इतरांहून वेगळ्या प्रकारचा मराठा आहे. पण त्याला अनियंत्रित अधिकार द्यावेत असे मला वाटत नाही; कारण त्याच्या दरबारातील जे लोक आहेत ते अगदी दुष्ट आहेत, ते कधीही सुधारणार नाहीत आणि त्याच्या घाणेरड्या सवयी दूर कराव्यात असे वाटले तरी ते शक्य होणार नाही. त्यामुळे राजाला आपला अधिकाराचा दुरूपयोग करण्यापासून परावृत्त करणे कठीण आहे."[३१]

---

३१. Our Raja has turned out very well, but as no one can be thoroughly known until seen to what use he applies power we must not be too sanguine in our expectations. Persons who act with great propriety when under direct control, become very different when only under that sort of control which is acquired by influence. I wish him well because I think he has a wonderful good disposition for a Mahratta, but I am not an advocate for allowing him unlimited power here within his own territory because the generosity of those who compose his Darbar are such incorrigible villians ( a strong but not an unjust expression ) that it will be impossible for the Raja to prevent these excesses even if he has the good sense to avoid their bad habits."

(२०-४-१८२१)

सातारा सोडण्यापूर्वी राजाबद्दल ग्रॅंटला समाधान वाटत होते त्याच्या बारीकसारीक हालचाली टिपून तो त्याच्या स्वभावाचे निरीक्षण करीत होता. एल्फिन्स्टनने ग्रॅंट असेपर्यंत एकदा साताऱ्यास यावे अशी राजाची फार इच्छा होती. पण त्याला सवड नव्हती. प्रस्तुत संदर्भात एल्फिन्स्टनला लिहिलेल्या पत्रांत ग्रॅंटने राजाविषयी आपला आदर व्यक्त केला आहे. तो लिहितो, "राजा शहाणा झाला आहे याचे मला कालच्या इतके स्पष्ट प्रत्यंतर अद्याप आले नव्हते. आपल्याला फुरसत होणार नाही असे जेव्हा मी म्हणालो तेव्हा मध्येच मला थांबवून तो म्हणाला, "मी पुण्यापासून एक कोस अंतर जाईन, आणि तेथे आपण त्यांचा सल्ला घेऊ." अर्थात तुम्हाला देखील राजाला भेटण्याची इच्छा असेल, पण या भेटीत काही तांत्रिक अडचणी आहेत याची मला नंतर कल्पना आली. आपण एका राजाचे प्रतिनिधी आहात, आणि या राजाला केवळ संपूर्ण समानतेच्या दर्जावरच आपल्याला भेटणे शक्य होते.

"माझ्या या चालढकलीचा अर्थ त्याने जाणला. तो गंभीर होऊन माझ्यापुढे बसला आणि म्हणाला, "माझ्या लोकांना माझ्याविषयी सतत आदर वाटेल अशी वागणूक मी ठेवली पाहिजे याची तुला कल्पना आहे, आणि एल्फिन्स्टनची विचारसरणी अशीच असेल याबद्दल मला शंका नाही. मी स्वतःला बडा महाराजा अथवा हिंदू पातशहाच्या कोटीत नेऊन बसवीत नाही. तुमचे धोरण मी पूर्ण जाणतो." यावर मार्ग म्हणून राजा सुचवितो, 'सातारा ही तख्ताची जागा सोडून दुसरीकडे कोठेतरी अगदी समानतेच्या दर्जावर खुर्ची-टेबलावर बसून आपण बोलू-भेटू शकतो किंवा आपण सारे जमिनीवर बसू-एल्फिन्स्टनसाहेब घोड्यावरून आले तर आपण घोड्यावरून येऊ, हत्तीवरून आले तर आपणही हत्तीवरून येऊ. त्यांना असे वाटले की मी त्यांना तुमच्या घरी जाऊन भेटावे, तर पाहुण्याला भेटावयास जातात तसा मी त्यांना तुमच्या घरी भेटेन. अथवा माझ्याकडे उतरण्याची त्यांची इच्छा असेल तर त्यांना आवडेल असे मी त्यांचे स्वागत करीन."

राजाच्या बोलण्यातील प्रामाणिकपणा, तळमळ आपल्याला विशेष जाणवली असे सांगून तो पुढे लिहितो, "माझ्या बोलण्याने राजाच्या भावना दुखावल्या होत्या, पण मला खरोखरच असा प्रश्न पडला आहे की राजाइतके व्यवहारज्ञान असणारे किती भारतीय आपल्याला भेटतील ? माझा तरी आतापर्यंतचा अनुभव असा आहे की अगदी शहाण्यातला शहाणा

माणूस देखील जेव्हा त्याच्या स्वत्वाला थोडासा जरी धक्का बसला तरी मूर्खासारखा वागतो."[३२]

ग्रँटची राजाविषयीची ही मते अनुभवांती बनलेली असल्यामुळे त्यांना विशेष महत्त्व आहे. प्रतापसिंहाला इंग्रजांच्या कलाप्रमाणे वागणे भाग होते याचे कारण त्याचे सारे मोठेपण आणि अस्तित्व त्यांच्यावर अवलंबून होते. पण विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे इंग्रजांच्या मार्गदर्शनाखाली त्याने राज्यकारभाराचे ज्ञान संपादन केले. ग्रँटसारख्या करारी आणि काटेकोर माणसाला देखील त्याच्याकडे राज्याची सूत्रे सोपविण्यास कसलीच चिंता वाटत नव्हती. तो म्हणतो, "माझी खात्री पटली आहे की राजाला आपण अधिक जवळचे वाटतो. आमच्या विरुद्ध त्याला उभे करण्याचे ज्यांनी प्रयत्न केले त्या सर्वांना त्याने आता शांत केले आहे."[३३]

---

३२. एल्फिन्स्टनला पत्र :

"I thought and knew the Raja had hurt, but I really question if there are many natives of India that would show so much common sense. I have always found the wisest of them perfectly devoid of head when self was touched in the slightest degree." (१-९-२२).

३३. एल्फिन्स्टनला पत्र :

"The Raja I am convinced is really attached to us and I hope he has sufficiently good sense to remain so. He has completely put down all the attempts of those immediately about him who have at different times attempted either by insinuation or ridicule to set him against us."
(२९-८-२२)

४

# ग्रँटसाहेबाचा दस्तुर

एल्फिन्स्टन हा वृत्तीने बराचसा सनातनी होता. पेशव्यांकडून जिंकून घेतलेल्या प्रदेशावर हुकूमत गाजवताना प्रचलित व्यवस्थेत क्रांतिकारक बदल करावयाचा नाही असा त्याचा दंडक होता. ग्रँटला दिलेल्या विस्तृत सूचनापत्रकात या तत्त्वाचा आवर्जून उल्लेख केला होता. नवीन नियम बनवून साताऱ्यावर राज्य करावयाचे नसून, प्रचलित शासनपद्धतीत आवश्यक तेवढ्याच सुधारणा करावयाच्या, शासनाला शिस्त लावावयाची आणि विशेषत: लाचलुचपतीचे उच्चाटन करावयाचे हे आपले सूत्र त्याने ग्रँटला सांगितले होते, आणि त्याप्रमाणे तो प्रशासन करीत होता. जवळ जवळ प्रत्येक दिवशी—विशेषत: पहिल्या वर्षी––तो साताऱ्यातील बारीकसारीक हालचाली एल्फिन्स्टनला कळवीत असे आणि त्याचे मार्गदर्शन घेत असे. साताऱ्यातील परिस्थिती, राजा आणि त्याचे सहकारी, तेथील दैनंदिन कामकाज, रामोशी आणि त्यांच्यापासून होणारा उपद्रव, बाजीरावांच्या हस्तकापासून होणारा त्रास, शिबंदीचा प्रश्न, कॉलरा, प्लेग यांपासून झालेली हानी इत्यादि अनेक गोष्टींची माहिती या पत्रव्यवहारावरून मिळते.

राज्यकारभार यशस्वी करण्यासाठी राजा आणि अधिकाऱ्यांच्याबरोबरच लोकांचे देखील सहकार्य हवे होते. अधिकारसूत्रे हाती घेतल्यावर ग्रँटने गावातील प्रमुख नागरिकांना बोलावून घेतले आणि आम्ही तुमचे रक्षण करू, जीवनोपयोगी वस्तूंवर जे कर लादले आहेत ते काढून टाकू, बाहेरून धान्य आणि कापड यांची आयात होण्यास उत्तेजन देऊ, असे आश्वासन दिले. साताऱ्याचे लोक फार गरीब आणि दयनीय अवस्थेत आहेत असे सांगून तो म्हणतो की येथील सराफदेखील इतके गरीब आहेत की एकटाकीने ते २०,००० रुपयेही ते उभे करू शकत नाहीत. (२०–४–१८)

पेशव्यांनी नेमलेल्या अधिकाऱ्यांना कामावरून दूर करण्याच्या कामी लोक आपल्याला आनंदाने मदत करावयास तयार आहेत, पण त्या गरीब बिचाऱ्यांवर असा सूड घेणे बरे नव्हे असे त्याला वाटत होते. या लोकांची अन्य काही व्यवस्था झाल्याखेरीज त्यांना कामावरून कमी करणे उचित ठरणार नाही, असे त्याचे मत होते. (२८–४–१८)

सैनिक अथवा शिबंदीचा प्रश्न फार महत्त्वाचा होता. इंग्रजांशी लढून पराभूत झालेले सैनिक आता साताऱ्यास परतत होते. सारी मराठी सत्ताच उध्वस्त झाल्यामुळे त्यांना काही आधार राहिला नव्हता आणि इंग्रजांकडे आसरा मिळणार नव्हता. सुमारे १०००० सैनिक-शिलेदार गोदातीर पार करून आले होते. फलटण येथे जवळ जवळ २०० शिलेदार शांतपणे येऊन राहिले. तेव्हा प्रश्न असा होता की शत्रूच्या पाईकांना निमूटपणे आपल्या वतनावर जाऊ द्यावयाचे की त्यांच्यावर हल्ला करून त्यांना मोडून काढावयाचे. याबाबतीत एल्फिन्स्टनच्या सल्ल्याने त्याने असा निर्णय घेतला की, या शिलेदारांनी बंडखोर म्हणून अथवा बाजीरावाचे सहकारी म्हणून शस्त्र हाती धरले नाही, तर भूतकालीन कृत्यांबद्दल त्यांना शासन करावयाचे नाही. पण त्यांनी जर का दुसरा कोणताही मार्ग अवलंबिला तर चोरदरोडेखोरांच्या मरणाने त्यांना मरावे लागेल. (४-५-१८)

राज्यात करावयाच्या नेमणुका, सरहद्दी, जहागिरदारांची व्यवस्था, जमीनमहसूल इत्यादि अनेक बाबतीत त्याला येणाऱ्या शंकांचे तो निरसन करून घेत असे. केवळ आळस झाडून आपण काम करतो एवढेच शाबासकीचे शब्द त्याला एल्फिन्स्टनकडून नको होते. पण आपली कामगिरी ही त्याच्या अपेक्षेप्रमाणे घडावी आणि त्यावर त्याच्या पसंतीचे शिक्कामोर्तब पडावे ही आपल्या जीवनातील अभिमानाची घटना राहील असे तो म्हणत असे.[१]

ग्रँटच्या लिखाणातील चुका एल्फिन्स्टनने काढून दाखविल्या असता तो म्हणतो, "त्या चुका आहेत हे माहीत असूनही त्या माझ्या हातून घडत आहेत याचे कारण आपल्याला सतत येथील स्थानिक लोकांशी बोलावे लागते. त्यामुळे त्यांचे शब्द इतके तोंडात बसले आहेत की इंग्रजीऐवजी झटकन मराठीच शब्द येतात.[२]

शासनाला शिस्त लावणे, कामकाजात सुसूत्रता आणि नियमितपणा आणणे आवश्यक होते. कारण या बाबतीत साताऱ्यात सारा गोंधळच होता. एका खात्याचा उपयोग दुसऱ्या खात्याला होत नसे. जागाही अपुरी होती. पावसाळ्याचे दिवस खेरीज करून तंबू ठोकून काम करावे लागे.

---

१. "The proudest feeling of my life will always be from your approbation." (७-५-१८१८)

२. ..but these words from talking all day with natives come readiness and appear to express what is wanted so much better than an English word.

ग्रँटच्या या साऱ्या हालचाली गावातील निरुद्योगी लोक तटस्थपणे पाहात असत. तो म्हणतो, "येथे सुमारे २०० तरी निरुद्योगी लोक आहेत. ते दिवसातून एकदा तरी येतात, टक लावून आमच्याकडे पाहतात आणि निघून जातात." (१०-९-१८१८) दिवाण, प्रमुख दप्तरदार, दप्तरदार आणि चिटणीस यांचे अधिकार आणि कार्यक्षेत्र निश्चित करण्यात आले. फौजदारी व्यवस्थेसंबंधीचे नियम तयार झाले, आणि असे करीत असताना प्राचीन हिंदू परंपरेला फारसा बाध येणार नाही याची खबरदारी घेण्यात आली. कामकाजाची वहिवाट त्याने ठरवून दिली होती. "त्यांत विठ्ठलपंत याणी दिवाणगिरी करावी, फडणीसी कृष्णराव याणी करावी. दप्तरचा अधिकार तात्या अभ्यंकर याणी करावा. चिटणीसी किंवा फडणीसी कोणतीही पत्रे दिवाणाचे हुकुमानी व्हावी पत्रे होणे विसी चिटनिसानी कागद वाचून दाखविणे तयार करणे ही दिवाणाचे समक्ष व्हावी."[३]

भारतीय राज्यकारभारात खानेसुमारीचे महत्त्व अद्याप प्रस्थापित व्हावयाचे होते. गावझाड्यातून गावच्या जमिनींची आणि कुळांची माहिती येत असे. "पण घरे, माणसे व गुरे" यांचा झाडा घ्यावयाची काही योजना नव्हती. महाडीक, थोरात आदि वतनदारांना ग्रँटने विनंती केली, "..हरयेक तालुक्यातील घरे व माणसे व गुरे किती आहेत याचा झाडा घ्यावयाचा दस्तुर कंपणी सरकारात आहे याकरिता नमुन्याप्रमाणे श्री मन्माहाराज छत्रपती साहेब यांचे इलाख्यातील झाडा तयार करून पाठविण्याविसी लिहून आले...एसीयास आपलेकडील सरंजामी व ईनाम गाव वगैरे या इलाख्यात असतील त्याचाही झाडा आला पाहिजे यास्तव कलमी केले आहे तरी आपलेकडील मामलेदार व जमीदार व पाटील व कुलकर्णी यास असी ताकीद व्हावी जे माहाराज यांचे सरकारचे मामलेदाराकडेस त्याणी रुजू होऊन नमुना आधी समजून घेऊन त्याप्रमाणे वीस दिवसात झाडे तयार करून देवावे या कामास आपलेकडील कामदार अथवा वतनदाराकडून विलंब लागल्यास इकडील एकंदर कागद जलद तयार होऊन..(कागद फाटला आहे)..तारीख ७ सप्तंबर १८२०."[४]

ग्रँटने दैनंदिन कामकाजात शिस्त आणण्याचा बराच यशस्वी प्रयत्न केला होता. राजाने आपल्या अधिकाऱ्यांना काही कामे ग्रँटला विचारून करावीत असे हुकूम दिले होते. ग्रँटला विचारून करावयाच्या कामांची

३. डे. कॉ. रु. ५५ फा. १२ (२८) ७-३-१८२१.
४. डे. का. रु. ५५ फा. १२ (४;५)

यादी केली जात असे आणि ग्रँटने दिलेल्या आज्ञांचा उल्लेख डाव्या बाजूस समासात केला जात असे. शासनातील तपशीलाकडे लक्ष पुरविण्यास एल्फिन्स्टनने बजावले होते. तो तपशील कशा स्वरूपाचा असे याची कल्पना या कामांच्या याद्यांवरून येईल.[५]

कुरणात गुरे चरावयास पंधरा दिवस अवकाश करावा का यास ग्रँटने उत्तर दिले, 'पंधरा दिवस गवत देवावे, आम्हापासी घास नाही पुढे कुरणात रवानगी व्हावी.' (४-७-२२)

पत्रावर तारीख खाली असावी की वरती असावी हे देखील ग्रँटशी बोलून ठरविले आहे. ग्रँटने सांगितले की, "इकडून वरती तारीख घालून रवाना करावे म्हणजे तिकडूनही वरती तारीख घालून येईल."
(८-९-२२).

अधिकाऱ्यांकडे कामे सोपविल्यानंतर ग्रँट ती कामे झाली आहेत किंवा नाही याची जातीने चौकशी करीत असे. अशा वेळी पुढीलप्रमाणे सवाल-जबाब होत.

'फिर्यादी कमी आहेत की नाही
कमी आहेत उत्तर केले.
काम कसे चालते पुसले
दस्तुर माफक चालते सांगितले.
पंचाईत प्रकर्णी यादी तयार आहेत की नाहीत
आहेत म्हणून सांगितले.

बालाजीपंतास पत्र लिहावे की बखर पावली बहुत मेहरबानगी जाली पाहून परत पाठवू. (८-९-१८२२)

बाळाजी पंताने पाठविलेली बखर म्हणजे बहुधा ग्रँटच्या विनंतीनुसार बाळाजी नातूने लिहिलेला मराठ्यांचा इतिहास असावा. याचा उल्लेख ग्रँटने आपल्या पुस्तकात कृतज्ञतापूर्वक केला आहे.[६] बाळाजीपंताच्या मराठी बखरीचे ग्रँटने मॉरीसकडून इंग्रजी भाषांतर करून घेतले होते. कदाचित त्याचा त्याने आपल्या इतिहासासाठी बराच उपयोग करून घेतला असावा. प्रस्तुत बखरीचा शोध मात्र अद्याप लागला नाही.

---

५. कित्ता रु. ५५, फा. १२ (१३,२९,१४,१०.).
६. ग्रँट डफ भाग २, पृ. ४७० तळटीप.

दुसऱ्या एका यादीत विचारले आहे,

"जीवनराव (जानराव नाईक निंबाळकर) याणा (किल्ल्यावर) दोन वेले जावे लागते चंदी वाटणे व हजरी व झाडा व चौकसी पाहण्याचा बंदोबस्त पाहून येणे...... जीवनराव यास ताकीद केली की सुभेदार यास घेऊन बंदीवान यासी बोलणे ते बोलत जावे."

यावर ग्रँटची आज्ञा अशी, "दिवसा जाणे येणे बोलणे चिंता नाही साहा वाजता अस्तमानी तोफा जालीयावर जाणे बोलणे जीवनराव याची मगदुर नाही सुभेदारासी बोलावे सुभेदारास घेऊन जरा तरी जावे." (२१-८-१८२२)

'दिनकराव मोहिते याचे कुटुंब नागपुरी आहेत आणावयास जातात त्यास दस्तक.'

दस्तकाप्रमाणे करावे.

"बडे साहेब (एल्फिन्स्टन) आले पुणियास त्यास फरालास वगैरे काही पाठवावे त्यास आपले सलेस आले तरी पाठऊ"

—पाठवावे. (२१-८-२२)

विठोबा दिवाणांने काही प्रकरणांचा निकाल कसा लावावा या संबंधीचे समक्ष हुकूम कृष्णराव फडणीसाच्या साक्षीने ग्रँटने १ एप्रिल १८२२ रोजी दिले होते. त्यांतील काही बाबी अशा होत्या :

'वर्धाघाटावर चौकी बसविण्यास पंत सचीवास सांगावे आणि वर्धा ते प्रचितगड यांच्या दरम्यान असलेल्या घाटांचा नकाशा करून घाट पाहून दर घाटास १ कारकून व सिपाई नेमावे.

रूपसिंग, मुरारी या रामोशांना पकडून देणाऱ्यास प्रत्येकी १ हजार रुपये इनाम द्यावे, आणि तो अथवा त्याचे साथीदार जर लोकावर चालून आले तर त्यांना तलवार अथवा गोळी घालून ठार करावे.

तोफखान्याकडे दोन तोफा तयार ठेवाव्यात व त्यावर एक हवालदार आणि चोवीस गोलंदाजांची नेमणूक करावी.

कचेरीचे वाड्यास खजिन्याकडे व आसपास चौकी पाहाण्यास नेहमी असामी ७५ ठेवावेत'—त्यांच्या तपशील दिला आहे.

वाळूच्या घड्याळाची देखरेख करणाऱ्या पाहरेकऱ्यास हालीच्या दस्तुराप्रमाणे तास वाजविण्यास सांगावे.

अ‍ॅडॅम आणि मॉरिस यांच्याकडील शिपाई काढून ते सरकारी कामास लावावे.

परळीच्या रामदासस्वामीकडे दहा शिपाई आहेत त्यांपैकीं ४ शिपाई काढून इकडे घ्यावेत.

शिपायांच्या बदल्या दरमहिन्यास कराव्यात असा दंडक होता. त्यांचे दरमहाचे पगार ठरवून दिले होते. (१–४–१८२२)

वरील उदाहरणावरून ग्रँटच्या साताऱ्यातील कार्यपद्धतीची कल्पना येते. अगदी बारीकसारीक तपशिलाच्या गोष्टीकडे तो जातीने लक्ष पुरवीत असे. राज्याच्या धोरणात क्रांतिकारक बदल करावयाचे नाहीत पण राज्यकारभाराच्या तपशिलात शिरून तो अधिक कार्यक्षम करावयाचा या एल्फिन्स्टनच्या सूचनेची अंमलबजावणी ग्रँट अगदी काटेकोरपणे कशी करीत असे हे वरील उदाहरणांवरून स्पष्ट होते.

लोकांच्या भावना जपल्या पाहिजेत हे एल्फिन्स्टनच्या शासनाचे मुख्य सूत्र होते. राज्याच्या उत्पन्नापेक्षा लोकांच्या भावना श्रेष्ठ आहेत हे पंढरपूर क्षेत्रातील दारूबंदीच्या धोरणाबाबत ग्रँटला त्याने जे मार्गदर्शन केले त्यावरून समजून येते.

सातारा राज्यात दहा हजार गॅलन इतकी दारू तयार होत असे आणि ती खपत असे दारू तयार करणे, विकणे हे अधिकार सार्वजनिकपणे विकले जात. लिलावात सर्वात अधिक रक्कम देणाऱ्यास तो हक्क जाई. पूर्वीच्या राजवटीत पंढरपुरात दारूबंदी होती. जत्रेच्या वेळी गडबड होऊ नये म्हणून बाजीरावाने ही दारूबंदी घातली होती. पण त्यामुळे सरकारचे नुकसान होऊ लागले, असे वाटल्याने ग्रँटने ही बंदी उठविली. पण लोकांनी याबाबत एल्फिन्स्टनकडे तक्रार केली. पंढरपुरासारख्या तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी दारूविक्री करून लोकांचा अवमान करणे ठीक नाही असे सांगितल्यावरून ग्रँटने पंढरपुरात दारूबंदी जारी केली.[७] (८–१०–१८२१)

न्यायदान ही शासनाची एक प्रमुख बाजू आहे, आणि राजाने त्यात विशेष लक्ष घालावे असे ग्रँटला वाटे. राजाकडे क्रमशः जे हक्क द्यावयाचे त्यात न्यायखाते याला अग्रपद देण्यात आले होते. न्यायाच्या बाबतीत लाचलुचपतीचे प्रकार घडू नयेत म्हणून त्याने एक जाहीरनामा काढला होता : "पंचायतीचे हरएक कामाकरिता कोणी लाच देऊ नये...लाच

७. Outward Register, Alienation Office, Poona.

दिली असे शाबीत जाल्यास ज्या कामासंबंधे लाच घेतली ते काम पंचायतीत मुकरार जाहाले असे तरी लाच दिल्हे सबब जे खोटे होईल वतनसंबंधे दिल्ह्यास त्याजकडून वतन काढून त्याचे प्रतिवाद्याचे हवाले केले जाईल याजकरिता प्रतिवादे याणी या शोधात हरहमेशा असावे..''

पंचायत व्यवस्थेबद्दल इंग्रजांना फार कौतुक होते. पण हे पंचायतीतील लोक नेटाने काम करीत नसत असे ग्रँटचे मत बनले होते. त्यांच्या काम करण्याच्या पद्धतीचा एक नमुना ग्रँटने दिला आहे. पोपटाच्या चोरीचा गुन्हा एकाने केला होता. ग्रँटने पंचायतीला सर्व प्रकरण समजावून दिले, पण पंचायतीत निर्णय होईना. ग्रँट म्हणतो, "दिवसानुदिवस ते बसत, 'कस कस' असे बोलत आणि निर्णयाप्रत येत नसत."[८] (६–९–१८).

अनेक प्रकारच्या गुन्ह्यांना त्याला तोंड द्यावे लागे. एल्फिन्स्टनशी सल्लामसलत करून निर्णय घ्यावा लागे. एल्फिन्स्टनला त्याने एका व्यभिचारी स्त्रीची हकीकत सांगून या प्रकरणाची विल्हे कशी लावायची असे विचारले आहे. एका बाईने, आपल्या कुंभार जातीच्या प्रियकराच्या साहाय्याने आपल्या पतीचा खून करण्याच्या कामी एका रामोशाची योजना केली. या कामासाठी १० रुपये बक्षिसी ठरली. खून झाला, पण रामोशाच्या हातावर पाचच रुपये टिकविले गेले. रामोश्याने सरकारात तक्रार गुदरली, आणि ही बातमी साऱ्या गावभर पसरली. तेव्हा ती बाई आपल्या प्रियकरासह पळून गेली. पुढे त्यांना पकडण्यात आले आणि त्यांनी आपला गुन्हा कबूल केला. त्यांना किल्ल्यावर डांबून ठेवण्यात आले आणि प्रकरण एल्फिन्स्टन साहेबाकडे पाठविले. (३१–५–१८)

कंपनी सरकारच्या लोकांना देखील न्यायाच्या बाबतीत दया दाखवावयाची नाही असा ग्रँटचा दंडक होता. लष्करचे लोक गुन्हेगारी बरीच करीत. तेव्हा या बाबतीत एक खास जाहीरनामा काढला होता, "माहाराजाचे सरकारचे राज्यात कंपनी सरकारचे लष्करचे सीपाई अगर लष्करचे कोणी आदमी याणी अपराध करीतील त्याची चौकसी साहेब मवसुफ याणी जनॅल कारटमारसल यास हुकुम करून अपराधाप्रमाणें दस्तुर माफक मगदूरपणे लष्करचे लोकास शिक्षा करणे ठरेल त्याप्रमाणे करीत जाणे."[९]

---

८. डे. कॉ. रु. १ : ६ : ३ ता. १६ मे १८२०.

९. डे. कॉ. रु. १ : ६ : ५.

बाजीराव बिठूरला गेला असला तरी त्याची पत्नी वाराणसीबाई अद्याप वाईलाच होती. बाजीरावाच्या हस्तकांना तिच्यामार्फत मदत होत असणार. बाजीरावाची चीजवस्त, पैसा, निरनिराळ्या लोकांच्याकडे होता. त्याचा तपास लावावयाचा होता. बाळाजीपंताचे म्हणणे पडले की, "बाईला या देशातून कोठेतरी दूर जिथे तिच्याकडे संपूर्णपणे दुर्लक्ष केले जाईल अशा ठिकाणी पाठवावे म्हणजे बाजीरावाचे सारे खेळ थांबतील." (फेब्रुवारी १८१९) एल्फिन्स्टनचेही मत तसेच पडले. तिला खर्चासाठी ५० हजार रुपये देऊन बिठूरला पाठवून देण्याची कामगिरी त्याने ग्रँटवर सोपविली. ग्रँट वाईला गेला आणि त्याने बाईला श्रीमंतांच्याकडे जाण्याची विनंती केली. बाईंनी खूप आढेवेढे घेतले, १ लक्ष रुपये खर्चासाठी मागितले. पण शेवटी ती जाण्यास तयार झाली आणि एल्फिन्स्टनने सांगितलेली रक्कमच त्याने तिला खर्चासाठी दिली.[१०]

इंग्रजांच्या विरुद्ध वातावरण निर्माण करणारी साताऱ्यात अद्याप काही माणसे होती. लोकांच्यामध्ये 'भविष्यवाणी' सांगणारा एक कागद प्रसृत केला जात होता. गावात अशा तऱ्हेच्या अफवा उठत की लौकरच मोठी क्रांती होणार आहे. दोन वर्षांच्या काळात एक राजा निर्माण होईल, तो हा सारा प्रदेश जिंकून घेईल, शांतता स्थापन करील आणि हिंदुधर्माचे रक्षण करील.

अशा घटनांच्या मागे मिशनऱ्यांचा हात असावा असा ग्रँटला संशय येत असावा. कारण एल्फिन्स्टनकडे मुंबईत प्रसिद्ध झालेल्या एका अमेरिकन मिशनऱ्याच्या पुस्तकाची चौकशी करतो. तो म्हणतो, "त्या पुस्तकातले शेवटचे पान जाळून टाकले पाहिजे. येथील लोकांच्याकडे त्याचे भाषांतर आहे—अशा तऱ्हेची पुस्तके आजच्या काळात अप्रस्तुत आहेत." (फेब्रुवारी १८१९)

जमीनमहसुलाची बाब ही अत्यंत गुंतागुंतीची. "माझ्या डोक्यात काही शिरत नाही--फार गोंधळ माजला आहे, कामाचा व्याप वाढतो आहे आणि हे माझ्या कुवतीबाहेरचे आहे--काही तरी नियमितपणा त्यात आणला पाहिजे" असे तो साताऱ्यात गेल्यानंतर दोन महिन्यांनी लिहितो (१३-६-१८). महसूल अधिकारी अगदी बनेल आहेत याची त्याला कल्पना येऊ लागली. तो लिहितो, "काही पाटील कुलकर्णी चांगलेच बनेल आहेत, शिक्षा केली जाणार आहे याची पूर्वकल्पना

---

१०. बॉलहॅचेट, पृ. ४६.

त्यांना आली तर अनर्थ ओढवेल." तेव्हा संपूर्ण माहिती मिळाल्याखेरीज आपल्याला दिलेल्या खास अधिकारांची वाच्यता कोठे करू नये असे मामलेदारांना बजावण्यात आले होते. ( २३-७-१८ )

मामलेदारांवरही संपूर्ण विश्वास टाकता येत नव्हता. शंभुशास्त्री नावाचा एक मामलेदार कामात अत्यंत चोख होता म्हणून ग्रँटची त्याच्या-वर मर्जी होती. पण पुढे त्याला कळून चुकले की तो आपल्याला फसवीत आहे. शिबंदी आणि कारकून यांचे खोटे आकडे दाखवून त्यांच्या नावे पैसा खर्च घालून तो आपण स्वतः घेत होता. त्याचा सार्वजनिकरीत्या अपमान केला तर सरकारी नोकरीतील त्याच्या नातेवाईकांना वाईट वाटेल म्हणून काही गाजावाजा न करता त्याला कामावरून कमी करण्यात आले. ( ८-८-१८१८ )

सातान्यात थोडी स्थिरस्थावर झाल्यावर आपल्या अधिकारकक्षेतील गावात तो हिंडू लागला आणि प्रत्यक्ष माहिती मिळवू लागला. १८१९ च्या सुरवातीस तो कोकणात प्रथमच गेला होता. तेथील रयतेच्या परिस्थितीची त्याने पाहणी केली. नवीन राजवटीखाली रयतेच्या परिस्थितीत सुधारणा नाही, लोक अगदी असमाधानी आणि देशावरील रयतेशी तुलना करताना मागासलेले असे त्याला दिसून आले. कोकणातील वसूल हा सामान्यतः वस्तूंच्या रूपात केला जात असे. हे वसूलीचे प्रमाण काही ठिकाणी उत्पन्नाच्या निम्मे तर काही ठिकाणी त्याहून कमी असे होते. याशिवाय पट्टचा आणि दरतुरी असत. पण याबाबत रयतेकडून विशेष तक्रार त्याच्या निदर्शनास आली नाही. सरकारी नोकरांना वसूलीच्या मार्गात काही अडचणी वाटत नव्हत्या. सरकारी नोकरीत त्याला मुसलमानांचा भरणा अधिक आढळून आला, हे त्याला थोडेसे विचित्र वाटले. कारण हे सारे नोकर त्याला अज्ञानी, निरक्षर आणि काहीसे शिष्ट वाटले. वास्तविक आजच्या परिस्थितीत ब्राह्मणांनाच फक्त जमीन-महसुलाची आणि न्यायदानाच्या पद्धतीची माहिती आहे, पण मुसलमान त्यांचा हरघडी अपमान करतात अशी तक्रार आहे. कमी दर्जाच्या नोकरीसाठी मुसलमानांचा उपयोग होईल असे आपले मत त्याने व्यक्त केले आहे.[११]

---

११. The greater proportion of the native servants employed by our Govt. are Mahommadans.... This is very impolitic–they are illeterate, ignorant and overbearing. In place of using the Bramins

मसूर या खेडेगावाला जेव्हा त्याने भेट दिली तेव्हा त्याला तो गाव सुस्थितीत दिसला. कच्च्या वहिवाटीप्रमाणे गावची व्यवस्था लावण्यात आली होती. परंतु सारे हिशेब गोंधळ निर्माण करणारे होते (१८–४–१९).

महसुलासंबंधीची योग्य ती व्यवस्था लावण्यासाठी गेल्या दहा वर्षांचे हिशेब गोळा करावेत असा पुण्याहून हुकूम आला होता. त्याप्रमाणे ग्रँटच्या हाताखालचे सारे लोक कामाला लागले होते. काही अडचणी न सांगता काम करा असा आदेश त्याने आपल्या लोकांना दिला असला तरी या पाहणीतून काही निष्पन्न निघेल असे त्याला वाटत नव्हते. शेवटी, यशवंतराव, बाळाजीपंत आणि फडणीस या दप्तरखान्यातील तीन अधिकाऱ्यांचे एक शिष्टमंडळ आले आणि ग्रँटला निवेदन सादर करण्यात आले की हा दहा वर्षाचा हुकूम पाळता येणार नाही; मराठ्यांकडे "कच्ची मामलत" हा जो हिशेबाचा प्रकार आहे त्यावरून आणि येथील जमीनबाब आणि इतर उत्पन्नाच्या बाबी यावरूनच ही माहिती मिळेल. ग्रँटला त्यांचे म्हणणे पटत होते. सर्व परिस्थितीचे योग्य ते आकलन व्हावे म्हणून त्याने एक विस्तृत पत्रक तयार करण्याचे ठरविले. आधुनिक हिशेबपद्धती ही आपल्या कामासाठी फारशी उपयुक्त नाही याबद्दल त्याची खात्री पटली होती. ३०–४० वर्षांचे हिशेब मिळवून, जमिनीचा आकार अथवा मोजणीसंबंधीची माहिती गोळा करणे आवश्यक होते. गावच्या कुलकर्ण्याला या कामासाठी प्रवृत्त केल्यास सर्व माहिती मिळेल असे त्याला वाटत होते. या मार्गात अडचणी असल्या तरी प्रयत्न करणे आवश्यक आहे याची त्याला खात्री पटली होती.

पहिल्या वर्षाचा अहवाल त्याने १८१९ मध्ये सादर केला. त्यात पुष्कळ उणीवा आहेत याची त्याला जाणीव होती. १० सप्टेंबर १८२० साली पुण्याचा कमिशनर चॅपलिन याने एक मोठी प्रश्नावली तयार केली होती. त्यात महसुलासंबंधी १२३, मोहतर्फा १५, अबकारी ११, जकात ११, आणि किरकोळ ८ असे १६८ प्रश्न होते. या प्रश्नांना १७ जून १८२१ रोजी ग्रँटने जी उत्तरे दिली आहेत त्यावरून एक-दोन वर्षांत अति परिश्रमाने साताऱ्याची सर्वांगीण माहिती त्याने कशी करून

---

who are at present the only men who possess information regarding the Revenue or the modes of administering justice they complain of being insulted and abused by the Mussalmans on every occasion. १३–१–१८१९.

घेतली होती याची कल्पना येईल. त्याच्या अधिकाराखाली एकूण १७०५ खेडी होती.

जिरायत अथवा कोरडवाहू जमिनीचे प्रकार सांगून काही भागात प्रचलित असलेली त्यांची कानडी नावेही दिली आहेत. उदाहरणार्थ, काळी जमीन रेगुर, मोवत–कुतहाळी, खाचर–गुड्डीहाळी इत्यादि. जमिनीच्या मोजणीसंबंधी वापरल्या जाणाऱ्या आदिलशाही आणि शिवशाही काठ्यांची माहिती ग्रँटने दिली आहे. खटाव तालुक्यातील नेरे या गावी एका दगडावर काठीचे बरोबर माप दिले आहे असे तो म्हणतो. यात आदिलशाही काठी ५ हात लांब ३ हात रुंद तर शिवशाही काठी ६ हात लांब ३ हात रुंद असे दिले आहे. परंतु शिवशाही काठीचे माप लोकांनी पुरविलेल्या माहितीप्रमाणे ५ हात लांब ५ हात रुंद असे आहे असे तो म्हणतो. कॅप्टन ॲडॅमकडे मोजणीचे काम सोपविले होते. त्याने सातारा इलाख्यातून ५५ काठ्या जमा केल्या. त्यातली सर्वात मोठी काठी १० हात १ तसू आणि सर्वात लहान ५ हात २ तसू होती. सरासरी काढली तेव्हा ती ६ हात ६ तसू भरली. या सर्व गोष्टी विचारात घेऊन ॲडॅमने १० फुटास थोडीशी कमी (९'.११६ १७५/१००) अशी मोजणीची काठी निश्चित केली. बिघा, चावर, टका अशा परिमाणांत जमिनीची मोजणी होत असे.[१२]

जमिनीतील पिके, सरकार आणि रयतेचा उत्पादनातील भाग यासंबंधीची माहिती या अहवालात पुरविली आहे. एका शेतकऱ्याकडे आठ बैल असतील तर तो ४ अव्वल, ६ दूम आणि ६ सीम अशी १६

---

१२. ...Whilst some state the Kathee or measuring rod of the Edil Shahee at 3/2 cubits others refer to the exact measure said to be marked on a stone at the village of Nhere in Kuttao which I found 5 cubits and 3 hand breadths wholst another mark by the side of it shows what they there call, the Siew Shahee or Sevajees standard measure which is 6 cubits and three hand breadths, but Sevajees standard measure according to the received opinion of the country is five cubits and five hand breadth."

—from the report ( MSS. EUR–D : 464 reply to question 26. )

बिघे जमीन कसू शकतो अशी माहिती दिली आहे. कमाल आणि किमान खंड किती असे, रयतेचे जमिनीवरील मिरासी हक्क आणि त्याचे स्वरूप गावचे अधिकारी, पाटील, कुलकर्णी त्यांचे हक्क, बलुतेदार, अलुतेदार, चौथ, सरदेशमुखी, मोकासा नाडगौडा, इसाफत गावे कोणाच्या मालकीची इत्यादि विविध बाबींवर फार उपयुक्त माहिती यात आली आहे. गावच्या कुलकर्ण्यावर जमीनमहसूल योजनेचे यश बरेचसे अवलंबून असल्यामुळे या कुलकर्ण्याच्या दप्तराचा त्याने काळजीपूर्वक अभ्यास केला असावा. कुलकर्ण्याच्या दप्तरात जमीनझाडा, लावणीपत्रक, बीजपेरणी याची पटी, कुळगणणी, मोहतर्फाची कुळवार, इस्तावाची पटी, खतावणी, तहशील याद, पट्टीवसुली, ताळेबंद आणि दरसाल जमाखर्च इत्यादि विविध विषय येत असत.

इनाम जमिनीविषयी विस्तृत माहिती देण्यात आली आहे. इनामांचे सहा प्रकार—हिंदू, मुसलमान, देवस्थान, धर्मादाय, देहंगी आणि वतनदार, आणि त्यांचे उपप्रकार यांची अगदी तपशीलवार माहिती प्रथमच पाहावयास मिळते. एका देहंगी इनामाचे २६ प्रकार येथे दिले आहेत. वतनदार अधिकाऱ्यांच्या हक्कलाजिमासंबंधी विस्तृत निवेदन या अहवालात आले आहे. ग्रँटच्या चिकाटीचा आणि अभ्यासूवृत्तीचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून या शंभरपानी अहवालाचा निर्देश करता येईल.

कॅप्टन रार्बटसनबरोबर मिरासी हक्काबद्दल तो चर्चा करतो. मराठ्यांच्या या हक्काबद्दलच्या कल्पनांचा त्याने अभ्यास केला होता. जो प्रथम जंगल तोडून जमीन तयार करतो तो त्या जमिनीचा मालक अथवा मिरासदार असे मराठे मानतात. मनुस्मृतीत देखील हाच विचार आढळला असे तो म्हणतो. पण मिरासी हक्काचे पुरस्कर्ते सांगतात की जमीन ही राजाच्या मालकीची असते, राजा मागेल तो खंड मिरासदाराने दिला पाहिजे, त्याला फक्त जमीन कसण्याचा अधिकार आहे, विकण्याचा अथवा दुसऱ्याला देण्याचा नाही इत्यादि. यावर ग्रँटचे म्हणणे असे की या साऱ्या गोष्टी काल्पनिक आहेत, प्रत्यक्षात असे काही घडत नाही. (३–९–२०)

पेशव्यांच्या वेळेपेक्षा आता वसूल (रसद) कमी का या प्रश्नाला तो उत्तर देतो, "त्यावेळी मक्तेदार कमाल वसूलीहून 'जास्ती पट्टी' आणि इतर अनेक कर लादून पैसा गोळा करीत, आणि पिकांच्या स्थितीकडे लक्ष न देता करवसुली केली जात असे. आम्ही फक्त कमाल बेरीज वसूल करतो. पिकांची स्थिती लक्षात घेऊन काही सवलती देतो, आणि आमचा शासकीय

खर्च मोठा आहे. शिवाय पहिली वर्ष दोन वर्षे आम्हाला लोकांनी फसविले असेल. त्यामुळे साधारणपणे १/४ इतकी घट दिसते." (१३–९–१९)

साताऱ्याच्या परिसरात १८२० साली बसलेल्या एका सौम्यशा भूकंपाच्या धक्क्याची देखील ग्रँटने नोंद घेतली आहे. सातारा वाईच्या अडीच कोसांच्या परिसरातील गावातून धक्क्याची बातमी आली होती. या कोपाचे निवारण करण्यासाठी जत्रा भरविण्याचे बेत लोक करीत होते. पाळणा हलावा अथवा एखादा मराठा सरदार डुलावा तसा हा भाग हलत होता असे तो म्हणतो. लोकांच्या मते छोटया माधवरावाच्या दिवसापासून असा धरणीकंप झाला नव्हता. या भूकंपाचा धक्का कदाचित साताऱ्याच्या उत्तरेस अधिक जाणवला असेल असे त्याने म्हटले आहे. (३०–१–१८२०)

१८१८ ते १८२२ अशी चार वर्षे ग्रँट साताऱ्याच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक जीवनाशी एकरूप झाला होता हे त्याच्या पत्रव्यवहारावरून तसेच अहवालावरून दिसते. मराठी माणसाच्या सहवासामुळे इंग्रजीऐवजी त्यांचे शब्द त्यांच्या तोंडून झटकन येत आणि आपल्या पत्रांतून तो त्यांचा सर्रास वापर करीत असे. 'सीवेचा खटला, कसकस, कसाकसा, रुजवात, समजाव, तुम्हारे सरपर, आपकी मर्जी, गुस्सा, कच्ची वहिवाट, रुकसत इत्यादि अनेक शब्द त्याच्या पत्रातून आढळतात.

ग्रँट हा अत्यंत करारी, जबर आत्मविश्वासाचा आणि परिश्रमी प्रशासक होता. लाचलुचपत अथवा कामचुकारूपणा, आणि सत्तेचा दुरुपयोग त्याला मुळीच खपत नसल्यामुळे राजापासून शिपायापर्यंत सर्वांना कडक शिस्तीचे बंधन पाळण्यास त्याने भाग पाडले होते. बाळाजी पंतासारखा उपयुक्त, कर्तबगार माणूस केवळ या लाच प्रकरणावरून त्याने काढून टाकला. आपल्या कार्याशी तो शेवटपर्यंत प्रामाणिक राहिला.

त्याचे आर्थिक व्यवहार चोख असत. साताऱ्यात त्याने कदाचित भरपूर पैसा केला असावा अशी शंका काहींना येणे स्वाभाविक आहे. पण २६ नोव्हेंबर १८२२ रोजी आपल्या खात्याचा चार्ज जेव्हा त्याने मॉरिस या आपल्या मदतनीसाकडे दिला. तेव्हा त्याच्या आर्थिक व्यवहाराची छाननी होऊन मुंबईच्या अकौंटंट जनरलकडून त्याला शिफारस मिळाली की ग्रँट कंपनीचे काही देणे लागत नाही.[१३]

---

१३. Alienation office. Outward p. 147 dt. 6–1–1823.
" The accounts have been found correct, and that the Hon'ble company have no pecuniary claims on that gentleman."

साताऱ्याच्या नवीन राज्याची घडी नीट बसविण्यासाठी ग्रँटला अनुभवी आणि विश्वासू माणसांची गरज होती. एल्फिन्स्टनने बहुधा बाळाजीपंत नातूची त्याच्याकडे शिफारस केली असावी. तेव्हा साताऱ्यास गेल्यावर तो एल्फिन्स्टनला लिहितो की बाळाजीपंताची शक्यतो लौकर नेमणूक करणे योग्य होईल. त्याच्या एकूण हुषारीबद्दल अथवा त्याच्या निष्ठेबद्दल ग्रँटला शंका नव्हती. परंतु स्वकीयांविषयी त्याच्या मनात अविश्वास होता तो त्याला झाकून ठेवणे जमत नसे याबद्दल ग्रँटची तक्रार होती.[१४] बाळाजीचा आणि कंपनीचा संबंध १८०९–१० पासूनचा जुना होता. रास्त्यांचा प्रतिनिधी म्हणून पुण्याच्या रेसिडेन्सीत त्याचा प्रथम प्रवेश झाला, आणि इंग्रजाशी त्याची घसट वाढली. इंग्रज अधिकारी म्हणजे, "आपले मुरबी दोस्त, आमचे जेणे करून चांगल ते इच्छणारे"[१५] अशी त्याची भावना होती.

ब्रिटिशांच्या राज्यकारभारात बाळाजीचा खरा प्रवेश सातारा प्रकरणापासून झाला. ४ मार्च १८१८ रोजी एल्फिन्स्टनबरोबर बाळाजीपंत प्रतापसिंहास भेटावयास गेला होता. आपल्यातर्फे राजाशी बोलणी करण्याचे कामी एल्फिन्स्टनने त्याची नेमणूक केली होती.[१६] पुढे ग्रँटचा मदतनीस, चीफ नेटिव्ह एजंट म्हणून त्याची नेमणूक द. म. ५०० रुपयावर झाली होती. बाळाजीपंताकडे थोडे अधिकार दिले तर त्याचा परिणाम काय होईल हे सांगणे कठीण आहे असे ग्रँटचे सुरवातीपासूनचे मत होते. एल्फिन्स्टनला तो लिहितो, "तुझे (बाळाजीचे) स्थान हे राजाच्या चांगुलपणावर आणि ब्रिटिशांचे धोरण तू कितपत कार्यवाहीत आणतोस यावर अवलंबून राहील याची त्याला जाणीव द्यावी."[१७]

---

१४. "..that the sooner you place Balajee Pant with the Raja the better. Balajee is a very steady (?) sensible man, and if I have observed any fault in filling him for this situation, I should say, it was his taking so little pains to conceal his distrust of his own people." (एप्रिल, १८१८)

१५. भा. इ. सं. मं. इ. वृ. १८३८ पृ. १०.

१६. मराठी रियासत उ. वि. ३ पृ. ५२९.

१७. "..depends much on the Raja's good will and still more on the manner he conducts himself in carrying into effect the objects of the British Govt." (एप्रिल, १८१८).

बाळाजीकडे हरप्रकारची जबाबदारीची कामे ग्रँट सोपवीत असे. विशेषतः राजाची समजूत काढणे आणि इंग्रजांचे धोरण त्याच्या गळी उतरविण्याच्या कामी तो बराच उपयुक्त ठरला होता. सातान्याच्या कक्षेतील जहागिरदाराची बातमी काढून त्याचा अहवाल मराठीत एल्फिन्स्टनला सादर करण्याची महत्त्वपूर्ण कामगिरी ग्रँटने त्यालाच सांगितली होती. ( ६-६-१८ )

बाळाजी हा फार महत्त्वाकांक्षी होता. केवळ ग्रँटचा मदतनीस म्हणून सातान्यात राहण्याची त्याची इच्छा नव्हती. त्याला सातान्याचे दिवाणपद हवे होते. पण सतत कंपनीची तरफदारी करण्याचे काम त्याने केल्यामुळे प्रतापसिंहाच्या मनातून तो उतरला असावा आणि त्याची दिवाणगिरी हुकली असावी. एल्फिन्स्टनचे आणि त्याचे संबंध चांगले होते. आपल्या मुलीच्या लग्नाच्या निमित्ताने एल्फिन्स्टनला पत्र लिहून त्याने आपल्या मनोगताची त्याला आठवण करून देण्याचा प्रयत्न केला होता. "...मुलीचे लग्न करावयाचे, त्यास साहेबास अर्ज करून व्हावे ही इच्छा. परंतु साहेबाचे कदमापासून दूर राहणे जाहाले, यामुळे मेहरबां ग्रांटसाहेब याजवल साहेबाचे खिजमतीत ल्याहावयाविसी अर्ज केला, त्याणी साहेबास लिहिलेच आहे व तर्तूद करण्याविसी मला हुकूम दिल्हा,... साहेबाचे कदम मुबारख होऊन कार्य सिधीस जाई ते जाहाले पाहिजे. लोखंड परसास लागल्यावर सोने होईल की नाही ही कालजी लोखंडास राहात नाही. माझे मनात काय आहे ती येते वेलेस विनंती केलीच आहे [१८] (२१-५-१८१८). हे पत्र सातान्यास आल्यानंतर सुमारे महिन्याच्या आतबाहेर त्याने लिहिले आहे, त्यावरून काय उमेद उराशी बाळगून तो या राजधानीत आला होता याची कल्पना येते. बाळाजीपंताच्या आठ वर्षाच्या या मुलीच्या लग्नासाठी १ आठवड्याची रजा आणि काही पैसा देण्याचे ग्रँटने कबूल केले. (१३-६-१८१८)

वेळ थोडा आणि कामे फार अशी ग्रँटची अवस्था झाली होती. सुटी न घेता सारे काम झटपट उरकले पाहिजे अशी त्याची अपेक्षा होती. हिंदूंच्या सणांना सुटी मोठ्या नाइलाजाने तो देत असे. बाळाजीपंताला रजा देणे त्याच्या जिवावर येत असे. कारण तो नसला म्हणजे सारे गाडे अडून बसत असे. पण बाळाजीलाही कामाचा कधी कधी कंटाळा येई. तो म्हणे, "आता बस्स झाले. अशाने काम लौकर संपेल आणि मग एल्-

---

१८. पे. द. ४१, क्र. २०८.

फिन्स्टन साहेबाला काही काम राहणार नाही." बाळाजी म्हणजे एक हुषार, डोकेबाज माणूस आहे, तो चर्चा करीत बसणार नाही, त्याला समज चांगली आहे, आणि निदान आजपर्यंत तरी त्याची निवड केल्याचा मला पश्चात्ताप होत नाही.[१९]

दप्तरखान्याची सर्व जबाबदारी बाळाजीकडे सोपविण्यात आली होती. तेथील लोकांच्याकडून तो व्यवस्थितपणे कामे करून घेत असे. काही काही वेळा तो कामाचा आळस करी, अथवा मला देवदर्शनाला जावयाचे आहे असे म्हणून निघून जात असे. अशा वेळी ग्रँटला गप्प बसावे लागे. त्यामुळे कामाची बाकी राहात असे. अधिक वेळ बसून होईल तितके काम ग्रँट उरकीत असे. त्याने रजा नाकारली तर "साहेब की मर्जी" असा सुस्कारा टाकून तो कामावर जाई पण मग ग्रँटवरचा राग हाताखालच्या लोकांवर काढीत असे. कारकुनाने दिवसाची जरी रजा मागितली तरी तो देत नसे. (३१–७–१८१८)

ग्रँटला पुढे पुढे असे वाटू लागले की आपल्या हाताखाली एखादा इंग्रज अधिकारी असेल तर फार बरे होईल. बाळाजीपंत हा परिश्रमी आणि अत्यंत उपयुक्त सहकारी आहे याबद्दल दुमत नसले तरी तो स्थानिक आहे, त्यामुळे ज्या गोष्टीत आपल्याला काही पूर्वानुभव नाही ते आपण बनदिक्कत त्याच्याकडे सुपूर्द करू शकत नाही असे तो म्हणत असे. इंग्रज माणसाला आपल्या अधिकाऱ्याच्या हुकुमामागे काय भावना आहेत हें जितक्या सहजपणे समजू शकेल तितके स्थानिक अधिकाऱ्याला जमणार नाही. इंग्रज साहाय्यकाकडे एखादी नवीन कामगिरी सोपविली तरी तिची कार्यवाही करताना सरकारच्या मूळ धोरणापासून तो फारसा ढळणार नाही (ऑगस्ट १८१८). बाळाजी आणि ग्रँट यांच्यामध्ये अशा रीतीने हळूहळू मतभेद निर्माण होऊ लागले.

नोकरांना जमिनी तोडून देण्याचा दस्तुर कंपनी सरकारात नव्हता. पण बाळाजीच्या बाबतीत एल्फिन्स्टनने या नियमाला थोडी मुरड घातली होती. पुणे जिल्ह्यातील तीन व अहमदनगर जिल्ह्यातील दोन अशी

---

१९. Balajee Pant is certainly a devilish fine fellow; he makes no discussions, and he comprehends what he is told in a moment; as yet I have had no reason to repent my choice of him—14–7–1818.

११९८१ रु. वार्षिक महसुलाची पाच गावे इनाम म्हणून त्याने बाळाजीला दिली होती. कंपनी सरकारची चाकरी प्रामाणिकपणे कशी करावी हे बाळाजीपंताला देऊ केलेल्या इनामाच्या निमित्ताने समजेल म्हणून ही देणगी दिली जात आहे असे त्याने समर्थनही करण्यात आले.[२०] एल्फिन्स्टनच्या या निर्णयावर खूष होऊन बाळाजी त्याला लिहितो, "शेवकाकडून इतकी खिजमत जाहाली नसता इनाम बहुत मिळाले. फिदवीची उमेद इतकी नवती. या मेहेरबानीचा बयान काय करावा. सेवकाचा प्रतिपाल साहेब करीतच आहेत, परंतु पुस्तदरपुस्त इनाम खाऊन साहेबाचे हकात दुवा मागत जातील हे आर्जदास्त."[२१]

पण प्रकरण येवढ्यावरच संपले नव्हते. कोल्हापूरकरांचा एक जासूद निरोप घेऊन आला की महाराजांच्या मनात बाळाजीला काही इनाम जमिनी द्यावयाच्या आहेत. कंपनीच्या नोकराने भारतीय राजाकडून देणगी घेणे नियमबाह्य होते. बाळाजी ग्रँटला विनंती करतो की आपण एल्फिन्स्टनला पत्र लिहून अशातऱ्हेची देणगी स्वीकरणे योग्य की अयोग्य याचा खुलासा करून घ्यावा. तो पुढे म्हणतो की, एल्फिन्स्टनसाहेबांचा निर्णय योग्यच असेल आणि आपण तो बिनतक्रार मानू. यावर ग्रँटचे म्हणणे असे पडले की एल्फिन्स्टनसाहेब जेव्हा येथे येईल तेव्हा त्याच्याशी याबाबतीत चर्चा करावी, आणि त्या कोल्हापूरकरांच्या जासूदाला सांगावे की प्रस्तुत संदर्भात आपणास वरिष्ठ अधिकाऱ्यांची परवानगी घ्यावी लागेल. पण बाळाजीचे म्हणणे असे की या गोष्टी दुसऱ्या कोणी एल्फिन्स्टनच्या कानावर घालण्यापूर्वी आपणच पुढाकार घ्यावा. या इनामाचे स्वरूप काय आहे याची प्रथम त्याला काही कल्पना नव्हती असे तो म्हणतो. पण पुढे त्याला समजले की कोल्हापूरकरांकडून त्याला दोन खेडी इनाम मिळावयाची होती (९–१०–१८). शेवटी हे प्रकरण एल्फिन्स्टनकडे गेले आणि त्याला या गावांचा स्वीकार करण्याची परवानगी मिळाली.

एल्फिन्स्टनचे बाळाजीबद्दल मत चांगले असले तरी ग्रँटच्या शब्दाबाहेर जाऊन तो त्याला विशेष महत्त्व देत नसे. बाळाजी पूर्वी खंडेराव

---

२०. बॉलहॅचेट पृ. ९४.

as it is the first reward yet made to any of our immediate dependants, and as the zeal with which we are served must depend on those rewards. 5.9.1818

२१. पे. द. ४१ : २४३ (२७–९–१८१८).

रास्त्यांच्याकडे नोकरीला होता, आणि त्यांच्या इस्टेटीची देखभाल करण्याच्या निमित्ताने त्याला वारंवार रेसिडेन्सीत जावे लागे. रास्त्यांचे आपल्यावर फार मोठे ऋण आहे, तेव्हा त्यांचा मुलगा विश्वासराव याच्यासाठी पुण्यास जाऊन एल्फिन्स्टनकडे आपण काही रदबदली करावी असे त्याला वाटत होते. तसे न केल्यास सारे जग आपल्याला हसेल असे तो म्हणे. पण या कामासाठी त्याला रजा देण्यास ग्रँट उत्सुक नव्हता. एल्फिन्स्टन जेव्हा साताऱ्यात येईल तेव्हा त्याच्याशी या बाबतीत चर्चा करता येईल, इथली कामे टाकून तेथे जाऊन एल्फिन्स्टनचा निष्कारण वेळ घेणे त्याला श्रेयस्कर वाटत नव्हते. शिवाय या बाबतीत योग्य तो निर्णय एल्फिन्स्टन घेईलच, रदबदली करण्याची काही आवश्यकता नाही असे त्याचे मत होते. तो एल्फिन्स्टनला या साऱ्या गोष्टीचा खुलासा करतो आणि पुढे म्हणतो, "मी त्याला पुण्यास जाऊ देणार नाही. पण तुझी इच्छा असेल तर मला परवानगी द्यावी लागेल. अर्थात माझा विरोध त्याच्या लक्षात आला आहे." (जानेवारी १८१९)

या पत्रास ग्रँटला हवा होता तसाच प्रतिसाद एल्फिन्स्टनकडून मिळाला. "बाळाजीने विश्वासरावाच्या अथवा अन्य कोणत्याही कामासाठी पुण्यास यावे असे मला वाटत नाही. अर्थात हे तू त्याला सांगू नकोस. विश्वासरावला पेन्शन मिळेल, पण सारी इस्टेट परत करणे आपल्या नियमात बसणार नाही. त्याच्या एकट्यापुरता आपल्याला निर्णय घेता येणार नाही. कारण त्याच्यापेक्षा अधिक योग्य अशा कितीतरी लोकांची प्रकरणे आपल्याकडे आहेत. दुसरे असे की खंडेराव रास्त्यांचे आपण काय देणे लागतो याचा आम्ही विचार करावयाचा आहे, बाळाजीपंताने नाही हे तू त्याला सांग."[२२]

एल्फिन्स्टनच्या या पत्रामुळे ग्रँटला बरेच धैर्य प्राप्त झाले असावे, त्याचा आत्मविश्वास वाढला असावा. बाळाजीपंताची आकलनशक्ती चांगली असली तरी एखाद्या व्यक्तीविषयी चटकन ग्रह बनविण्याची त्याची पद्धत ग्रँटला रुचत नसावी (२८–४–१९). त्याच्याविषयी–विशेषतः त्याच्या प्रामाणिकपणाविषयी त्याला संशय येऊ लागला आणि एक दिवस तर त्याच्या विश्वासाला तडा गेला. बाळाजीने एका प्रकरणात लाच घेतली आहे असा संशय घेणे त्याला भाग पडल्यामुळे तो अत्यंत व्यथित झाला. बाळाजीला त्याने आपल्या मनातील शंका

२२. २७–१–१९.

बोलून दाखविली. सदाशिव जोशी या कारकुनाच्या मध्यस्थीने बापू आपटे नावाच्या एका इसमाकडून अमात्यांच्या काही कामासंबंधी बाळाजीने लाच घेतली अशी बातमी ग्रँटच्या कानावर आल्यामुळे त्याच्याकडून या बाबतीत खुलासा करून घ्यावा असे त्याने ठरविले. तसे न करता एकदम काही ग्रह करून घेतला असता तर तो स्वत: दोषी ठरला असता. बाळाजीवर अद्याप त्याचा विश्वास होता. सत्य कळले असते म्हणजे सारी चौकशी त्याने रद्द केली असती. या बातमीची त्याला फार वाच्यता करावयाची नव्हती. बाळाजीने लाच घेतली होती याबद्दल आता शंका नव्हती, पण त्याची सुटका कशी करावयाची हाच एक मोठा प्रश्न होता. इनामाची देखभाल करण्याची सबब सांगून त्याला मोठ्या गौरवाने सेवानिवृत्त करावयाचे आणि प्रस्तुत प्रकरण मुळीच वाढवावयाचे नाही असा त्याचा बेत होता. बाळाजीने कंपनी सरकारची इमानेइतबारे केलेली सेवाचाकरी लक्षात घेऊन एवढी दया त्याच्यावर दाखविणे आवश्यक होते. या सवलतीचा फायदा त्याने घ्यावा असेही त्याला सुचविण्यात आले होते. या साऱ्या प्रसंगाचे विस्तृत निवेदन ग्रँटने एल्फिन्स्टनच्या पत्रात केले आहे. तो म्हणतो, "तो जेव्हा समोर आला तेव्हा त्याचा चेहरा अपराधी माणसासारखा मुळीच दिसला नाही. माझे म्हणणे शांतपणे ऐकून घेऊन तो म्हणाला, 'याची मला पूर्ण कल्पना होती.' त्याने अगदी मोकळेपणाने मला सांगितले की प्रस्तुत प्रकरणात मी मनाचा फार मोठेपणा दाखविला होता आणि त्याच्या अपेक्षेपेक्षा जास्त चांगला वागलो होतो. अशा प्रकारच्या एखाद्या भानगडीत येथील लोक आपल्याला गोवतील याची आपणास पूर्ण कल्पना होती, आणि हे आपण पूर्वीच सांगितले होते असे ही तो म्हणाला. सदाशिव जोशीने बापू आपटेकडून आपले नाव सांगून ३००० रुपये घेतले होते हे खरे आहे, पण जेव्हा तो हे पैसे घेऊन आपल्याकडे आला तेव्हा आपण त्याला म्हणालो की, "या पैशाला मी हात लावला तर गोमांस भक्षण केल्याचे पातक माझ्या हातून घडेल, तेव्हा हे पैसे तू परत घेऊन जा." असे त्याने सांगितले.



यावर माझे म्हणणे असे की, हा सारा व्यवहार तू माझ्यापासून का लपवून ठेवलास. हे माझ्या कानावर घालणे तुझे कर्तव्य होते. बापू आपट्याने कोणती कारणे सांगून तुला लाच घेण्यास प्रवृत्त केले ते मला कळायला हवे होते. शिवाय बापू आपट्याविषयी तुला सहानुभूती आहे असा मला संशय आहे याची तुला कल्पना असल्यामुळे तरी ही गोष्ट तू माझ्यापासून लपवून ठेवावयास नको होती.



कॅप्टन जेम्स ग्रँट याचे सातारा येथील निवासस्थान

यावर बाळाजी म्हणाला, " ही गोष्ट तुमच्या कानावर घालण्याचा विचार अनेक वेळा माझ्या मनात आला. पण तसे केल्यास त्याचे परिणाम काय होतील याची कल्पना असल्यामुळे मी ते धाडस केले नाही. तुम्ही सदाशिव जोश्याला पकडून, त्याच्यावर बंदुका रोखून त्याची शहरातून धिंड काढली असती, आणि आपण त्याला कायमचे गमावून बसलो असतो. ज्या कामावर त्याची नेमणूक केली होती तसले काम करण्यास लायक माणसे मिळण्याची शक्यता फार कमी आहे.

त्यावर मी म्हणालो की, अशी माणसे कोठेही आणि सर्वत्र मिळाली असती आणि आता तू सुचविले आहेस की मी सदाशिवपंताची बंदुका रोखून धिंड काढली असती— आता तो निश्चित बंदोबस्तात जेलमध्ये जाईल आणि आज रात्री तेथेच झोपेल.

"साहेब की मर्जी" असे म्हणून बाळाजी स्तब्ध झाला. मी म्हणालो, " बाळाजी, या माणसाला आणखी काय करावे असे तुला वाटते ते मला ताबडतोब सांगितले नाहीस आणि एकदा का चौकशी सुरू झाली म्हणजे तुझे काही ऐकून घेतले जाणार नाही.

मी त्याला वारंवार विचारले, "तू माझा असा विश्वासघात का केलास ? तुला वश करून घेण्याचे जे प्रयत्न चालले होते त्याची मला कल्पना का दिली नाहीस ? मी तुझ्यावर अकारण असा कोणत्या बाबतीत रागावलो आहे का ? "

यावर तो म्हणाला, "नाही. मी तुम्हांला ही गोष्ट सांगायला हवी होती, पण तुम्ही सदाशिवपंतावर फार संतापला असता आणि त्यामुळे आपण अत्यंत उपयुक्त अशा माणसाला मुकलो असतो."

मी म्हणालो, "कोणताही माणूस गेल्याने जी अडचण निर्माण झाली असती तिचा विचार करून लाचलुचपतीच्या व्यवहाराकडे दुर्लक्ष करण्यास मी कदापिही धजणार नाही."

बाळाजीशी येवढे बोलणे झाल्यानंतर आपला दुसरा सहकारी बारनेट यास बोलावून त्याने ही घटना सांगितली. चिंतोपंत लिखिते आणि वामनराव केळकर या सातार्‍याच्या दोन ब्राह्मणांनी बातमी दिली होती की बापू आपटचाने सदाशिव जोश्यामार्फत एका बड्या माणसाला मोठी लाच दिली आहे. ग्रँटने ही बातमी पुण्याचा कलेक्टर रॉबर्टसन याच्या

कानावरही घालून ठेवली होती. सदाशिवपंताने कबुलीजबाब दिला की बापू आपटयाकडून आपणाला बऱ्याच रकमा मिळाल्या आहेत. अर्थात यात बाळाजीचा काही संबंध नाही असे त्याने स्पष्ट केले होते. सदाशिव जोश्याला त्या रात्री तुरुंगाची हवा दाखविण्यात आली. सर्व चौकशी केल्यानंतर बाळाजीपंताला लाचलुचपतीच्या प्रकरणात प्रत्यक्ष भाग घेतल्याच्या आरोपातून मुक्त करण्यात आले. परंतु या प्रकरणी बाळाजीची ग्रँटकडून मानखंडना झाली होती. त्याचे सांत्वन करण्याचा त्याने फारसा प्रयत्न केला नाही. उलट ज्या माणसांनी त्याला लाच देऊ केली होती त्याची सर्व माहिती पुरविण्यास सांगितले, आणि त्याप्रमाणे त्याने ती दिली. लाचलुचपतीपासून लोकांना परावृत्त करण्यासाठी जाहीरनामा काढूनही लोक असे कसे वागतात याचे त्याला नवल वाटत होते आणि विशेष म्हणजे याबाबतीत उघडपणे तक्रार न करण्याचे जे धैर्य त्याने दाखविले होते त्याचे ग्रँटला आश्चर्य वाटले. साहेबाचा राग होईल हे त्याचे जुनेच पालुपद होते. ग्रँट त्याला म्हणतो, "माझा राग कोणावर तरी काढण्याची तू मला संधी दिली असतीस तर तुझ्या अब्रूवर घाला घालण्याचा असा प्रसंग घडला नसता."

कसलाही आडपडदा न ठेवता, आणि स्वतःला देखील न वगळता ग्रँटने घडली तशी सारी घटना एल्फिन्स्टनकडे निवेदन केली. तो म्हणतो, "कदाचित या प्रकरणात मला अधिक उदात्त भूमिका घेता आली असती; मी तसा वागलो नाही. पण मला जे योग्य वाटले तेच मी केले आहे, आणि त्याचा परिणामही चांगला झाला आहे." बाळाजीपंताला त्याने समज दिली की, ज्या लोकांना त्याने राज्यकारभारात आणले होते, त्या सर्वांची पापे त्याच्या माथ्यावर मारली जातील; त्यांच्या गैरवर्तणुकीची माहिती देण्याचा आदेश त्याने त्याला दिला होता. त्याप्रमाणे घडत होते. सदाशिवपंतावर फार पूर्वीपासून त्याचा राग होता. त्याला पुण्यास पाठवून त्याची कसून चौकशी करून घ्यावी असा त्याचा विचार होता. ग्रँटची अशी समजूत होती की बाळाजीसंबंधीची बातमी ग्रँटच्या कानावर पोचावी अशी तरतूद कदाचित बापू आपटयानेच केली असावी. बापू आपटे आणि सदाशिव जोशी हे दोघेही पक्के खलपुरुष आहेत याची जाणीव त्याला होती. ( १० मे, १८१९ )

बाळाजीला वाटत होते की एल्फिन्स्टनला जाऊन भेटावे आणि आपली बाजू मांडावी. पण त्यासाठी ग्रँटची परवानगी हवी होती. ती मिळणे कठीण होती. 'पुढे केव्हातरी परवानगी देईन' असे आश्वासन

त्याने दिले, आणि त्याच बरोबर एल्फिन्स्टनलाही विचारले होते की बाळाजीशी विचारविनिमय केला पाहिजे असे तुम्हाला वाटत असेल तर मी त्याला पाठवीन. अर्थात त्याचे काय उत्तर येणार याची त्याला पूर्ण कल्पना होती.[२३] (१०–८–१९)

राजा, त्याचे सहकारी आणि खुद्द ग्रँटसाहेब यांचा आपण विश्वास गमावला आहे याची त्याला खात्री पटली असावी. कारण एके दिवशी अगदी त्रासलेल्या अवस्थेत तो ग्रँटकडे गेला आणि म्हणाला, " मी आता साताऱ्यात फार दिवस राहू इच्छित नाही. राजाचे तोंडदेखील पाहण्याची माझी इच्छा नाही. कारण त्याने अनेक प्रतिष्ठितांना बाळाजीपंत लाच घेतो असे आपणास ग्रँट साहेबाने सांगितले आहे आणि भाऊ माणकेश्वराप्रमाणे सर्व कारभार तो आपल्याकडे घेऊ पाहात होता, पण आता आपण राजा आहोत आणि म्हणून त्याला पायबंद घालण्याची खबरदारी घेतली पाहिजे, असे सांगण्यास सुरवात केली आहे. तेव्हा साताऱ्याच्या नोकरीतून मला मुक्त करावे. कंपनी सरकार इतरत्र देईल ते काम आपण करण्यास तयार आहोत. ". तशा आशयाचा एक अर्जही त्याने ग्रँटला सादर केला.

ग्रँटने आपली बाजू स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. राजाला आपण तसे काही बोललो नाही, सदाशिवपंताचे प्रकरण निघाले तेव्हा राजा आणि इतर लोक उघडपणे साऱ्या गोष्टी बोलत असत. तसेच त्याने हेही स्पष्ट केले की आपल्या हाताखाली काम करणाऱ्या माणसाविरुद्ध जर काही तोहमत आली तर आपण त्याची शाहनिशा करण्याची संधी कदापि गमावणार नाही.

बाळाजीची इच्छा त्याचा अर्ज एल्फिन्स्टनकडे पाठवावा. अर्थात ग्रँट तो पाठविणारच होता, पण यामागे त्याचे हेतू काय होते याची त्याला कल्पना येत नव्हती. कदाचित आपली गेलेली सत्ता परत प्रस्थापित करण्याचा त्याचा हा शेवटचा प्रयत्न असेल. ग्रँट म्हणतो, ' तो समजूतदार, हुषार आणि माझ्या समजुतीप्रमाणे प्रामाणिक नोकर आहे. त्याची अनुपस्थिती मला निश्चितपणे जाणवेल. तरी देखील राजाची सत्ता मी त्याला आपल्या हाती घेऊ देणार नाही. ती राजाकडेच राहील याची मी काळजी घेईन. मी माझे म्हणणे सोडले, आणि त्याचे

---

२३. प्रस्तुत विस्तृत पत्र ग्रँटने मेच्या १० तारखेस एल्फिन्स्टनला लिहिले होते.

ऐकले तर आपले म्हणणे खरे करण्याची त्याला संधी मिळेल. तसे झाल्यास त्याच्याशी माझे खटके तरी उडतील किंवा कचेरीच्या कामात त्याचा हस्तक्षेप मला सहन करावा लागेल"[२४]

या सर्व गोष्टी कशा निस्तारावयाच्या, बाळाजीला येथून मानसन्मानपूर्वक कसे जाऊ द्यावयाचे याची ग्रॅंटला काळजी लागली होती. एल्फिन्स्टनला त्रास देऊ नये असे वाटत असले तरी त्याच्या दृष्टीने प्रसंग मोठा बाका होता आणि त्याच्या सल्ल्याची त्याला अत्यंत गरज भासत होती.

बाळाजीपंताने आपल्या अर्जाच्या बाबतीत खुलासा केला की आपल्याला येथे अथवा अन्यत्र काही नोकरी हवी आहे असा गैरसमज करून घेऊ नये. पण कंपनीला त्याची गरज लागल्यास मोठ्या आनंदाने तो कोठेही जाण्यास तयार होता, आणि त्यासाठी आपल्याला पगाराचीही काही अपेक्षा नाही असे त्याने स्पष्ट केले होते.

बाळाजीपंताच्या या साऱ्या प्रकरणाचा ग्रॅंट रात्रंदिवस विचार करीत होता. २२ ऑक्टोबर, १८१९ रोजी लिहावयास घेतलेले पत्र अद्याप पुरे झाले नव्हते. बारनेट आणि बाळाजी यांना त्याने बोलावणे पाठविले. आपण एल्फिन्स्टनला अद्याप पत्र पाठविले नाही, अर्ज धाडला नाही याचे कारण त्याचे निर्णयात्मक उत्तर लगेच आले असते आणि नंतर आपल्याला काही करता आले नसते, असा खुलासा त्याने केला.

ग्रॅंटला वाटत होते बाळाजीपंताचे मन दुखविण्यासारखी कारणे खरोखरीच घडली असतील, त्याचे सांत्वन करणे अशक्य असेल आणि राजाचे तोंड पाहावयाचे नाही हा त्याचा—योग्य अथवा अयोग्य—निर्धार पक्का असेल तर साताऱ्यात त्याला ठेवण्यात काही अर्थ नव्हता. सातारा तो जितक्या लौकर सोडील तितके योग्य ठरले असते. राजाने त्याच्यासंबंधी काही अप्रस्तुत उद्गार काढले असतील तर त्याची पुनरावृत्ती होणार नाही यासाठी आपण प्रयत्न करू, असे आश्वासन त्याने बाळाजीला दिले होते.

बाळाजीपंताने सातारा सामोपचाराने सोडावे, त्याच्या गुणाबद्दल आणि कामाबद्दल कृतज्ञता व्यक्त केली जावी, त्याच्यासाठी आणखी काही करणे आवश्यक असल्यास ते करावे अशी ग्रॅंटची इच्छा होती. बाळाजी ग्रॅंटचा नोकर म्हणून राहण्यास तयार होता, पण त्याला राजाशी काही

२४. कित्ता.

संबंध नको होता. ग्रँटचे म्हणणे असे की, राजाचे तोंड कदापि पाहणार नाही अशी घोषणा न करता त्याने केवळ आपल्याकडे राहावे, आणि सर्व कारभारावर देखरेख करावी, राजाच्या नोकरांची नेमणूक करण्याच्या भानगडीत पडू नये, फक्त राजाने नेमलेला माणूस कसा आहे, आणि एखादी घटना अयोग्य झाली असेल तर त्याची माहिती देण्याचे काम करावे. येथे त्याची खरी परीक्षा होती. राजाचे अधिकार टाकून तो साधा कारकून बनावयास तयार नव्हता. ग्रँटचे बोलणे त्याला रुचले नाही. त्याच्या भावनेचा वेग अनावर झाला, तो थरथर कापू लागला, आणि संतापून म्हणाला, "या कामासाठी आपण एखादा कारकून पाहा आणि आपल्याला काशीला जाण्याची परवानगी द्या."

"ठीक आहे" असे म्हणून ग्रँटने पत्रलेखनास प्रारंभ केला. हे सारे संभाषण बारनेटच्या साक्षीने चालले होते. ग्रँटने ही योजना मुद्दामच केली होती. काही वेळ स्तब्धता होती. बाळाजीने शांततेचा भंग केला आणि म्हणाला, "एका अटीवर मी राहावयास तयार आहे. राजाने तुम्हाला सांगावे की मी फार मोठी रक्कम घेतली आहे, आणि याबाबतीत तुमची खात्री पटली अथवा संशय आला तर ताबडतोब तुम्ही मला जाण्याची परवानगी द्यावी."

ग्रँटने बाळाजीला निक्षून सांगितले की असे होणे शक्य नाही. इतक्या वाईट तऱ्हेने आपण राजाला वागविणार नाही. याबाबतीत आपल्याला सारी चौकशी करून गुन्हा शाबीत करावा लागेल. अन्यथा राजाच्या कोठीवाल्याची 'रुजवात' काढण्याचा तुम्ही प्रयत्न कराल याची आपल्याला कल्पना आहे. तो म्हणाला, "बाळाजीपंत, तू मला पूर्ण ओळखतोस. तसेच तू जे म्हणालास त्याच्या मागे तुझे काय हेतू आहेत याचीही तुला पूर्ण कल्पना आहे. तुला मी नेहमी माझा मित्र मानीत आलो आहे, नोकर नाही. आता यावर तुझे म्हणणे काय आहे ते सांग. मी घातलेल्या अटी मान्य करून तुला येथे राहावयाचे आहे की जायचे आहे?"

"माझी जाण्याची इच्छा आहे" बाळाजीने उत्तर दिले. तो अक्षरशः रडू लागला. "माझा दरमहाचा ३०० रु. पगार (५०० रु.?) हा मला मोलाचा आहे, परंतु त्यापेक्षाही मला माझे चारित्र्य महत्त्वाचे वाटते." असे तो म्हणाला.

यावर ग्रँट म्हणाला, "मग येथे राहा आणि दोन्ही गोष्टी साधून घे. तुला जेवढे काम करावयाचे तेवढे कर, पण माझ्या आदेशांचे पालन

कर. तुला रजा हवी असेल आणि ती देणे योग्य आहे असे मला वाटले तर मी तुला देईन. तुला सेवानिवृत्त होण्याची संधी मिळेल, पगार मिळेल." पण ग्रँट जसा राहण्याविषयी अधिक आग्रह करू लागला तसा त्याचा जाण्याचा निश्चय पक्का होऊ लागला.

ग्रँटने राजाला विचारले की या बाबतीत तो काही बोलला होता का? पण त्याने शपथेवर आपण काही न बोलल्याचे सांगितले. राजाचे हे उत्तर बाळाजीपंताला कळविण्यात आले, आणि राजाबद्दल जे काही म्हणावयाचे आहे ते संपूर्ण पुराव्यानिशी मांडण्याविषयी सांगितले. यावर त्याची काही गरज नाही असे तो गयावया करून म्हणू लागला. हे दोन्ही बाजूंना हितावह ठरणार नाही, तेव्हा या प्रकरणाचा आपल्याला हवा तसा निकाल लावावा असे त्याचे म्हणणे पडले. शिवाय ग्रँटने इच्छा व्यक्त केली असती तर तो राहण्यास तयार होता.

दुसऱ्या दिवशी म्हणजे २४ तारखेस बाळाजी सकाळी परत आला आणि कालचाच विषय पुढे सुरू झाला. ग्रँटने त्याला एकच प्रश्न विचारला, "माझा आदेश बिनतक्रार पाळून तूं येथे राहावयास तयार आहेस, का तुझी साताऱ्यातून बदली करण्याविषयी मी एल्फिन्स्टनला पत्र लिहावे? तुझे विचार काय आहेत हे मी समजू शकत नाही, पण या प्रकरणाचा मला निकाल लावला पाहिजे."

"मी येथे राहू शकत नाही." तो म्हणाला, "मी मुंबईला जाऊन एल्फिन्स्टन साहेबांना भेटेन आणि नंतर काशीला जाईन."

कंपनी सरकारच्या पाठिंब्याखेरीज बाळाजीला कसलाही अधिकार गाजविता येणार नाही याची ग्रँटला कल्पना असल्यामुळे त्याला 'पानसुपारी' देण्याचा निर्णय त्याने घेतला. २२ ऑक्टोबरला सुरू केलेले पत्रलेखन २४ तारखेला एकदाचे संपले. तीन महत्त्वाचे दिवस यात खर्ची पडले होते. ग्रँट म्हणतो, "त्याला अधिक सवलत न देता मी साऱ्या गोष्टी थोडक्यात आवरावयाला हव्या होत्या. अर्थात तो एक मोठा माणूस आहे, त्याच्याकडे आपण दुर्लक्ष करू शकत नाही. तुमचे उत्तर आल्यानंतर मोठ्या सन्मानाने मी त्याला 'रुखसत' देईन. (२४-१०-१८१९)

सातारा सोडण्याचा दिवस मुक्रर झाला. त्याचा योग्य सन्मान झाला पाहिजे याबाबत ग्रँटचा कटाक्ष होता. बाळाजीच्या जाण्याने आपण एका लायक आणि प्रामाणिक सल्लागाराला मुकणार आहोत याची ग्रँटला कल्पना होती. ४ नोव्हेंबर, १८१९ हा निरोपाचा दिवस ठरला.

सातार्‍यातील पहिली दीड वर्षाची त्याची कारकीर्द अत्यंत मोलाची होती. एल्फिन्स्टनच्या हुकुमाप्रमाणे त्याला सातार्‍याहून कायमची रजा देण्यात आली. बाळाजीने विचारले आपण जर काही निमित्ताने सातार्‍यास आलो तर व्यक्तिश: ग्रँटसाहेबांचा काही विरोध राहील का ? ग्रँट म्हणाला, "अर्थात मुळीच नाही. पण 'कायमची रजा' हा शब्दप्रयोग वापरण्याचे कारण तुझे अप्रयोजक उद्‌गार—'राजाचे तोंड पाहणार नाही." यावर तो आर्जवी स्वरात म्हणाला, "एल्फिन्स्टन साहेबांना आवर्जून लिहा की त्यानंतर मी राजाकडे गेलो होतो. राजा माझ्याशी बोलला नाही. यावरून भावनेच्या भरात मी जे काही बोललो ते राजा अद्याप विसरला नाही." एल्फिन्स्टला तसे कळविण्याचे ग्रँटने कबूल केले.

बाळाजीपंताने देखील एल्फिन्स्टनला स्वतंत्रपणे पत्र लिहून सातारा सोडण्याचा आपला मनोदय कळविला होता. "बाळाजीपंतानी आग्रहानी बडे साहेबाची चालाखी आपल्यास मुंबईस येण्याविषयी आणविली ती येऊन ग्रांट साहेबास दाखऊन त्याची बोलणी जाली नंतर दोन तीन घटिकापर्यंत येविसी बोलणे होऊन माघारे आपल्या वाड्यांत गेले बालाजीपंताचा जाण्याचा निश्चय ठरला."[२५] ४ नोव्हेंबरास बाळाजीला निरोप देण्यात आला.

राजा आणि माईसाहेब या दोघांना बाळाजी जाणार हे ऐकून अत्यानंद झाला होता. माईसाहेबांनी तर त्याला बोलावून घेऊन हळहळ व्यक्त केली. बाळाजीने मोठ्या खुषीने सातारा शहर सोडले आणि झाले ते सारे ठीकच झाले असे ग्रँटला वाटले (१२–११–१९). सातार्‍याच्या रोजनाम्यात प्रस्तुत संदर्भात अशी नोंद आढळते,[२६] "ग्रांट याचे वाड्यात बलवंतराव चिटणीस गेले बालाजीराव नातु बहुत उदासपणे निघोन जाण्याची तयारी व सर्वत्रासी बोलणे मी जाणार चिटणीस फडणीसाकडे व माहाराज साहेबाकडे जात जावे कामे बोलोन घ्यावी येसे नाना प्रकारी बोलणी नंतर अस्तमानी विठलपंत यासी बालाजीपंतानी येकीकडे काढून बहुत प्रकारे बोलले त्यातील हासील माहराजाकडे राज्य जाले मोहर चालु जाली तुम्ही दिवाण जाला आता आम्ही कासीस जाणार हे सर्व डोल्यानीच पाहावे हा मानस तो पूर्ण जाले वगैरे...बोलणे अनंत जाले साहेबावर विश्वास असावे."

२५. डे. कॉ. रु. ५५ फा. २ : १३ ता. २६–१०–१८१९.

२६. कित्ता ११ ता. २४–१०–१८१९.

# ५

# सत्तांतर

१८१८ साली मराठी राज्य संपुष्टात आले असले तरी याच साली एका नव्या मराठी राज्याची निर्मितीही झाली होती. ‘ साताऱ्याचे राज्य ’ हे एल्फिन्स्टनच्या अतुल मुत्सद्देगिरीतून उदयाला आलेले आहे. पेशव्यांच्या जोखडातून छत्रपतीला-प्रतापसिंहाला सोडवून साताऱ्याच्या सिंहासनावर त्याची प्रतिष्ठापना केली. आणि असे करीत असताना साताऱ्याचे राज्य हे नवे राज्य असून पूर्वीच्या शिवछत्रपतींच्या राज्याशी त्याचा सुतराम संबंध नाही, याची प्रतापसिंहाला समज दिली होती. थोडक्यात छत्रपतीचा ‘ राजा ’ आणि सिंहासनाची ‘ गादी ’ असे नूतनीकरण एल्फिन्स्टनने घडविले होते. तसेच या नवीन राजाचे सार्वभौमत्व मर्यादित असून ते ब्रिटिशांच्या पंखाखालीच राहील याची कल्पना राजाला दिली होती. याच्या मागची नीती अशी होती की, मराठ्यांची सहानुभूती संपादन करून ही नवीन राजवट येथे रुजू करावयाची आणि पेशव्यांच्या उरल्यासुरल्या सत्तेला शह द्यावयाचा. या राजनीतीची कार्यवाही करण्याची जबाबदारी एल्फिन्स्टनवर टाकली आणि त्याने साताऱ्याचे राज्य स्थापून त्या धोरणाच्या अंमलबजावणीस प्रारंभ केला.[१]

एल्फिन्स्टन साहेबाकडून आपल्याला पेशव्यांचा सर्व मुलूख मिळेल ही प्रतापसिंहाची आशा थोड्याच दिवसात फोल ठरली. ग्रँट आणि बाळाजी या दोघांनी ही मर्यादित राज्याची कल्पना त्याच्या गळी उतरविली, आणि या राज्याच्या चतु:सीमा पक्क्या झाल्या. पश्चिमेस घाट, उत्तरेस नीरा, पूर्वेस निजामाची सरहद्द आणि दक्षिणेस कृष्णा आणि वारणा या नद्या अशी या राज्याची मर्यादा होती. या राज्याचे उत्पन्न १८२१ साली १५ लक्षाहून थोडेसे कमी होते. पण पुढील वीस वर्षांची सरासरी काढल्यास १५ लक्षांची मर्यादा त्या राज्याने गाठली होती असे दिसत नाही.

साताऱ्याचे राज्य हे चौदा पेटयांचे संस्थान म्हणून ओळखले जात होते. यात नीरथडी ( पुणे प्रांत ) आणि शिरवळ, वाई, रोहिडखोरे तर्फ,

---

१. बॉलहृचेट पृ. १९–२०; प्रिन्सेपस् ट्रॅन्झॅक्शन्स पृ. ३२६–७.

जावळीसुभा, कऱ्हाड, दक्षिण कोकण, खटाव प्रांत, माणदेश, फलटण परगणा, विजापूर प्रांत, प्रांत मिरज, प्रांत पन्हाळा, प्रांत रायबाग आणि प्रांत कागल हे ते चौदा पेटे होते. याखेरीज हुक्केरी प्रांतातील ३ खेडी होती. वर नोंदविलेल्या भागातील सर्व गावे सातारकरांकडे नव्हती. याशिवाय राजाकडे खालील ६ जहागीरदार देण्यात आले. पंतप्रतिनिधी, औंधकर; पंतसचिव, भोरकर; अक्कलकोटकर राजे भोसले, फलटणकर निंबाळकर, जतकर डफळे, पसरणी (वाईचे) चे नवाब शेखमिरे.[२]

प्रतापसिंहाला गादीवर १८१८ च्या एप्रिलमध्ये बसविले होते तरी कंपनी सरकारशी तह होण्यास १८१९ चा सप्टेंबर महिना उजाडला.

शेवटी २५ सप्टेंबर १८१९ रोजी तहनाम्यावर सह्या झाल्या. कंपनी सरकारतर्फे ग्रँट आणि राजातर्फे त्याचा मुखत्यार विठ्ठल बल्लाळ फडणीस यांच्या तहनाम्यावर सह्या झाल्या. यात एकूण ११ कलमे असून कंपनी सरकार आणि सातारा यांचे संबंध स्पष्ट करण्यात आले आहेत. यात निश्चितपणे असे नमूद करण्यात आले होते की, " सरकार इंग्रेज बाहादूर यांचे सरकारातून जे राज्य देत आहे ते घेऊन सरकार इंग्रेज बाहादूर याचे कह्यात व मदतीत निरंतर संतोषाने राहून सरकार इंग्रेज बाहादूर यांचे सलामसलतीने हरयेक काम करीत जावू."

रेसिडेंटच्या सल्ल्याशिवाय लष्कर ठेवणे, जहागीरदाराशी पत्रव्यवहार करणे, त्यांच्या गाठीभेटी घेणे, या गोष्टी राजाला करता येत नसत. तसेच सर्वाधिकार राजाला एकदम देण्यात येणार नव्हते. " आद्याप मुलकाचा बंदोबस्त चांगला झाला नाही व पूर्ती चौकशी होणे आहे व मेहनत करून मुलकाची आबादी जाहाली पाहिजे, याजकरिता काही दिवस मुलकाची वहिवाट महाराज यांचे नांवाने व महाराज यांचे मसलतीने सरकार इंग्रेज बाहादूर याजकडील सरकार जे महाराज याजजवळ राहतील ते करतील व मुलकाचा बंदोबस्त ठेवितील."[३]

यावरून राजाच्या हवाली सर्व सूत्रे आज ना उद्या करावयाची हे निश्चित ठरले होते हे दिसते. हा करार होण्यापूर्वीच ग्रँटने एल्फिन्स्टनला लिहिले होते, " राजाला शक्य तितक्या लौकर मला स्वतंत्र करावयाचे

---

२. Basu B. D., Story of Satara, Calcutta, 1922 pp 36–43.

३. राणे र. गो , सातारचे छत्रपती प्रतापसिंह महाराज, सातारा, १९२९. पृ. १११–११३.

आहे. त्यासाठी माझ्या वेळेचा मी जास्तीत जास्त उपयोग करून घेतो आहे. माझी प्रकृती ढासळत चालली. हवापालट म्हणून या प्रांताबाहेर अथवा युरोपात या वर्ष-दोनवर्षात मला जाणे आवश्यक आहे. माझ्या प्रकृतीचे काही होवो, या वर्ष-दोनवर्षात राजाचा मार्ग मला खुला केला पाहिजे."

१५-५-१९.

'राजाचा मार्ग खुला केला पाहिजे' ही उमेद उराशी बाळगून ग्रँट नेटाने कामाला लागल्यामुळे सत्तांतराचा सुदिन लौकर येऊ शकला. सत्तांतराच्या बाबतीत एल्फिन्स्टनच्या मनातही मुळीच संदेह नव्हता. २ जुलै १८१९ रोजी आपला मित्र जेम्स मॅकिन्टॉशला लिहिलेल्या पत्रात तो म्हणतो, "मला भीती वाटते की आपले भारतीय साम्राज्य हे दीर्घकाल टिकणारे नाही ही समजूत केवळ पूर्वग्रहावर आधारलेली नसून त्यात बराचसा विवेकाचा भाग आहे."[४]

सत्तांतराचा प्रश्न उपस्थित झाला तो १८२० च्या ग्रँटच्या अहवालाच्या संदर्भात.[५] १८२० च्या एप्रिलमध्ये जमीनमहसूल आणि एकंदर सातान्यातील परिस्थिती यासंबंधी कमिशनर चॅपलिन याच्याकडे एक अहवाल सादर केला. चॅपलिनने आपल्या मतासह तो मुंबईसरकारचे सचिव वॉर्डन यांचेकडे पाठविला. तेव्हा साताराप्रकरणी ग्रँट, चॅपलिन आणि वॉर्डन या सर्वांची मते आपल्याला या अहवालात आढळतील. १८१९ पेक्षा १८२० साली उत्पन्नात १ लक्ष ८० हजारांनी वाढ झाली ती जादा करआकारणीच्या मार्गाने झाली नसून त्यासाठी इतर अनेक कारणे होती. या वर्षात पूर्वी अज्ञात असलेल्या उत्पादनाच्या नवीन पद्धतीची माहिती अधिकाऱ्यांना झाली, तसेच प्रारंभीच्या पाहणीत निसटलेल्या बाबींचा उपयोग या वर्षी झाला. तसेच विजापूरकर आणि पटवर्धन यांच्याकडील काही मुलूख सातान्यात समाविष्ट झाला होता. ग्रँटच्या मते येत्या पाच वर्षांच्या काळात सुमारे १ लक्षाची भर सातारा राज्याच्या उत्पन्नात पडेल असे होते.

---

४. कोलब्रुक २ पृ. ७२.
I am afraid the belief that our Indian Empire will not be long lived is reason and not prejudice.

५. पुढील सर्व विवेचन रेकॉर्डस् ऑफिस मुंबई पोलिटिकल डायरी ४८९ (२) पृ. ५३९२-५५२६ मधील २३ ऑ. १८२० च्या नोंदीवर आधारलेले आहे.

उत्पन्नाच्या या आकडयांवरून साताऱ्याची आर्थिक परिस्थिती बरीच सुधारत होती हे जरी मान्य केले, तरी साताऱ्याविषयी काही अंदाज इतक्या जलद करणे सोयीचे नाही, असे चॅपलिनचे मत होते. पूर्वीच्या शिथिल शासनव्यवस्थेत रूढ असलेल्या जमीनमहसुलाच्या मक्तेदारीमुळे ठेकेदारांचा अधिक फायदा होत असे. राज्याच्या तिजोरीत भरणा झालेला पैसा हा प्रत्यक्षात वसूल केलेल्या महसुलाच्या कितीतरी पट कमी असे. तेव्हा पेशवाई राजवटीतील वसुलीचा आकडा हा प्रमाणभूत मानता येणार नाही. शासनव्यवस्था जर अधिक कार्यक्षम असेल तर वसूलात भर पडेल. सातारा राज्यातील बराचसा भाग लागवडीखाली होता. फक्त पूर्वेकडील परगणे ओसाड-पडीक असे होते. साताऱ्याच्या उत्पन्नासंबंधी ग्रँटच्या अपेक्षा अत्यंत माफक असल्या तरी चॅपलिनला वाटत होते की विद्यमान परिस्थितीत हा आकडा ग्रँटच्या अपेक्षेपेक्षा कमी धरला पाहिजे.

राज्याच्या महसुलाच्या चर्चेतून राजाच्या प्रत्यक्ष अधिकाराखाली किती उत्पन्न असावे या विषयाला चॅपलिनने तोंड फोडले. अर्थात उत्पन्नाची वाढ ही कार्यक्षम शासनव्यवस्थेवर अवलंबून राहील. ब्रिटिश रेसिडेंटच्या वर्चस्वाखाली हे उत्पन्न वाढेल असे वाटत नाही. मग राजाच्या अमलाखाली यात सुधारणा होण्याचे दूरच राहिले. तेव्हा आता आपल्यापुढे एकच विचार आहे, आणि तो म्हणजे आहे हे उत्पन्न कसे स्थिर राहील. मराठा राजा अर्धशिक्षित, अननुभवी आणि ज्याला मार्गदर्शन करण्यास समर्थ मंत्री जवळ जवळ नाहीत अशा या परिस्थितीत येथील राजवट थोडयाच काळात अधोगतीप्रत जाण्याची शक्यता फार आहे, असे चॅपलिनला वाटते.

यातूनच दुसरा एक मूलभूत प्रश्न त्याने उपस्थित केला आहे आणि तो म्हणजे सत्तांतराचा. हेंडरसन या गव्हर्नर जनरलच्या सेक्रेटरीने १ मे १८२० रोजी पृच्छा केली होती की राजाच्या कारभारातील कंपनीच्या अधिकाऱ्यांचा हस्तक्षेप केव्हा संपुष्टात येणार आहे. कराराप्रमाणे राजाला स्वातंत्र्य देण्यास कंपनी बांधील होती. अर्थात या करारात मुदतीचे बंधन नसल्यामुळे त्या अटीचा आपण किती फायदा घ्यावयाचा हा प्रमुख मुद्दा होता, आणि त्यानंतर हे सत्तांतर क्रमशः करावयाचे की एकदम करावयाचे. ग्रँट आणि चॅपलिन यांचे याबाबत काही मतभेद होते. तेव्हा प्रथम ग्रँटची बाजू समजावून घेतली पाहिजे.

ग्रँटचे असे निश्चित मत बनले होते की सत्तांतर क्रमशः, टप्प्याटप्प्याने करावे. अशी भूमिका घेण्यात साताऱ्याच्या कामकाजाचा पूर्ण अनुभव त्याच्या मागे होता.

राज्याचा प्रशासक आणि राजाचा शिक्षक अशी दुहेरी कामगिरी ग्रँट बजावीत होता. न्यायदानाच्या कामातून क्रमश: तो आपले अंग काढून घेत होता. कॅ. लिटल आणि कॅप्टन ॲडॅम हे ब्रिटिश अधिकारी या कामी राजाला मदत करीत पण हस्तक्षेप करीत नसत. राजादेखील अदालतीत येताना संपूर्ण तयारी करून येत असे. महिनाभर कचेरीत न जाता काय घडते याचे वृत्त दूर राहून ऐकण्याची ग्रँटची इच्छा होती.

ग्रँट म्हणतो की, आपला राजा गादीवर बसला आहे आणि तो न्यायनिवाडा करतो आहे हे पाहून जनता खूष झाली आहे. तेथे प्रसृत केलेल्या शासनव्यवस्थेमुळे जनतेत असा विश्वास निर्माण झाला होता की आपण वरिष्ठ अधिकाऱ्याकडे दाद मागू शकतो, आणि आपली गाऱ्हाणी सत्वर दूर करून घेऊ शकतो. तसेच न्यायदानप्रसंगी इंग्रज अधिकारी हजर असल्यामुळे न्यायदानात कसूर होत नाही अशीही लोकांची भावना होती. अर्थात इंग्रज अंमलदारांची देखरेख सैल झाली म्हणजे ही यंत्रणा तितकी व्यवस्थित चालणार नाही हे मान्य करूनही असे म्हणावेसे वाटते की, राज्यकारभाराचे अगदीच काही शिक्षण नसते, अथवा न्यायदानाची काहीच पद्धती घालून दिली नसती तर त्यामुळे जे नुकसान झाले असते, ते या परिस्थितीमुळे टळेल, आणि ही योजना अनेकांना हितावह ठरेल असे ग्रँटचे मत होते.

राजाबद्दल ग्रँटला बराच भरवसा होता. राजा लोकप्रिय आहे परंतु त्याचे काही नातलग आणि निकटवर्ती त्याला बिघडवीत आहेत, आणि त्यांचे वर्चस्व जर वाढले तर ते राजाला अत्यंत हानिकारक ठरेल यामुळे अंतर्गत कारभार तर बिघडेलच, पण हे साथीदार राजाला निरनिराळ्या बाहेरच्या भांडणतंट्यात गोवतील आणि त्यात राजाचा विनाश होईल.

अर्थात ग्रँटला या लोकांची भीती वाटत नव्हती. कारण, शासनावर विशेषत: अंतर्गत कारभारावर त्याची इतकी विलक्षण पकड होती की बाहेरून कोणी काही करू म्हटले तरी ते शक्य नव्हते. त्याच्या परवानगी-शिवाय बाहेरच्या माणसाचा प्रवेश राजवाड्यात होत नसे, आणि ग्रँटला रुचणार नाही ते करण्याची राजाची अथवा इतर कोणाची हिंमत नव्हती. त्याच्या मते साताऱ्याच्याबाबतीत उदार धोरण नेहमीच शहाणपणाचे ठरलेले नाही. (What is liberal has not always been found wise.)

राजाकडे सर्व सत्ता एकदम सुपूर्द करावी का या प्रश्नाचा त्याने पूर्णपणे विचार केला होता. एकदम सर्वाधिकार दिल्यास राजावर आणि

जनतेवर एकप्रकारे अन्याय केल्यासारखे होईल असे त्याचे मत होते. एल्फिन्स्टनच्या आदेशानुसार प्रशासन करीत असता ग्रँटला त्याच्या अपेक्षेपेक्षा अधिक त्रास सहन करावा लागला होता. पण तो निराश झाला नाही. राज्यकारभाराचे ज्ञान करून घेण्यात अगदी थोड्या अवधीत राजाने जी वैयक्तिक प्रगती करून दाखविली ती निःसंशय स्पृहणीय आणि अपेक्षातीत आहे असे त्याला वाटे. राजाची आकलनशक्ती, न्यायप्रवृत्ती, आणि घालून दिलेल्या शिस्तीला चिकटून राहण्याचा त्याचा निश्चय हे सद्‌गुण त्याला भोवतालच्या दुष्टप्रवाहापासून सतत दूर ठेवतील असा आत्मविश्वास त्याने प्रकट केला होता.

या सर्व गोष्टींचा साकल्याने विचार करून ग्रँटने सुचविले की, जितक्या कमी काळात हा प्रदेश राजाच्या हवाली करता येईल तितके बरे होईल. दिवाणी न्यायव्यवस्था राजाकडे सोपविली होतीच. दसऱ्यापर्यंत फौजदारी गुन्हे त्याच्याकडे देता येतील असे तो म्हणतो. शिवाय त्यावेळेपर्यंत साताऱ्याचा किल्लाही त्याच्या हवाली करता आला असता. त्याच्या योजनेप्रमाणे १८२१ साली प्रथम महसूलखाते आणि त्यानंतर पोलीसखाते क्रमशः १८२२ पर्यंत त्याच्याकडे जाणार होते. आता फक्त खजिना आणि शिबंदी यासंबंधीचा निर्णय घ्यावयचा होता. याबाबतीत तो म्हणतो की, राजाला दिलेल्या संपूर्ण स्वातंत्र्याचा काय परिणाम होतो याचा अनुभव घेऊन या बाबीवरील कंपनीने आपले अधिकार सोडावेत. (until experience shall have shown what effect total emancipation is likely to produce.)

८ एप्रिल १८१८ रोजी एल्फिन्स्टनकडून मिळालेल्या सूचनांत, "सांप्रत राजेसाहेबाचा सर्व कारभार आपल्या सैन्याची व खजिन्याची व्यवस्था होईतोपर्यंत तुम्ही आपल्या हातात घ्यावा, आणि नंतर हळूहळू त्याला आपल्या राज्याची व्यवस्था करण्यास परवानगी द्यावी" असे म्हटले होते. ग्रँट हा प्रामुख्याने या सूचना डोळ्यांसमोर ठेवून राज्यशकट हाकीत होता.

ग्रँटच्या या अहवालाचा पूर्णपणे विचार करून २५ जून १८२० रोजी आपल्या शिफारशींसह चॅपलिनने तो फ्रॅन्सिस् वॉर्डन या मुंबई सरकारच्या सचिवाकडे धाडला. त्याच्या मते सत्तांतराच्या संदर्भात प्रामुख्याने दोन बाबींचा विचार करावा लागेल. पहिली, कंपनीच्या अधिकाऱ्यांच्या हस्तक्षेपापासून राजाची मुक्तता किती लौकर करावी आणि दुसरी, हे सत्तांतर एकदम करावे की क्रमशः करावे.

राजाच्या भोवती अनिष्ट ग्रहांचे वर्तुळ असल्यामुळे राजाची सत्ता ही थोडी थोडी वाढवीत राहावी या ग्रँटच्या मताशी चॅपलिन सहमत नव्हता. तसेच सत्तांतराचे हे संकट जितके लांबणीवर टाकता येईल तितके बरे, असे त्याचे मत होते. अर्थात असे करीत असताना १८१९ साली राजाशी तहनामा झाला होता त्याच्याशी आपले वर्तन सुसंगत असले पाहिजे. तेव्हा नियंत्रण ठेवले तरी करार अबाधित राहिला पाहिजे कारण तसे केल्याने परस्परांतील मतभेद आणि हितसंबंधाचे संघर्ष आणि सत्तेच्या विभाजनामुळे होणारे नेहमीचे भांडण-तंटे हे सारे टाळता येईल.

या तहातील सत्तांतराचे कलम हे बरेचसे स्थूलमानाचे आणि सामान्य स्वरूपाचे आहे. तेव्हा आणखी वर्ष-दोनवर्षे तरी महत्त्वाचे अधिकार कंपनी सरकारकडे राहावेत, आणि या काळात शासनाचा कोणताही महत्त्वाचा भाग राजाकडे सुपूर्द करू नये. अर्थात ग्रँटचेही म्हणणे तसेच होते. सनदी आणि फौजदारी न्यायदान हे अधिकार प्रारंभी त्याला द्यावेत; त्याने त्यांचा योग्य वापर केल्यास त्याला चांगला अनुभव येईल आणि मग वयाच्या २५ व्या वर्षापर्यंत त्याला राज्यकारभाराच्या कलेत चांगले प्रभुत्व संपादन करता येईल, आणि असे झाले तर आपल्यालाही समाधान वाटेल. पण चॅपलिन पुढे म्हणतो की, राजाचा स्वभाव कितीही चांगला असला आणि तो कितीही समर्थ असला तरी आपणास त्याच्यापासून फारशा अपेक्षा नाहीत. तशा अपेक्षा करणे योग्य ठरणार नाही. राजकारभाराशी अनभिज्ञ, ज्याचे आतापर्यंतचे आयुष्य कैदेत गेले अशा या तरुण मराठ्याकडे जर आपण सत्ता इतक्यात दिली तर त्यापासून त्या तरुण राजकुमारालाच अधिक त्रास होईल. राज्यकारभारावर त्याचा प्रभाव पडलाच तर अगदी अल्पसा असेल. तेव्हा कोणताही निर्णय घेण्यापूर्वी या संभाव्य परिणामांचा आपण विचार केला पाहिजे.

ग्रँटने न्यायदानाचे काम बरेचसे राजाकडे सोपविले होते. याबाबतीत चॅपलिनने अशी भीती व्यक्त केली आहे की, राजाच्या सध्याच्या अपरिपक्व अवस्थेत त्याच्याकडे थोडासा अधिकार दिला तर न्यायदानाच्या कार्याकडे योग्य ते लक्ष पुरविले जाणार नाही आणि त्या शाखेचे प्रशासन निकृष्ट ठरेल. आपल्या मताच्या पुष्ठ्यर्थ त्याने इतिहासाचा दाखला दिला आहे. टॅसिटस् या प्रसिद्ध इतिहासकाराने असे अनुमान काढले आहे की क्लॉडिअसने[६]

६. क्लॉडिअस हा रोमन बादशाहा आणि याचा काल ४१–५४ इ. स. असा आहे.

जेव्हा न्यायदानाचे अधिकार आपल्याकडे घेतले तेव्हा सर्व प्रकारच्या जुलूम-जबरदस्तींची शक्यता निर्माण झाली. इतिहासातील असे अनेक दाखले देता येतील की जेव्हा राजा स्वतःच न्यायाधीश बनला होता त्या काळात लुटालूट आणि जुलूम यांना ऊत आला होता. चॅपलिनने आपल्या मनातील अशी भीती व्यक्त केली होती की स्वार्थी आणि बुभुक्षित नातलगांनी वेढलेल्या या अननुभवी राजाचा गैरफायदा घेतला जाईल आणि त्याची मर्जी संपादन करून घेण्यासाठी चढाओढ निर्माण होईल.

ग्रँटने आपल्या अहवालात असे स्पष्टपणे म्हटले होते की, राजाने आतापर्यंत न्यायदानाचे काम अगदी चोख बजावले होते. असे असले तरी आपल्या मनातील शंका आणि भीती कमी होत नाही, आणि म्हणून न्याय आणि महसूल ही खाती सध्या तरी ब्रिटिश प्रशासकाकडेच राहावीत असे आपले मत चॅपलिनने मांडले आहे. तो म्हणतो, "वास्तविक ही सारी खाती म्हणजे एकाच साखळीचे दुवे आहेत. पोलिटिकल एजंटने हे दुवे क्रमशः सोडविण्याचा जो मार्ग सुचविला आहे तो तत्त्वतः जरी स्पृहणीय असला तरी त्याची अंमलबजावणी करताना तो अधिक काल्पनिक वाटेल आणि त्यात असंख्य व्यावहारिक स्वरूपाच्या अडचणी निर्माण होतील."[७]

थोडक्यात, ग्रँटला जे क्रमाक्रमाने करावेसे वाटत होते ते चॅपलिनला आवश्यक अशी परिस्थिती निर्माण होताच एकदम करावे असे वाटत होते.

१८ ऑगस्ट १८२० रोजी फ्रॅन्सिस वॉर्डनने चॅपलिनला आपले विचार पत्रद्वारे कळविले. त्याचे विचार हे पर्यायाने गव्हर्नर-इन्-कौन्सिलचे विचार होते. एल्फिन्स्टन हाच मुंबईचा गव्हर्नर होता. राजाच्या उत्पन्नात रयतेला कसलीही तोशीस न देता ग्रँटने घातलेल्या भरीबद्दल समाधान व्यक्त करून विल्यम चॅपलिनच्या संभाव्य भीतीशी आपण सहमत आहोत असे सरकारचे मत त्याने कळविले होते.

त्याचप्रमाणे सत्तांतराच्या बाबतीत ग्रँट आणि चॅपलिन यांच्या मतांचा साकल्याने विचार करून बनविलेले सरकारी मतही त्याने कळविले

---

७. All these departments seem to me to constitute links of the same chain, the disjoining of which by the gradual process suggested by the Political Agent though admirable in theory would probably be found too speculative for execution without occasioning numberless practical inconveniences.

होते. “ हे सत्तांतर जितके शक्य असेल तितके लांबणीवर टाकावे आणि असे करीत असताना राज्याची भरभराट आणि उत्तम प्रशासन या गोष्टी प्रामुख्याने लक्षात घ्याव्यात. अर्थात हा सत्तांतराचा काळ फारच अनिश्चित असू नये आणि वस्तुत: जरुरीपेक्षा तो फार लांबणीवर टाकू नये. ”[८]

हे सत्तांतर क्रमशः न करता एकदम करावे हे चॅपलिनचे मत सरकारने उचलून धरले होते. एल्फिन्स्टन जेव्हा पुण्याचा कमिशनर होता तेव्हा या राजाच्या कक्षेत किती महसूल असावा यासंबंधी त्याने गव्हर्नर जनरलला एक खलिता पाठविला होता, त्यात त्याने १८ लक्ष आकडा दिला होता. चॅपलिनच्या मते राजाचा महसूल हा प्रशासनाशी निगडीत आहे. राजाकडे सत्ता गेल्याने राज्याच्या उत्पन्नात वाढ होईल अशी अपेक्षा करणे व्यर्थ होईल हे चॅपलिनचे म्हणणे देखील मान्य झाले होते. सत्तांतराची प्रक्रिया कशी करावयाची हे ठरविण्याचे सर्वाधिकार त्याला देण्यात आले होते.

ग्रँटच्या अहवालाचा गौरव करून त्याची तळमळ, त्याचा विवेक आणि त्याच्याकडे सोपविलेल्या विविध प्रकारच्या कामांत त्याने दाखविलेले नैपुण्य याची जितकी भलावण करावी तितकी अपुरीच ठरेल असे प्रशंसेचे उद्गार सरकारने काढले होते.

सत्तांतर कसे आणि केव्हा करावे याबाबतीत मतभेद असले तरी सत्तांतर वादातीत होते. हे जलद घडवून आणावे असे ग्रँटचे प्रयत्न होते. यासंबंधी प्रगतीचे अहवाल तो वारंवार सादर करीत असे. शेवटी फ्रॅन्सिस वॉर्डनला पत्र लिहून ५ एप्रिल १८२२ हा दिवस सत्तांतरासाठी मुक्रर केला. ग्रँटचे याबाबतीतले विचार गव्हर्नराने मान्य केले आणि ११ मार्च, १८२२ रोजी चॅपलिनला याची कार्यवाही करण्यासंबंधीचे पत्र लिहिले.

सत्तांतरासंबंधी ब्रिटिश अधिकाऱ्यांमध्ये अशी चर्चा चालू असता साताऱ्यास काय घडत होते हे पाहणे उचित ठरेल. ग्रँटच्या सल्ल्याप्रमाणे प्रतापसिंहाने आपली दैनंदिनी लिहिण्यास प्रारंभ केला होता. या रोजनिशीचे सुमारे प्रत्येकी तीनशे फूलस्कॅप पानांचे २१ हस्तलिखित खंड पेशवे दप्तरात आहेत. २४ ऑक्टोबर १८१८ ते २७ सप्टेंबर १८३८ पर्यंतचे

---

८. Transfer must be postponed as long as practicable it may not be too indefinite and that it may not infact be deferred longer than shall be essentially necessary.

सातान्यातील घडामोडींचे दर्शन या रोजनिशीमध्ये आले आहे. ब्रिटिश अधिकारी आणि राजा यांच्यामधील रागलोभांचे सारे पडसाद या रोजनिशीत आढळतात. सातान्याचा राजकीय, सामाजिक इतिहास लिहिण्यास अत्यंत उपयुक्त असे हे एक साधन आहे.

या रोजनिशीमध्ये राजा आणि ग्रँट अथवा राजाचे अधिकारी यांच्यामध्ये जी बोलणी झाली त्याची नोंद आली आहे. त्यावरून ग्रँटची कार्यपद्धती, सत्तांतराची आवश्यकता, सत्तांतरानंतर राजाने कसे वागावे या संबंधीची माहिती आपणास मिळते.

ग्रँटबद्दल प्रतापसिंहाच्या मनात नितांत आदर होता. तो म्हणतो, "जे समई कपीणी सरकारातून राज्य दिल्हे ते वेलेस जर आम्हास दिल्हे असते तर संभालण्यास मुसकल पडती. हाली ग्राट साहेब यास कंपीणी सरकारानी ठेऊन काही वाकब जाल्यामुळे आमचा फायेदा आहे असेच पुढे करणे हे तुम्हाकडे आहे."[९]

प्रतापसिंह कार्यप्रवण आणि विवेकी आहे याबद्दल ग्रँटच्या मनात संदेह नव्हता. "राजाचा गोतावळा आणि काही अधिकारी त्याला पसंत नव्हते." माहाराज तुम्हाजवळ जतके लोक आहेत यात कोणी येक दिखील तुमचे राज्य संभालतीलसे दिसत नाही विठलपंत दिवाण आहेत व त्याचे मनात आहे परंतु मेहनत होत नाही व आमल पुसले कामावर चालत नाही तेव्हा महाराजा सइसावा नाही त्या पक्षा आम्ही तारीफ करीत नाही तुम्ही मात्र सांभालाल व हाली लोकही आम्हापासी बोलतात की म्हाराज राज्य करीतील म्हाराज तुम्ही हे सांभालाल हे आमचे दिलात आले होते परंतु लोक काय बोलते की म्हाराजाचे हातून सांभाल होणे नाही ...... मात्र आमी म्हणत होतो की सभालतील राज्य त्याप्रमाणे आता आमचे लोक व साहेब लोकही बोलतात की माहाराज राज्य साभालतील म्हणत होता हे ग्राट साहेब खरे या प्रा ग्राट समक्ष बोले.[१०]

ज्याने हे सातारचे राज्य निर्माण केले तो एल्फिन्स्टन सत्तांतराच्या प्रसंगी सातान्यास यावा व आपल्या शुभहस्ते त्याने हे राज्य आपल्या हवाली करावे अशी राजाची प्रामाणिक इच्छा होती. अर्थात कार्यबाहुल्यामुळे

---

९. रोजनिशी क्रमांक ४ पृ. ४३ ता. ३०-११-१८२०.

१०. रो. क्र. ४ पृ. १२२ ता. २२-२-१८२१.

एल्फिन्स्टनला ते शक्य झाले नाही. ग्रँटच्या मनातही तसेच होते. कारण तो राजाच्या भावना ओळखणारा होता.

राजा आणि कंपनी सरकार यांचे परस्परांचे संबंध नेहमी सलोख्याचे असावेत असे ग्रँटला वाटे. तो राजास म्हणत असे, "कंपणी सरकारची मदत व दोस्ती ठेवली तरी व मेहनत केली तरी माहाराज तुमचे राज्य वाढेल." यावर राजाने उत्तर दिले, "आमचे राज्य आहे हे जाऊ किंवा नवीन येऊ नये हे दोन दरजे आमचे मनात बरोबर आहेत परंतु मेहनत करू आमी आपले अबरूखातर व दोस्ती ठेऊ का की ज्याणे आपले संगे उपकार केला त्याचसंगे कधीही बेमान होऊ नये याणे येथेही बेमान म्हणतील व देवही नाखुसी ही गोष्टीने जे होईल ते होऊ बाकी जरब व लालुचीने आमचे हातुन काही होणार नाही हे पुरते ग्राट साहेबानी लेहून ठेंवावे."[११]

प्रशासकीय कामाचा ताण आणि इतिहासलेखनाची जबाबदारी यामुळे ग्रँटची प्रकृती अलीकडे फारच बिघडली होती. मायदेशी परत जाण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली होती. परंतु साताऱ्याची जबाबदारी त्याला या विचारापासून परावृत्त करीत होती. हे सारे असे अर्धवट सोडून आपण गेलो तर कदाचित एल्फिन्स्टनला ते आवडणार नाही याची देखील त्याला भीती वाटत असावी. सत्तांतराशिवाय राजाशी केलेल्या कराराला पूर्णत्व येणार नव्हते. तेव्हा राजाकडे सर्व कारभार सुपूर्द केल्याशिवाय त्याची सुटका होणे शक्य नव्हते, आणि राज्य हवाली करणे हेही काही सोपे काम नव्हते. कमिशनर, गव्हर्नर, कौन्सिल या साऱ्यांची खात्री पटल्याखेरीज तसे घडणार नव्हते. आपल्यानंतर दुसरा कोणी रेसिडेंट येथे आला अथवा वरचे अधिकारी बदलले तर हे काम जलदगतीने होणार नाही. "आम्ही येथे आहो तो माहाराजाचे राज्य हवाली जाहाले म्हणजे दोस्तीने सला पडे की वागलो तरी कंपणी सरकारात माहाराजाचा फायदा करीन व चापलीन साहेब पुणे मुकामी आहेत व अलपीष्टण साहेब मुंबई मुकामी आहेत तो येखदा बोभाट गेला तरी येथील वकिलास लिहीतील की ये विसी फार मनात आणावयाचे काही कारण नाही परंतु या कामावर दुसरे साहेब आले म्हणजे माहाराजास अवघड पडेल सा। हुशारीने रहावे व तहनाम्यावर हरघडी नजर ठेऊन चालावे नाहीतर येथे वकील राहील तो तहनाम्याचे कलम माहाराजास अडवून धरील सा। येखादे मोठे कामाची अडचण व सला ही पुसत जावी

११ रो. क्र. ४ पृ. १२२ ता. २२-२-१८२१.

व जाहागीरदाराविसी फार माहाराजास ईजा होईल त्याचे बोभाट मुंबईस जातील तेव्हा ते तेथील वकिलास लिहीतील की या प्रकर्णी असा मजकूर आम्ही ऐकिला आहे त्यावरून येथील वकील माहाराजास जबाब पुसतील तेव्हा माहाराजाकडून जबाब साफ व्हावा म्हणजे ठीक चालेल त्यात काही मतलब दिसला तरी अंदेशा दिलात ठेवीतील ये विसी माहाराजास फार नजर ठेवावी लागल सर्व कामापेक्षा ज्याजती." यावर राजाने उत्तर केले की, "कंपीणी सरकाराखेरीज कोणासही दरकार ठेवीत नाही हे साहेबानी पुरते दिलात ठेवावे व असे जाहाले तरी चौकसी मात्र पुरती व्हावी. यावर ग्राट बोलले की ठीक आहे याप्रा़ो समक्ष बोलणे जाहाले[१२] ..."

प्रतापसिंहाच्या रोजनिशीतील हा उतारा अत्यंत महत्त्वाचा आहे. जणु पुढे काय घडेल याची नांदीच ग्रँटने येथे केली होती. "दुसरे साहेब आले म्हणजे माहाराजास अवघड पडेल." "तहनाम्याचे कलम माहाराजास अडवून धरील." "जाहगिरदाराविसी फार माहाराजास इजा होईल" हे त्याचे उद्गार अत्यंत सूचक आणि भविष्याची चाहूल दर्शविणारे आहेत. ग्रँटने राजाला सतत बजावले आहे की तहनाम्यावर हरघडी नजर ठेऊन चालावे आणि "माहाराजास जबाब पुसतील तेव्हा माहाराजाकडून जबाब साफ व्हावा म्हणजे ठीक चालेल."

हा तहनामा पुढे इंग्रजांनीच पाळला नाही असा ग्रँटने आरोप केला आहे. या सबंध प्रकरणात ग्रँटचा प्रामाणिकपणा, सातान्याचे राज्य आणि राजा यासंबंधीचा जिव्हाळाच हरघडी प्रत्ययाला येतो आणि ग्रँटचे व्यक्तिमत्त्व उजळून निघते.

प्रतापसिंह हे राज्य सांभाळण्यास सर्वतोपरी लायक आहे आणि पुण्यामुंबईचे अधिकारी जे आक्षेप घेतात ते वस्तुस्थितीला धरून नाहीत अशी त्याची मनोमन खात्री पटली असली तरी त्याच्या सहकाऱ्यांबद्दल त्याला भरवसा वाटत नव्हता. 'लाचखाणे' आणि "आपले हाती काही जरी काम दिल्हे म्हणजे बलकावून खावंदावर पडता ते ब्राह्मण लोकात फार आहे"[१३]—हे दोन दोष येथील लोकांमध्ये फार मोठ्या प्रमाणावर आहेत, आणि त्याने यांचे निवारण केले तर फार बरे होईल असे तो म्हणत असे.

---

१२. रो. क्र. ४ पृ. २८३ ता. ३–७–१८२१.

१३. रो. क्र. ४ पृ. १६६ ता. १–४–१८२१.

सत्तांतराविषयी राजाबरोबर त्याची अगदी मोकळ्या मनाने चर्चा होत असे आणि राजा त्याची नोंद आपल्या डायरीत करून ठेवी. "ग्राट बोले की माहाराज आमचे दिलात असे वाटते की हे राज्य दिल्हे आहे ते माहाराजाखेरीज कोणी सांभाळील असे दिसत नाही व या मुलकात तर्फदारी व लाच खाण्याचा दस्तुर जात नाही याजवर माहाराजानी नजर फार ठेविली पाहिजे व आम्ही मुंबईस गेलो होतो त्यावेळेस अलपीष्टण साहेब याणी आम्हास पुसिले की माहाराज राज्य साभालीतील किवा कसे याजवर आम्ही उत्तर केले की येक वर्षात सांभालतील त्यास हाली दिसेल जमाबंदी जाहाली म्हणजे बडे साहेब येऊन हवाली केले तर संभालीतील किवा कसे यावर आम्ही बोललो की आमची अकल व मेहनत होईल यास खलेल न करिता जे होईल ते करू परंतु तुमची सला पाहिजे यावर बोलले की दोस्तीने देत जाईन "[१४]

राज्य हवाली करावयाच्या वेळी कोणती खबरदारी घेतली पाहिजे हाच एक ध्यास ग्रँटला लागून राहिला होता. १८२१ साल उलटत होते तशी त्याची चिंता वाढत चालली होती. "ग्राट बोले की मी लवकर जाणार विलायतेस व दिस राज्य हावाली करण्यास थोडे राहिले व म्हाराजानी हुशार राहावे व राज्य हावाली करते वेलेस जाहागीरदार असावेत हे चांगले किंवा नकोत आमी बोले की करण कसे हे कलले म्हणजे बोलतो तो ग्राट बोले की मोरतब आम्हाजवळ आहे हे देऊ मेजवानी करू तोफा बार व फलटणे बार या कचेरी परतून (?) समारंभ करू आमी बोले तरी जाहागीरदार बोलावणे व ग्राट बोले की जाहीरनामा करू की म्हाराजाचे राज्य हवाली केले हुकुम ते करतील आमी बोले ठीक आहे."[१५]

राज्याची जबाबदारी स्वीकारण्याची घटिका जशी जवळ येत होती तशी राजाला आपण हे सारे सांभाळू शकू का हा विचार भेडसावू लागला. आजपर्यंतची गोष्ट निराळी होती. न्यायदान करीत असताना ग्रँटच्या सहानुभूतीची नजर सतत त्याच्याभोवती फिरत असे. त्यामुळे त्याचा आत्मविश्वास दुणावत असे. पण आता काही चूक घडली तर त्याचा विपरीत परिणाम होण्याची शक्यता होती. आपल्या मनातील ही भीती तो लपवू शकत नव्हता. "आम्ही ग्राटास बोलो की राज्य हावाली करिता

१४. रो. क्र. ४ पृ. २८३ ता. ३-७-१८२१.
१५. रो. क्र. ५ पृ. ७४ ता. २८-१२-१८२१.

परंतु मंडली कसी आहे व आमी म्हराठे येकटे आहो यावर ग्राट बोले की खरे आहे व मुसलमान लोक मिजाज खोर व म्हराटे दिलाचे साफ हे सारे कामाविसी चांगले कलम परंतु मेहनत करीत नाहीत व ब्राम्हण लोकावर विश्वास ठेवतात.... सारे कामात ब्राह्मणाचे येक काम नीट नाही परंतु लिहिण्याचे कामामुळे साऱ्यास ब्राह्मणाची जरब हे ग्राट बोले मग आमी बोले की हे तुमचे ध्यानात आहे पुढे आमचे कसे ग्राट बोले की आम्ही लेहून ठेऊ की जो वकिलीस सातारा येथे साहेब लोक येईल त्यास साहामहिने वहिवाट पाहून आम्ही समजून देऊन मग जाऊ व पुढे वहीवाट राहील त्याणे तसी करणे हे लेहून ठेवीन बोले व ग्राट बोले की ब्राह्मण लोकासी फार समजून वागावे हे विठोबास कलविले जावे."[१६]

मराठ्यांचे राज्य हे ब्राह्मणी राज्य आहे या विचाराला चालना इंग्रजांनी दिली होती हे लक्षात ठेवले पाहिजे. बाजीरावाचा पाडाव करून ब्राह्मणी मसनद आपण नष्ट करीत आहोत, आपला लढा ब्राह्मणांशी आहे असे धोरण इंग्रजांनी स्वीकारले होते. बाजीरावावरचा राग त्याने साऱ्या चित्तपावनांवर काढावयाचे ठरविलेले दिसते. येथे जे कदाचित प्रतापसिंहाच्या मनात नसेल ते भरवून देण्याचा प्रयत्न केला आहे असे वाटते. साताऱ्याचे मराठी राज्य हे बाजीरावाच्या ब्राह्मणी मसनदीला शह देण्यासाठीच निर्माण करण्यात आले होते. महाराष्ट्रात पुढे जोम धरलेल्या ब्राह्मण–ब्राह्मणेतर चळवळीची मुळे येथे आपल्याला सापडतील.

राजकीय धोरण अथवा आर्थिक धोरण यात बदल झाले म्हणज त्याचे पडसाद सामाजिक जीवनावर देखील उमटतात. समाजाच्या चौकटीत स्थित्यंतरे घडून येतात. उदाहरणार्थ, १८ व्या शतकात इंग्लंड-मध्ये औद्योगिक क्रांती झाली, शहरांची वाढ झाली आणि खेडी ओस पडली. शेतकऱ्यांचा वर्ग ( Yeoman ) जवळजवळ नष्ट झाला आणि कामगारांचा नवीन वर्ग उदयाला आला. भारतात १९ व्या शतकात ब्रिटिश राजवट आली. त्यांची राज्यपद्धती, युद्धनीती, समाजपद्धती सारे काही भिन्न होते. भारतीय जीवनात 'कोणतेही नवीन प्रयोग' करावयाचे नाहीत असे कितीही कटाक्षाने पाळावयाचे म्हटले तरी या दोन्ही पद्धतीत सांगड घालणे शक्य नव्हते. संघर्ष अटळ होता. उदाहरणार्थ, या नव्या राजवटीत किल्ल्यांना बंदीखान्याखेरीज अन्य काही स्थान नव्हते, म्हणून ते पाडून टाकण्याचे हुकूम निघत होते. मराठ्यांच्या

१६. रो. ज. ५ पृ. १३४ ता. १२–३–१८२२.

राज्यात नावारूपाला आलेल्या बऱ्याच व्यक्तींना या नवीन राजवटीत काही स्थान राहणार नव्हते. मराठे सैनिक बंडखोर अथवा अनावश्यक या सबबीखाली कमी करण्यात येत होते. या सैन्याचे अधिकारी मराठे सरदार, जहागीरदार यांची या नव्या सरकारला गरज राहिली नाही. त्यांना फक्त हवे होते कारकून आणि ग्रामाधिकारी, विशेषतः लिहिण्याचे आणि हिशेबाचे काम पाहणारे लोक. तेव्हा साहजिकच या नव्या राजवटीत ब्राह्मणवर्ग समाविष्ट झाला, आणि मराठे सरदार, जहागीरदार राजकारणापासून दूर फेकले गेले आणि शिबंदीला लष्करी पेशा टाकून द्यावा लागला. तत्त्व अथवा धोरण म्हणून ब्राह्मणांवर टीकेचे शस्त्र उगारले असले तरी त्यांच्याखेरीज राज्यशकट चालविणे शक्य नव्हते, आणि म्हणून राजकारणात ब्राह्मण परत आले अर्थात त्यांचा दर्जा दुय्यम राहिला. ही परिस्थितीदेखील पुढील ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाला कारणीभूत झाली असेल.

राजाची पारख ग्रँट अगदी शेवटच्या क्षणापर्यंत करीत असावा. कदाचित ग्रँटच्या अशा वागण्यामुळे त्याचा आपल्यावर पूर्ण विश्वास आहे किंवा नाही याबद्दल राजाच्या मनात संभ्रम निर्माण झाला असावा. तो लिहितो, "ग्राट साहेबास आम्ही बोललो की तुमचे कंपीणी सरकारचे दिलात आम्ही तीन वर्षे मेहनत केली त्यास राज्याचे लोभाने केली किंवा दोस्तीसाठी केली व आम्ही आपले कीर्तीसाठी केली हे तीहीहून तुमचे दिलात कसे आहे यावर ग्राटसाहेब याणी उतर केले की, माहाराजानी मेहनत केली ही तीन्ही कलमासाठी केली यावर आम्ही बोललो की दोस्तीसाठी व कीर्तीसाठी केली राज्याचे लोभाकरिताच केली असे जर तुमचे मनात आहे तरी तीन वर्षे तुम्ही काम चालविले त्याप्रा‍ेा हालीही चालवणे तूर्त राज्य हाती देण्याचे कारण नाही जे वेलेस दोस्तीसाठी मेहनत केली व कीर्तीसाठी केली असे तुमचे दिलात येईल ते वेलेस राज्य हवाली करावे तूर्त देऊ नये यावर ग्राट साहेब याणी उतर केले की कंपीणी सरकारचे मनात माहाराजाविसी दिवसेदिवस फायदा करावा असे आहे व आमचेही मनात आहे आम्ही कोठे गेलो तरी माहाराजानी पत्र पाठवून साल विचारील्यास आमचे तऱ्हेने मदत होईल तितकी करू व कंपीणी सरकारचे मनात आहे की माहाराजाचे हवाली राज्य केल्यानंतर साहाच्यार महिने वहिवाट कसी होते हे पाहून नंतर काही वकिलानी पाहू नये असे आहे परंतु ही वोलख माहाराजास द्यावी असा कंपीणी सरकारचा हुकुम आम्हास नाही परंतु अम्ही आपले तर्फेने माहाराजास कलवितो व माहाराजाच्या भरवसाच आहे ये विसी माहाराजानी कोणत्या कामात काही

कसर राहिल्यास दिलगिरी आणू नये काही कसर कामात राहिली तरी वर्षासाहमहिन्यात बंदोबस्त करून देईन ये विसी दिलात खातरी ठेवून आम्हावर भरवसा ठेवावा यावर आम्ही बोललो की आम्ही भरवसा तुम्हावर ठेविलाच आहे परंतु आम्ही व कंपीणी सरकारानी असा भरवसा ठेवावयाचा असल्यास ठेवावा की कामाचे वहिवाटीस ग्रँटसाहेब होते त्या प्राोच आहेत व ग्राटसाहेब याचे बंगल्यात माहाराज आहेत असा भरवसा ठेऊन सांगावयाचे असले तरी तुम्ही कलमगार ठेविलेच आहेत यावर ग्राट साहेब बोलले की हे कोणतेही मनात आणू नये मी खातरी येकदा केली आहे "[१७]

राज्य हवाली करण्याचे काम एका जाहीरनाम्याने करावयाचे होते. कंपनी सरकारच्या जाहीरनाम्यात कोणत्या बाबींचा अंतर्भाव करावा याची चर्चा सातान्यात सुरू झाली. ग्रँटने राजाला मसुदा तयार करण्यास सांगितले. पुण्यास चॅपलिनकडे हा मसुदा मंजुरीसाठी पाठवावयाचा होता. मागील जाहीरनामे पाहून प्रतापसिंहाने एक मसुदा तयार करून २० मार्च १८२२ रोजी ग्रँट आणि चॅपलिनकडे पाठविला. जहागीरदार आणि राजा याच्या संबंधाविषयी प्रतापसिंहाने सुचविले होते, "..जहागीरदार लहान-मोठे वगैरे लोक त्याजकडून हुकुमात तकरार पडल्यास ये विसीचा बंदोबस्त करण्याकरिता माहाराज सरकार कंपीणी सरकारात ईतला देऊन माहाराज बंदोबस्त करीतील हे सर्व लोकानी समजोन माहाराज सरकारचे हुकुमा-प्रमाणे वागावे."[१८]

जहागीरदार हे आपल्या वर्चस्वाखाली असावेत अशी कंपनीची भूमिका होती, तर राजाला त्याच्यावर हुकूमत गाजवावयाची होती. राजा आणि कंपनी यांच्यात संघर्षाला खरी सुरवात येथूनच झाली आणि पुढे त्याने इतके उग्र स्वरूप धारण केले की त्याने प्रतापसिंहाचा तर बळी घेतलाच पण त्याचबरोबर सातारा राज्य देखील नष्ट केले.

चॅपलिनला जाहीरनाम्याचा मसुदा मिळाल्याबरोबर लगेच एकदोन दिवसांत त्याने तो दुरुस्त करून पाठविला. जहागीरदारांच्या बाबतीत त्याने सुचविले होते की, "जाहागीरदारी मोठे गोष्टीबदल यादी खेरीज तकरार पडली तरी जो कंपीणी सरकारातून हुकुम होईल त्या प्रमाणे म्हाराज करतील त्यास हुकुम आसू नये दुसरी अक्षरे घालावीत."[१९]

---

१७. रो. क्र. ५ पृ. १४६ ता. १९-३-२२.
१८. रो. क्र. ५ पृ. १४९ ता. १९-३-२२.
१९. रो. क्र. ५ पृ. १६१ ता. २७-३-२२.

अर्थात राजाला ही दुरुस्ती आवडली नाही. रदबदली करण्यासाठी तो ग्रँटकडे गेला. सोबत दिवाण विठोबा महाजनी देखील होते. ग्रँटचा सहकारी आणि खास विश्वासातील मित्र अ‍ॅडॅम्स देखील हजर होता. ग्रँटने त्याचे म्हणणे ऐकून घेतले व आपण चॅपलिन साहेबास याविषयी लिहितो असे आश्वासन दिले. पण ग्रँटचा उपदेश राजाला असा होता की, " म्हाराज तुमची हुकमत कंपीणी सरकार संभालील कालजी नको. "

या जाहीरनाम्यासंबंधी ग्रँटशी बरीच विस्तृत बोलणी राजाने केली. तो सारा प्रसंग विस्ताराने रोजनिशीत नोंदविला आहे.

ग्रँट आणि राजा यांच्यामध्ये प्रस्तुत विषयावर चर्चा चालू होती, पण कंपनी सरकारने मात्र पूर्वीच निर्णय घेतला होता. ११ मार्च १८२२ रोजी चॅपलिनला मुंबईहून फ्रॅन्सिस वॉर्डनने लिहिलेल्या पत्रात यासंबंधी स्पष्ट सूचना दिल्या होत्या. राजाने रेसिडेंटच्या पूर्वसंमतीने आणि त्याच्या सल्ल्याने जहागीरदारांशी सारे व्यवहार करावयाचे होते. जहागीरदाराला दंड ठोठावणे अथवा त्याची जहागीर जप्त करणे हे रेसिडेंटच्या परवानगी-शिवाय राजाला करता येत नसे; आणि महत्त्वाच्या प्रकरणात रेसिडेंटला कंपनी सरकारची परवानगी घ्यावी लागत असे. थोडक्यात, जहागीरदार हे पर्यायाने रेसिडेंट आणि कंपनी सरकार यांच्या वर्चस्वाखाली राहणार होते.

सत्तांतर–समारंभास प्रमुख पाहुणा म्हणून चॅपलिनची नियुक्ती झाली. वॉर्डनच्या आदेशाप्रमाणे ५ एप्रिल, १८२२ रोजी साताऱ्यास दरबार भरवून, शिक्कामोरतब त्याच्या हवाली केले. राजाला एकांतात घेऊन त्याने करारनाम्याप्रमाणे कंपनी आणि राजा यांच्यामध्ये येथून पुढे कसे संबंध राहतील विषेशतः फ्रॅन्सिस वॉर्डनच्या सूचना, चॅपलिनने निसंदिग्ध शब्दांत सांगितल्या. राजाने कृतज्ञतापूर्वक ब्रिटिश सरकारचे आभार मानले, आणि आपण रेसिडेंटच्या सल्ल्यानुसार राज्यकारभार हाकू असे आश्वासन दिले. तसेच रेसिडेंटचे ऑफिस येथे राहावे अशी खास विनंती केली. राजाच्या या मृदुभाषणाचा चॅपलिनच्या मनावर परिणाम झाला असावा. कारण 'राजा बोलल्याप्रमाणे वागेल असा मला भरवसा वाटतो.' अशी कबुली त्याने फ्रॅन्सिसला दिली.[२०]

सत्तांतराच्या समारंभाचे वर्णन त्या दिवशीच्या रोजनाम्यात जे आले आहे ते वाचनीय आहे.

---

२०. नं. १२७० पृ. १७३-७७, पेशवे दप्तर पुणे, २४–४–१८२२.

"रोजनामा छ ११ रोज गुरुवार चैत्र शु।। १३ प्रातःकाली तोफे बराबर विठल बलाल दिवाण व बलवंतराव चिटनीस व केशवराव अगटे वगैरे मुछदी व मानकरी बलवंतराव भोसले आदि करून च्यापलिन साहेब बाहादुर पुण्याहून सातारियास राज्य हवाली करण्यास येणार म्हणोन सामोरे येण्येपर्यंत ग्राटसाहेब बाहादुर व बालाजीपंत नातु सुधा जाऊन घोडचावरूनच सलाम सर्वांचे जाले नंतर ग्राटसाहेबाचे बंगल्यात राहावयाकरिता च्यापलिन साहेब गेले."

"रोजनामा छ १२ रोज शुक्रवार चैत्र शु. १४ माहे रजब तारीख ५ यप्रेल सन १८२२ प्रातःकाली रंग माहालात कचेरी जाली च्यापलिन साहेब ग्राट साहेब व मकलोड साहेब व मोरीस साहेब व आणखी तीन साहेब अदालतीतील व पलटणचे आले व बालाजीपंत नातु आले त्यास सामोरे फत्तेसिंग भा॰ अकलकोटकर व बळवंतराव भा॰ व विठल बलाल दिवाण दरवाज्यापर्यंत जाऊन बराबर घेऊन कचेरीस आले नंतर बालाजीपंत नातूनी राज्य माहाराजाचे हवाली केल्याचा जाहीरनामा वाचिला नंतर सिके दऊत व मोर्तब ग्राटसाहेबानी आपले हाते उठोन माहाराजाचे हाती दिल्हे विडे अतर गुलाब हारतुरे सर्वास दिल्हे खुसीच्या तोफा विगेरजानी पलटणच्या करविल्यानंतर माहाराज सरकारच्या तोफा जाल्या येक घटका साहेब बसून निरोप घेऊन गेले पुढे सर्वत्र मुछदी व सरंजामी व मानकरी दरखदार वगैरेसुधा नजरा जाल्यावर काही धर्मसीष्ट ब्राह्मणास व अंगाडीयास जाला नित्य पाटाप्रमाणे अदालतीत जाऊन स्वारी वाडचात आली काही निद्रा जाली तिसरा प्रहरी प्रहर दिवस राहाता स्वारी ग्राट साहेबाचे बंगल्यास गेली तेथे समारंभ मुछदी व सरंजामी व दरखदार यास पोशाख व जवाहीर वगैर सर्वास यादी बरहुकुम देऊन सरकारात पोशाख व जवाहीर व हाती नग येक व घोडा येक दिल्हा समारंभ होऊन स्वारी परत वाडचात आली अस्तमानी आली बंगल्यात मेजवानी केली गेली त्यास पोशाक व जवाहिर दिल्हे ..."[२१]

यानंतर कोणास काय पोषाख दिले याचीं यादी जोडण्यात आली आहे. छत्रपती स्वामीस ७ पोषाख सनगे, सिरपेच, तुरा मोत्याचा, कंठी, पोच्या जोडी, भुजबंद जोडी हे पाच जवाहिर, १ मोराची चवरी, १ पेटी, १ घोडी, १ अफतागीर, इत्यादी वस्तू मिळाल्या. आप्पासाहेब माहाराज,

२१. डे. कॉ. रु. ५५ फा. २ : १४.

सौ. राणीसाहेब मातुश्री बाईसाहेब, सौ. जिजीसाहेब, रेणुकाबाई डफळे यांना त्यांच्या मानाप्रमाणे पैठणी, खण, शालजोडी हिऱ्याच्या अथवा मोत्याच्या पाटल्या देण्यात आल्या.

मुत्सद्दी, मानकरी व दरखदार यांना देखील वस्त्रप्रावरणे देण्यात आली. फत्तेसिंग भोसले, अक्कलकोटकर यांचा मान मोठा. त्यांना ५ सनगे, ३ जवाहीर दागिने, परशराम पंडित प्रतिनिधी, पंतसचिव, विठ्ठल बल्लाळ दिवाण, पंतअमात्य, पंडितराव, बळवंतराव चिटणीस, बळवंतराव भोसले, नारायण नाईक आणि मानसिंगराव राजे महाडिक या मानकऱ्यांना सनगे आणि जवाहिर देण्यात आले. खंडेराव शिर्के, दाजीभाऊ पाध्ये, सरूपजी महाडिक, दिनकरराव मोहिते, गुलाबराव रिसालदार, कृष्णराव फडणीस, वासुदेव महादेव दप्तरदार, यशवंतराव सरसुभेदार, दाजीबा सरसुभेदार, अन्याबा चितळे, आबा पारसनिस, केशवराव आगटे, अंताजीपंत माहाजनी, भिवराव पोतनीस, बळवंतराव बक्षी आणि नरसु काकडे या दरखदारांना प्रत्येकी ३॥ सनगे दिली.[२२]

महाराजाच्या हवाली राज्य केल्याचे ऐकून एल्फिन्स्टनने संतोष व्यक्त केला. "ग्राट बोले की अलीपीष्टण साहेबास ममईस लिहिले होते की राज्य हावाली म्हाराजाचे केले फार आम्हास खुसी जाहाली व जसे म्हाराज संभालतील तसे सारे कामे सोडून हावाली करणे म्हाराजाचे या प्राो हुकुम जाला आलिपीष्टणचा."[२३]

राज्य हवाली केल्यानंतर ग्रँट हा साताऱ्याचा पोलिटिकल एजंट राहिला नाही. त्याचा हुद्दा रेसिडेंड असा करण्यात आला. अर्थात यामुळे त्याच्या पगारात, भत्त्यात अथवा इतमामात बदल झाला नाही. रेसिडेंटचे प्रमुख काम निरीक्षकाचे आणि मदतनिसाचे होते, आणि आपले विहित कर्तव्य करीत असताना राजाचा दरबार आणि प्रदेश यांमधील घडामोडींची संपूर्ण माहिती मोठ्या त्वरेने गोळा करण्याची जबाबदारी त्याच्यावर टाकली होती. अर्थात ही माहिती राज्यातील भांडणे अथवा कट-कारस्थाने शोधून काढण्यासाठी करावयाची नसून राजाच्या हातून काही चुका घडल्या असल्या तर त्यावर सत्वर उपाययोजना होऊन त्यांचे निराकरण करण्यात यावे आणि राज्यातील संभाव्य असंतोष आणि बखेडा टाळावा या हेतूने होय.[२४]

---

२२. डे. कॉ. रु. ५५ फा. २ : १४.
२३. रो. क्र. ५ पृ. २१८ ता. २४–४–१८२२.
२४. फ्रॅन्सिस वॉर्डेन–चॅपलिन ता. ११–३–२२.

५ एप्रिल, १८२२ नंतर ग्रँटने निरवानिरव सुरू केली. २७ नोव्हेंबर, १८२२ रोजी त्याने सातारा शहर सोडले. सातारा सोडताना त्याने राजाला केलेला उपदेश अत्यंत मोलाचा आहे. तो म्हणतो, " येथे कोणी येईल त्यावर भरवसा ठेवावा म्हाराजानी व जे म्हाराज करणे ते साफ बोलावे व येक बोलून येक तरने न करावे व काही विचार पडला तरी विचाराने बोलावे मग जे जे ते कायेम करून त्याप्रमाणे चालावे म्हणजे बोले प्रमाणे चालतात कायेम मिजाज आहे असे समजून कायेम चाल समजली म्हणजे कोणी जरी काये समजले तरी चाल आसे आहे समजून ज्याणे समजावेले ते खोटे मानतील व यावर म्हाराजाकडून काही नाही जबरीने केले तरी जेथे आम्ही आसो तेथून येईन कालजी न करणे."[२५]

एक उत्तम प्रशासक म्हणून कॅप्टन ग्रँटचे साताऱ्यातील यश उल्लेखनीय आहे. त्याच्या अंगी निर्णयशक्ती, असामान्य कामासाठी लागणारे चातुर्य आणि उत्साह, आपल्या कक्षेतील लोकांच्या गुणांची पारख करून तदनुसार कार्य करण्याची क्षमता, हे गुण फार मोठ्या प्रमाणात होते.[२६]

सातारा सुटले, पण साताऱ्यात त्याचे मन कायम गुंतून राहिले होते. साताऱ्याचे राज्य सुरळीत चालले आहे, राजाचा कारभार रयतेचे हित साधणारा आहे, इत्यादि बातम्या ऐकून त्याला परमसंतोष होत असे. कंपनी आणि राजा यांचे संबंध ठीक होते. पण ग्रँटने निर्माण केलेले मित्रत्वाचे नाते फार काळ टिकू शकले नाही. त्याचा परममित्र प्रतापसिंह आणि पुढे त्याचे आवडते सातारा राज्य यांवर अरिष्ट कोसळले आणि त्याच्या डोळ्यांदेखत सारे नष्ट झाले. एल्फिन्स्टन आणि ग्रँट या दोघांनाही सातारा प्रकरणात कंपनीने काहीही विचारले नाही.

इ. स. १८३५ पर्यंत सारे काही सुरळीत चालले होते. राजाविरुद्ध तक्रार करण्यास कंपनीस काहीच जागा नव्हती. वास्तविक कोर्ट ऑफ डायरेक्टर्सने स्वतःच्या गुणग्राहकतेचे आणि मान्यतेचे प्रतीक म्हणून राजास

---

२५. रो. क्र. ६ पृ. २१ ता. २७-११-१८२२.

२६. कलकत्ता रिव्हयू पृ. ४४४, जुलै, १८४८.

"In addition to judgement, energy, and talents for business of no ordinary kind, he possessed in an eminent degree, the power of appreciating the character of the people over whom he was placed, and of adapting his measures to suit their peculiarities."

एक तलवार नजर करण्याचा ठरावही संमत केला होता. उच्चपदावरील जबाबदाऱ्या उत्तम रीतीने पार पाडल्याबद्दल वाखाणणी करणारे सर्व सभासदांच्या सह्यांचे एक पत्रही तयार केले होते. परंतु प्रत्यक्षात मात्र मुंबईचा त्यावेळचा गव्हर्नर रॉबर्ट ग्रँट राजाला ते पत्र अथवा तलवार नजर करू शकला नाही.[२७] उलट वंशपरंपरागत चालत आलेल्या सिंहासनावरून पदच्युत केल्याचे फर्मान मात्र थोड्याच दिवसांत राजाला मिळाले.

प्रतापसिंहावर कंपनी सरकारने प्रामुख्याने तीन आरोप केले होते. पहिला, कंपनी सरकारातील स्थानिक अधिकाऱ्यांना फितविणे; दुसरा, पोर्तुगीजांशी संगनमत करून युरोपात सैन्य उभारून ब्रिटिशांना भारताबाहेर हाकून लावण्याचा कट करणे, आणि तिसरा, नागपूरचे माजी राजे आप्पासाहेब यांच्याबरोबर मैत्री करून कंपनी सरकारविरुद्ध कारस्थान करणे. अर्थात हे सारे आरोप पुढे तकलादू ठरले.

पण खरा वादाचा मुद्दा होता तो जहागीरदारांवरील नियंत्रणाचा. आपल्या हद्दीतील सर्व जहागीरदार आपल्या वर्चस्वाखाली आहेत असे राजाचे म्हणणे होते. कंपनी सरकारचे मत मात्र निराळे होते. सातारा राज्याच्या कक्षेतील जहागीरदारांशी कॅप्टन जेम्स ग्रँटने वेगळे स्वतंत्र तह केले असल्यामुळे कायदेशीररीत्या ते राजाच्या अंकित नाहीत अशी बाजू कंपनीने मांडली.

१५ ऑक्टोबर १८३९ रोजी राजाला पदच्युत करण्यात आले. ग्रँटला ही बातमी समजली तेव्हा आपली प्रक्रिया त्याने नोव्हेंबर, १८३९ मध्ये एल्फिन्स्टनला कळविली. राजाबद्दल वाटणारी सहानुभूती दाखवून लौकरच हे राज्य मुंबईचा इलाख्याचा भाग बनण्याची शक्यता आहे अशी भीती व्यक्त केली आहे. राजा आणि कंपनी यांचे संबंध केव्हापासून बिघडले असावेत या प्रश्नाचा मनाशी विचार करीत असताना त्याला एकदम आपला परममित्र अॅडॅम्सची आठवण झाली. एल्फिन्स्टनशी बराच पत्रव्यवहार करून या आपल्या मित्राला सर्व्हेअर म्हणून त्याने साताऱ्यात आणले होते. अल्पावधीत राजाची मर्जी त्याने संपादन केली आणि ग्रँटच्या निवृत्तीनंतर तो राजाचा सल्लागार बनला. पुढे दुर्दैवाने १८२९ साली तो साताऱ्यातच मरण पावला. राजाने त्याची साताऱ्यात एक कबरही बांधून घेतली. अॅडॅम्स जिवंत असेपर्यंत राजावर कसलेही आरोप केले गेले

---

२७. The Inwardness of British Annexations in India by C. S. Srinivasachari (1951) p. 27.

नव्हते, तेव्हा राजा आणि कंपनी यांच्यामधील बेबनावाला अॅडम्सच्या मृत्यूनंतर सुरवात झाली असावी असे ग्रँटला दिसून आले. ग्रँटसाहेबाचा दस्तूर काटेकोरपणे पाळला जातो की नाही यावर अॅडम्सची नजर होती, तोपर्यंत सर्व ठीक होते. लाचलुचपतीला आळा बसला होता, शासन ठीक चालले होते.

तो म्हणतो, "राजाला पदच्युत करणे आम्हांला भाग पडावे याची मला कीव येते. प्रतापसिंहासारख्या माणसाला पदच्युत करून हे राज्य खालसा करण्यापेक्षा कंपनीने आपल्या प्रतिष्ठेचा काहीसा त्याग करणे शहाणपणाचे ठरले असते, आणि हिंदुस्थानभर पिकणाऱ्या कंड्यांपासून आपला बचाव झाला असता."[२८]

प्रतापसिंहाच्या ऱ्हासाला सुरवात झाली ती बाळाजीपंत नातूच्या प्रकरणापासून. वास्तविक बाळाजीच्या कार्यक्षमतेवर आणि उपयुक्ततेवर त्याचा विश्वास होता. तो म्हणतो, "आमी ब्राह्मण लोक सारे पाहिले परंतु बालाजीपंता प्रा ो कोणी नाही शाहाणा मग आणखी बोले ग्राट की दोन तीन काम वाईट खुनसी व राग मनी धरून ठेवणे त्याचे छातीवर चढणे."[२९] ग्रँटला माणसाची पारख कशी होती हे प्रतापसिंहाच्या रोजनिशीतील या उद्‌गारावरून स्पष्ट होते. ग्रँटच्या मते बाळाजीपंत हा राजाचा प्रमुख शत्रू होता. त्याचा अहंकार दुखावला होता तो साताऱ्यात. अर्थात राजाच्या पदच्युतीस बाळाजी कारणीभूत होता किंवा नाही हा वादाचा मुद्दा होऊ शकेल पण ह्या घटनेचे बाळाजीने मोठ्या आनंदाने स्वागत केले होते. एल्फिन्स्टनला तो लिहितो, "राजाने अशा प्रकारे

---

२८. ग्रँटचे एल्फिन्स्टनला पत्र.

"Adams presence was a tacit check on any departure from Grant-Sahib's Dustoor and the public transaction of business according to certain forms prevented much bribery." (5 Nov., 1839)

"I think it a great pity, however necessary that we have been forced to depose him. To have ended the dynasty in his person, a considerable sacrifice even of state dignity might have been wise, and saved a world of mischievous gossip throughout India." (8 Jan., 1840)

२९. रो. क्र. ५ पृ. २०१ ता. १४-४-१८२२.

नियमबाह्य वर्तन करण्यास प्रारंभ केल्यावर त्याचे राज्य टिकेल असे अपेक्षिणे कठीण होते. पण ब्रिटिश सरकारच्या औदार्यामुळे व दयाळूपणामुळे हे राज्य त्याच्या घराण्यातच राहिले ही अत्यंत समाधानाची बाब असून तीमुळे सरकारचा मोठा नावलौकिक झाला आहे.[३०]

'बाळाजीपंतास सातान्यास पंतप्रधान म्हणून राहू दिल्यास ब्रिटिश सरकारवर मोठा ठपका येईल' असे ग्रँटचे स्पष्ट मत होते. (१०-२-४०). तरीही नवीन राजा आप्पासाहेब याचा दिवाण म्हणून बाळाजीची नेमणूक झाली. या नवीन राजाबद्दल तर त्याचे मुळीच चांगले मत नव्हते. "आप्पासाहेब हा एक दुर्व्यसनी, हेकट आणि बेशिस्त तरुण असून कितीही उपदेश केला तरी त्याच्या या सवयी जाणार नाहीत." असे त्याने म्हटले आहे.[३१]

राजा सर्वस्वी निर्दोषी आहे असे ग्रँटचे मुळीच मत नव्हते, जहागीरदारांवर आपला हक्क आहे हे प्रतापसिंहाचे म्हणणे त्याला मान्य नव्हते. १८१९ साली जेव्हा तहनामा झाला तेव्हा ग्रँटने राजाला आवर्जून सांगितले होते की या राज्यातील जहागीरदार हे राजाच्या अमलाखाली राहणार नाहीत. तसेच प्रत्येक गोष्ट ब्रिटिश सरकारच्या हुकुमाप्रमाणे झाली पाहिजे याची जाणीवही त्याला देण्यात आली होती. तो म्हणतो, "१८१९ च्या तहनाम्यातील, राज्याबाहेर होणाऱ्या पत्रव्यवहारासंबंधीच्या मूलभूत अशा ५ व्या कलमाची काळजीपूर्वक अंमलबजावणी झाली असती तर कोणताही गंभीर धोका उद्भवला नसता...मुंबईचा गव्हर्नर माल्कम किंवा सातान्याचा रेसिडेंट रॉबर्टसन यापैकी कोणीही तहाच्या ५ व्या

---

३०. बाळाजीचे एल्‌फिन्स्टनला पत्र, ता. २५-१०-१८३९.

"when such irregularities were resorted to by the Raja, it was scarcely expected that his Government would be continued, but the generosity and clemency of the British Govt. has preserved the state in his family, and it has been a source of gratification to the people at large and it has redounded to the high credit of Government."

३१. मराठी रिसायत उ. वि. भाग ३ पृ. ६१७ तळटीप.

कलमाचे उल्लंघन होत असल्याचे राजाच्या निदर्शनास आणून देऊ शकला नाही, आणि जे काही घडले ते त्यांच्या अतिरेकी दयाळूपणामुळेच होय."[३२]

(१०–२–१८४०)

प्रतापसिंहाच्या पदच्युतीने त्याला बेचैन केले होते. एवदा वैतागून तो एल्फिन्स्टनला लिहितो, "आज ५ जून १८४० रोजी मी अशी प्रतिज्ञा करितो की महाराजा प्रतापसिंहाच्या पदच्युतीसंबंधी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष असा एकही प्रश्न मी विचारणार नाही..बिचारा महाराजा !"[३३]

(५–६–१८४०)

१८४० ते १८४९ या काळात साताऱ्यासंबंधी काहीही चर्चा एल्फिन्स्टनशी त्याने केलेली दिसत नाही. तशी त्याने शपथच घेतली होती. पण पुढे जेव्हा सातारा राज्य कंपनी सरकारात विलीन केले गेले तेव्हा मात्र त्याला राहवेना, आणि साताऱ्यासंबंधीचा आपला दृष्टिकोन त्याने एका पत्रद्वारे एल्फिन्स्टनला कळविला. "जेथे त्याच्या हक्कांची पडछायादेखील पोहोचत नाही" अशा जहागीरदारांवर नियंत्रण ठेवण्याच्या राजाच्या दुराग्रहाबद्दल त्याने त्याची निर्भत्सना केली आहे. मात्र राजावरील अन्य आरोप त्याने मान्य केले नाहीत. तो म्हणतो, "शिपायांना फूस लावणे व गोवा सरकारशी संगनमत करणे हे आरोप पूर्णतया बनावट आहेत अशी माझी खात्री आहे. मी सारा पुरावा वाचला आहे, आणि

---

३२. " but so long as the 5th article of the treaty, the *fundamental article*, rregarding correspondence beyond his own boundry was watched and enforced there was no danger of anything going seriously wrong ... ... Malcolm was in something clever and imposing, and Archy Robertson is a sensible man, but the one in relaxing and the other in not remonstrating against that intringement of the 5th Article showed neither discretion not foresight. The Raja *owns* (?) much of what has happened to their injudicious kindness."

३३. " I do hereby certity this fifth day of June 1840 that I am about to put no question direct or indirect of or concerning Maharaj Pertab Seeva Chutrpatte, etc. Poor Maharaj !"

त्या माणसाचे चारित्र्य त्याच्या गुणदोषासह मला पूर्ण ज्ञात असल्यामुळे मी असे विधान करू शकतो. मुंबईचा गव्हर्नर रॉबर्ट ग्रँट म्हणतो त्याप्रमाणे राजा दोषी आहे असे जरी आपण गृहीत धरले तरी ज्या पद्धतीने सर जेम्स कॅरनॅक याने राजास पदच्युत केले ती पद्धती अत्यंत अयोग्य आणि अन्यायाची होती. राजाचे हक्क अबाधित राखण्याची तहात पूर्ण तरतूद होती, आणि त्याच्या हातून काही कमीजास्त घडले असते तर ती आमची चूक ठरली असती. अर्थात राजाने ब्रिटिश सत्तेला विरोध करण्याचा दृढ निश्चय केला असता तर त्याचे सार्वभौमत्व कायमचे नष्ट झाले असते. अशा परिस्थितीत ब्रिटिश मुत्सद्यांनी साध्या आणि सरळ प्रामाणिकपणाच्या मार्गाशिवाय दुसऱ्या कोणत्याही विचाराचा अंमल आपल्या धोरणावर होऊ द्यावयास नको.[३४]

प्रतापसिंहाला पुत्रसंतान नव्हते. त्याने चतरसिंह या आपल्या दुर्दैवी चुलत्याचा नातू बाळासाहेब भोसले यास दत्तक घेतले. इंग्रजांनी गादीवर बसविलेल्या आप्पासाहेबासही पुत्रसंतान नव्हते. त्यानेही शेडगावकर भोसले घराण्यातील भाऊसाहेब नावाच्या मुलास दत्तक घेतले. यामुळे सातारा प्रकरण ब्रिटिशांच्या दृष्टीने गुंतागुंतीचे झाले. साताऱ्याचे राज्य दत्तकपुत्राकडे जाऊ शकते किंवा नाही याच एका प्रश्नाभोवती साताराप्रकरण फिरत होते. हिंदुशास्त्रानुसार दत्तकविधान कायदेशीर असेल तर दत्तक वारसाचा राज्यावर हक्क निश्चित पोहोचतो. वास्तविक ही दोन्ही दत्तकविधाने कायदेशीर होती, पण ब्रिटिश अधिकारी ती कायदेशीर आहेत असे मानण्याच्या मन:स्थितीत नव्हते. त्यांनी घाईगडबडीने राज्याच्या विलीनीकरणाचा हुकूम काढला.

या दत्तकविधानावरील चर्चेच्या ओघात ग्रँट लिहितो, "या देशात प्रजेच्या दृष्टीने काय किंवा मांडलीकांच्या दृष्टीने काय कसलाही अयोग्य आणि गैरकारभार होणार नाही याची कायदेशीर आणि नैतिक जबाबदारी आपली आहे, असे मला वाटते आणि सद्य:स्थितीत दोन्ही भावांनी अनौपचारिकरीत्या दत्तक घेतले असल्यामुळे आपण कोणालाच मान्यता देऊ नये. तरी बाळासाहेब भोसले—जो सर्वात जवळचा वारस आहे, आणि योगायोगाने ज्याला प्रतापसिंहाने दत्तक घेतला आहे, त्याला मान्यता दिलीच

---

३४. ..as matters stand, British statesmen must not be swayed by any consideration except simple straitforward honesty. (10–1–1849)

पाहिजे."[३५] अर्थात ग्रँटचा सल्ला अधिकाऱ्यांनी कधीच घेतला नाही. पण आपले विचार तो एल्फिन्स्टनपुढे व्यक्त करून मनाचे समाधान करून घेत होता.

राज्यातील जहागिरदारांवरील नियंत्रणाचा राजाच्या हक्काचा वादग्रस्त मुद्दा एल्फिन्स्टनने मुद्दाम वगळला असे राजाच्या पक्षाचे म्हणणे होते, पण ग्रँटला ही विचारसरणी मान्य नव्हती. त्याने आपल्या पत्रात स्पष्टपणे म्हटले आहे की, राजाबरोबरच्या अगदी शेवटच्या भेटीत देखील अशा प्रकारच्या विचारापासून दूर राहण्याबद्दल आपण बजावले होते, आणि रेसिडेंटच्या संमतीशिवाय जहागिरदारांवर कोणताही अधिकार गाजवू नये, अशी विनंती केली होती. कारण ब्रिटिशांनी त्यांच्याशी स्वतंत्र करार केले होते.[३६]

---

३५. "I think we are legally, at all events morally responsible that no gross misgovernment shall be tolerated in the country either as regards subjects or feudatories, and under present circumstances, both brothers having informally adopted sons, we should admit neither, but recognize the nearest heir, although he happens to be our Raja's adoption, the son of Balasahib Bhonslay and grandson of the popular and unfortunate Chitur Sing." (10-1-49)

३६. "There is one thing essential to be recollected in the Raja's case which his partisans, I mean the really honest of them, always overlook when proclaiming his innocence, namely that his having any right to the Jagheers within his boundary was purposely excluded by you in framing the Treaty, and the Raja was on this point most carefully and semi-publicly instructed by me— assured that if he behaved well some of them would ultimately to his best.....at my *very last* interview I begged of him not only to abstain from pressing such claims, but also from grasping

अशा बिकट परिस्थितीत आपण जर सातान्याचा रेसिडेंट अथवा अन्य अधिकारी असतो तर काय केले असते, असा प्रश्न स्वतःलाच विचारून त्याचे उत्तर शोधण्याचा त्याने प्रयत्न केला आहे. ब्रिटिश सरकारने मान्य केलेला सल्ला जर रेसिडेंटने दिला असेल तर राजाला तो मान्य करावा लागेल हे आपण स्पष्ट केले असते. तसेच करारातील एखाद्या कलमाचे उल्लंघन झाले असल्यास, राजाची बाजू रेसिडेंटने सांभाळून घेतली पाहिजे असे तो मानीत होता. जहागिरदारांशी केलेल्या कराराशी विसंगत अशी राजाची वर्तणूक असती आणि जर तो संपूर्णतया अविवेकी आणि बेताल बनला असता तर त्याच्या मालकीची सारी कोकणपट्टी जप्त करून आपण त्याला वठणीवर आणले असते, आणि हे कृत्य करारातील कलमांना आणि या देशातील रूढीला धरून झाले असते.[३७]

१८१९ च्या तहनाम्याचे ततोतंत पालन झाले पाहिजे असे ग्रँट राजाला आवर्जून सांगत असे. राजाला दोष देण्यापूर्वी आपण तरी कराराचे पालन केले आहे का असा प्रश्न स्वतःलाच विचारला पाहिजे असे त्याचे मत होते. तो म्हणतो, " जर राजा दोषी ठरला होता नि त्याला पदच्युत करण्याचे ठरले होते तर त्याच्या भावाला गादीवर बसविणे हे त्या

---

at any authority over the feudatories with whom we had separate engagements except through the Resident." (10-1-49)

३७. " The Raja is bound to act in Subordinate Co-operation and to listen to such advices of the Resident at his Court as the British Govt. may dictate or approve and it is a part of the Resident's duty to protect the Raja in case of any infringement and at least successfully remonstrate and resign should his rights be unjustly invaded–but if the Raja had become, as in the case his most improper claim to Jagher guaranteed by us or within our boundary utterly unreasonable and unmanageable, I would have zufted the whole Concan and brought him to his senses, perfectly justifiable by the terms of the Treaty and the usage of the country." (10-1-49.)

तहातील अटीशी विसंगत आहे. पण प्रत्यक्षात तसे घडले आहे. सद्यः-स्थिती लक्षात घेता, हा सारा प्रदेश ब्रिटिश सरकार आपल्याकडे घेऊ शकत नाही. तसेच आप्पासाहेबाच्या दत्तकाला मंजुरी देणे हेही काही शहाणपणाचे ठरणार नाही. कारण अगदी जवळच्या नात्यातील आणि लोकप्रिय असलेल्या घराण्यातील व्यक्तीला नाकारून आप्पासाहेबाच्या दत्तक मुलाला गादीवर बसविण्याचा अधिकार आपल्याला नाही."[३८]

एल्फिन्स्टनला लिहिलेल्या या खाजगी पत्रावरून ग्रँटला सातारा प्रकरणातील ब्रिटिशांची भूमिका मान्य नव्हती, हे उघड आहे. त्याची खात्री होती की ब्रिटिशांनी राजाला विश्वासात घेतले असते आणि अधिक सहानुभूतिपूर्वक भूमिका घेतली असती तर इंग्रजांबद्दल त्याचे मन कलुषित झाले नसते, आणि ब्रिटिश मुत्सद्देगिरीला लाजिरवाणी ठरलेली ही आपत्ती टाळता आली असती.

पण या साताराप्रकरणी ब्रिटिश अधिकाऱ्यांनी ग्रँट डफ आणि एल्फिन्स्टन या दोन साताऱ्याशी निगडीत असलेल्या अधिकाऱ्यांचा विचार का घेतला नाही हे एक गूढच आहे.

---

३८. "If the Raja's guilt had been proved and it had been determined to depose him, the Brother should never been recognized on the terms of the Treaty, but as such has been done, they cannot resume the territory under present circumstances, not would it be politic to recognize Appasahib's adoption when so near a relation and of such a popular family was set aside." (10-1-49)

## ६

# पूर्वसूरींचे ऋण

मराठ्यांच्या प्रदेशात दीर्घकाल वास्तव्य करून राहिल्यान माऊंट-स्टुअर्ट एल्फिन्स्टनच्या मनात या लोकांचा इतिहास लिहिण्याचा विचार येणे स्वाभाविक होते. १८०१ साली तो प्रथम पुण्यास रेसिडेंटचा साहाय्यक म्हणून आला. १८०३ च्या आंग्ल-मराठा युद्धात तो जनरल वेलस्ली (ड्यूक ऑफ वेलिंग्टन) चा एक राजकीय साहाय्यक (Political Assistant) म्हणून त्याने काम केले. वऱ्हाडच्या राजाचा रेसिडेंट, शिंद्यांचा रेसिडेंट, काबूल येथील ब्रिटिशांचा राजदूत अशा निरनिराळ्या भूमिका वठवून पुढे १८११ साली तो पुण्याचा रेसिडेंट बनला. पेशवाईचा अस्त झाल्यावर १८१८–१९ हे एक वर्ष दक्षिण विभागाचा कमिशनर म्हणून त्याने काम केले, आणि पुढे १८१९–२७ पर्यंत त्याने मुंबईचे गव्हर्नरपद भूषविले. थोडक्यात १८०१ ते १८२७ या पाव शतकाहून अधिक अशा कालखंडात त्याचे वास्तव्य महाराष्ट्राच्या परिसरात असल्या-मुळे या मराठ्यांची ओळख करून घ्यावी अशी जिज्ञासा त्याच्या मनात निर्माण झाल्यास नवल नव्हते.

विशेषत: १८१९ साली जेव्हा त्याने पेशव्यांकडून जिंकून घेतलेल्या प्रदेशासंबंधीचा अहवाल प्रसिद्ध केला तेव्हापासून या विचाराने त्याच्या मनात मूळ धरले असले पाहिजे. पण कार्यबाहुल्यामुळे आपल्या योजना पूर्ण करणे त्याला शक्य झाले नाही ही एक अत्यंत दुर्दैवी घटना होय असे ग्रँट म्हणतो. कागदपत्रांचा उपसा करीत असताना आपल्या मनात इतिहासलेखनाचे विचार कसे डोकावू लागले हे भीत भीत एल्फिन्स्टनला सांगण्याचा जेव्हा त्याने प्रयत्न केला (१९–७–१८१८) तेव्हाच त्याला एल्फिन्स्टनच्या मनात काय होते ते समजले. एल्फिन्स्टन हा किती मोठ्या मनाचा पुरुष होता हे ग्रँटला उलट टपाली धाडलेल्या अभिनंदनपर, प्रोत्साहनाच्या पत्रावरून सहज दिसून येईल. या त्याच्या पत्रावरून मराठ्यांच्या इतिहासाची व्याप्ती आणि त्याचे निवेदन कसे करावे याचा १८१९ पूर्वीच त्याने पूर्ण विचार केला असला पाहिजे हे स्पष्ट होते.

" मुघल साम्राज्याचा अस्त आणि आमच्या सत्तेचा उदय या दोन बिंदूं-मधील भागात मराठ्यांचा इतिहास समाविष्ट आहे, आणि त्याच्या विवेचनाचे हेच स्वीकृत तत्त्व (Professed object) असावे.[१]

मराठ्यांच्या इतिहासाचे काम ग्रँटनेच करावे असे विधिलिखित असावे. एल्फिन्स्टनच्या मराठ्यांच्या इतिहासाबद्दलच्या योजनेची पुसट देखील कल्पना त्याला नसावी. सातान्याचा पहिला पोलिटिकल एजंट म्हणून नेमणूक झाली तेव्हा ग्रँटच्या स्वप्नात सुद्धा नसेल की मराठ्यांचा इतिहास आपल्याकडून लिहिला जाणार आहे. अशी एक समजूत दृढ झाली होती की एल्फिन्स्टननेच हे इतिहासलेखनाचे काम ग्रँटकडे सोपविले होते. एल्फिन्स्टनचा चरित्रकार कॉटन म्हणतो, "आपला मित्र आणि पूर्वीचा सहकारी कॅप्टन ग्रँट डफसाठी त्याने मराठ्यांच्या इतिहासाचा त्याग केला. ग्रँटला त्याने या कामी खाजगी आणि सरकारी साधनांचे संदर्भ सांगून मदत केली, आणि त्याची पहिली प्रकरणे काटेकोरपणे पण सहानुभूती दाखवून वाचून दिली.[२] पण खालील विधान संपूर्ण सत्य दर्शविणारे नाही हे दोघांमधील पत्रव्यवहारावरून सहज कळून येईल.

ऐतिहासिक साधनसामुग्रीवर लक्ष असावे, तिचे संपादन करावे अशी सूचना ग्रँटला करण्यात आली होती ती कदाचित आपण इतिहासलेखन करणार आहोत या रहस्याचा स्फोट न करता, पण प्रामुख्याने त्याच हेतूने असावी. परंतु पहिले वर्ष सव्वावर्ष त्याला या सूचनेचा विचार करण्यास हवी तशी उसंत मिळाली नाही. अनेक निकडीचे प्रश्न निकालासाठी खोळंबून

---

१. एल्फिन्स्टनचे ग्रँटला पत्र, ता. २०-७-१८१९.

" A Maratta history would embrace the downfall of the Mughal Empire and the rise of our own as well as that, which is its professed object to treat."

२. Rulers of India–Mountstuart Elphinstone by J. S. Cotton (Oxford 1892).

" The history of the Marathas he resignd in favour of his friend and assistant captain Grant Duff whom he assisted with references to public and private documents and whose early chapters he subjected to a critical but sympathetic treatment."

बसले होते. त्यामुळे ऐतिहासिक साधनसामुग्रीच्या संपादनाचा विचार देखील त्याच्या मनाला स्पर्श करू शकत नव्हता. १८१९ च्या जुलै महिन्यात या कामाकडे लक्ष पुरविण्यास थोडीशी सवड मिळाली. सातान्यात येऊन वर्ष लोटले होते, सारी जरुरीची कामे हातावेगळी झाली होती. शिवाय जुलैचा महिना ऐन पावसाळ्याचा असल्यामुळे राज्यातील कामकाजानिमित्त होणाऱ्या दौऱ्याचे काम स्थगित होते ही संधी साधून आपल्या सहकाऱ्यांसह सतत तीन रात्री त्याने जागून काढल्या आणि राजाचा सारा दप्तरखाना धुंडाळला आणि असे करीत असताना मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे भांडारच त्याला गवसले होते.

या इतिहासलेखनामागचे रहस्य सांगताना ग्रँटने प्रस्तावनेत नमूद केले आहे, "वास्तविक मराठ्यांच्या इतिहासलेखनाची धुरा एल्फिन्स्टन साहेबांनी उचलावयाची. परंतु पुण्याहून अचानक मुंबईला बदली झाली नसती तर कदाचित हे काम त्यांनी पत्करलेही असते. एल्फिन्स्टन आणि सर थॉमस मन्रो यांच्या सल्ल्यानुसार साधने जमविण्यास मी प्रारंभ केला. या संधीचा फायदा घेतला नसता, तर एका असामान्य अशा सत्तेच्या इतिहासाच्या साधनांना आपण मुकलो असतो, या लोकांचा इतिहास नंतर लिहिला गेला असता तर तो वरवरचा आणि उथळ (superficial) असा झाला असता. साधने गोळा करीत असताना, आणि आपल्याला नेमके काय हवे आहे हे जाणून घेण्याकरिता मला त्यांची जुळवाजुळव करावी लागे."[3]

१६४९ ते १७२५ या मराठी सत्तेच्या उत्कर्षाच्या काळातील अनेक अस्सल फार्सी, मराठी कागद त्याच्या हाताशी लागले. त्याची यादी ग्रँटने पुढीलप्रमाणे दिली आहे—

(१) अथपासून इतिपर्यंत चिटणीसांनी रचलेला मराठ्यांचा इतिहास. या बहुधा चिटणीसी बखरी असाव्यात.

(२) १६४९ ची शहाजहानची फर्माने.

(३) १६५६ ते १६६६ या काळातील औरंगजेबाची गादीवर येण्यापूर्वीची आणि नंतरची महत्त्वाची पण गुप्त ठेवलेली पत्रे.

(४) १७०७ चे औरंगजेबानंतरच्या बादशाहाचे पत्र.

---

३. ग्रँट डफ : प्रस्तावना पृ. xxxviii.

(५) १७१८ सय्यद हुसेन अलीखान याचा अमीर उल उमरावशी झालेला पत्रव्यवहार– त्याचा वकील शंकराजी मल्हार याच्या मार्फत मराठ्यांशी सय्यदबंधूंच्या साहाय्यार्थ दिल्लीकडे कूच करण्यासंबंधीच्या वाटाघाटीचे वृत्त, तहनामा आणि मूळ छापाच्या चिठ्ठ्या.

(६) मुहम्मदशहाने दिलेल्या सनदा. १७१९ साली बाळाजीने आणलेल्या स्वराज्य, चौथाई आणि सरदेशमुखीच्या या तीन सनदा एल्फिन्स्टनने पाहिल्या होत्या.

(७) १७१९–१७२५ मुहम्मदशहाची पत्रे, दक्षिणेचा सुभेदार दिम्मतखान याची पत्रे, पेशव्यांची महत्त्वाची पत्रे, शिवाजीची दोन पत्रे, विजापूर आणि हैद्राबाद या दोन राज्यांना लिहिलेली सहानुभूतीची पत्रे, कोल्हापूरचा तहनामा, निजाम आणि मलिक यांची १७१८ ची मूळ ताकीद पत्रे, इत्यादि.

या साऱ्या यादीवरून डोळे फिरवीत असताना त्याच्या मनात मराठ्यांच्या इतिहासाची कल्पना जोमाने मूळ धरू लागली. तो म्हणतो, “ काही दिवसांपूर्वी मराठ्यांच्या इतिहासावर आपण काही प्रकाश टाकावा अशी कल्पना माझ्या मनात आली होती. आज माझ्या हाती ही जी साधनसंपत्ती आहे, आणि इतर साधने यांच्या साहाय्याने या देशाला निकडीने हवा असा वृत्तान्त मला देता येईल असे मला वाटू लागले आहे. ”[४]

अर्थात असा विचार मनात आला म्हणून तो आपल्या हातून तडीस जाईल याची त्याला खात्री नव्हती. आपल्या मर्यादांची त्याला जाणीव होती. आणि म्हणूनच आपल्या मनात उठलेले हे तरंग उघडपणे बोलून दाखविण्याचे त्याला धाडस होत नव्हते. एल्फिन्स्टनला तो लिहितो की, “ माणसाच्या आयुष्यात अशी एक वेळ येते की जेव्हा त्याला

---

४. ग्रँटचे पत्र, ता. १९–७–१८१९

“ A long time ago I had a floating idea of throwing some light on Maratha History, the possession of such materials and some other sources of information enable me to authenticate a great deal of what immediately concerns this country.”

महत्त्वपूर्ण निर्णय घ्यावे लागतात. माझ्या मनाची पूर्ण तयारी झाली आहे आणि नंतर मी आपला सल्ला घेतो आहे असे कृपया मानू नका. तेव्हा मला निःसंकोचपणे सांगा की मी हे काम हाती घ्यावे असे तुम्हाला वाटते का? तसे नसेल तर माझा हा विचार मी आपल्या पुरताच खाजगी ठेवीत आहे."[५]

एल्फिन्स्टन कदाचित् आपल्याला या कामापासून परावृत्त करील असे ग्रँटला वाटत होते, आणि म्हणूनच भीतभीतच त्याने आपले अंतःकरण मोकळे केले होते. पण तसे व्हावयाचे नव्हते. अगदी उलट टपाली त्याने त्याला उत्तेजनपर पत्र धाडले. तो म्हणतो, "ऐतिहासिक कागदपत्र जमविण्याच्या कामी तू जी महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहेस ती वाचून मला अतिशय आनंद झाला. पण त्याहून अधिक आनंद झाला तो हे सारे सुसंगतपणे मांडण्याची तुझी इच्छा आहे हे वाचून. तेव्हा माझी तुला कळकळीची विनंती आहे की हे काम तू करावेस. तुला उपलब्ध असलेल्या सवलतींच्या निम्म्यानेही सवलती मला जेव्हा नव्हत्या तेव्हा मी या प्रश्नाचा गंभीरपणे विचार करीत होतो.[६]

मराठ्यांच्या इतिहासाचे अंकुर हे असे १९ जुलै १८१९ रोजी फुटले, आणि १२ जानेवारी १८२३ रोजी भारताचा किनारा सोडताना, अनेक साथीदार आणि तज्ञ मंडळी यांनी पाहून दुरुस्त केलेला असा त्याचा पहिला कच्चा मसुदा तयार झाला.

---

५. ग्रँटचे पत्र, ता. १९-७-१९.

"This is as important consideration as can occur in a man's life time and I am not asking advice after I have made up my mind—tell me candidly if you think I ought to undertake it—if so—I should like to keep my purpose private."

६. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २०-७-१९.

"I am delighted with your progress in the historical collections, and still more with your intention of putting them in order. I certainly do advice you most earnestly to do so. I thought of it very seriously when I had not half such good opportunities."

एखाद्या प्रदेशावर आपल्याला राज्य करावयाचे असेल तर त्या प्रदेशाची आपल्याला पूर्ण माहिती पाहिजे. तेथील लोकांचा इतिहास, चालीरीती या गोष्टी ज्ञात झाल्या तर त्या लोकांच्या भावना न दुखविता आपल्या राज्याला हवा तसा पाठिंबा मिळविता येतो, त्यांची सहानुभूती आणि विश्वास संपादन करता येतो अशी ब्रिटिश अधिकाऱ्यांची धारणा असावी, आणि त्यातून महाराष्ट्र, म्हैसूर, राजस्थान, मध्यप्रदेश वगैरे प्रांतांचे इतिहास १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात तयार झाले असावेत. मराठ्यांच्या इतिहासाची आवश्यकता प्रतिपादन करीत असताना तो म्हणतो, " आपल्या पूर्वीचे भारताचे राज्यकर्ते, ज्यांना आपण नुकतेच जिंकले होते असे हे मराठे यांच्या सत्तेचा उदय, विकास आणि अस्त या गोष्टींचा साद्यंत इतिहास, हिंदुस्थानच्या परिस्थितीची ज्यांना माहिती करून घ्यावयाची असेल त्यांना ज्ञात असणे आवश्यक आहे. तसेच या प्रदेशात आपण इतके विस्तृत साम्राज्य कसे प्रस्थापित करू शकलो हे समजण्यासही या इतिहासाची आवश्यकता आहे हे सर्वसामान्यपणे मानले जाते."[७]

मराठ्यांच्या इतिहासाचे स्वरूप फारच व्यापक आहे. त्यामुळे अथपासून इतिपर्यंत मराठ्यांच्या इतिहासलेखनाच्या मार्गात अनेक अडचणींना तोंड देणे भाग होते. साधने अपुरी, आणि नेहमीच विश्वासार्ह अशी नव्हती. आपल्या पूर्वी ज्यांनी प्रयत्न केले त्यांचा ग्रँटने आदरपूर्वक उल्लेख केला आहे. ऑर्मच्या फ्रॅगमेंटस् (Fragments) या भरीव स्वरूपाच्या संशोधनात्मक हिंदुस्थानच्या इतिहासात मराठ्यांच्या इतिहासाचा भाग कमी आहे याचे कारण, साधनांच्या अपुरेपणामुळे विस्तृत इतिहास लिहिण्याचे धाडस तो करू शकला नाही.

---

७. Grant Duff. Vol. I, p. lxxxvi.

" The want of a complete history of the rise, progress and decline of our immediate predecessors in conquest, the Mahrattas, has been long felt by all persons conversant with the affairs of India; in so much, that it is very generally acknowledged, we cannot fully understand the means by which our own vast empire in that quarter was acquired, untilthis desideratum be supplied."

रॉबर्ट ऑर्म (१७२८–१८१०) हा मुंबई येथील सर्जन जॉन ऑर्म याचा मुलगा होय. अनजेनगो (त्रावणकोर) येथे १७२८ मध्ये याचा जन्म झाला. १७४४ साली ईस्ट इंडिया कंपनीत याने कारकुनी पत्करली. कलकत्ता, मद्रास येथे नोकरी करून १७५३ साली लॉर्ड क्लाईव्ह बरोबर तो लंडनला गेला. क्लाईव्हशी त्याचे संबंध मित्रत्वाचे होते. १७५५ साली तो भारतात परत आला आणि मद्रासमध्ये गव्हर्नरच्या कौन्सिलचा सदस्य म्हणून त्याची नेमणूक झाली. १७५५–५९ या कालखंडात कंपनीने कर्नाटकात केलेल्या लष्करी हालचालींशी त्याचा निकटचा संबंध होता. पुढे १७५९ साली प्रकृतीच्या सबबीवर तो इंग्लंडला परतला आणि पुढील सारे आयुष्य त्याने इतिहासलेखनात घालविले. १७४५ पासूनच्या ब्रिटिशांच्या लष्करी हालचालींचा तीन खंडांत १७६३ ते १७७८ या काळात प्रसिद्ध केला. ईस्ट इंडिया कंपनीचा इतिहासलेखक (Historiographer) म्हणून सालीना ४००० पौंडावर त्याची नेमणूक झाली. तो १८१० साली मरण पावला.[८]

इतिहासलेखक म्हणून काम करीत असताना, त्याने अत्यंत परिश्रमाने 'फ्रॅगमेंटस' हा संशोधनपर इतिहासग्रंथ लिहिला. यात शिवाजीपासून संभाजीपर्यंतच्या इतिहासाचा भाग मोगलांच्या इतिहासाच्या संदर्भात आला आहे, त्यामुळे मराठ्यांच्या इतिहासाला यात दुय्यम स्थान आहे. सतराव्या शतकातील एक प्रसिद्ध प्रवासी डॉ. जॉन फ्रायर, १६७२ ते १६७७ या काळात भारतात होता. त्याने मराठ्यांच्या राज्याचा संस्थापक म्हणून शिवाजीचा उल्लेख केल्यामुळे त्याच्या कार्याकडे आपले लक्ष गेले असे ऑर्मने म्हटले आहे. ऑर्मचा इतिहास १६५९ पासून सुरू होतो. १६५९ साल हे मराठ्यांच्या इतिहासाला कलाटणी देणारे वर्ष आहे. ऑर्मने संभाजीच्या शौर्याचे उल्लेख करून आपले निवेदन संपविले आहे. "तुझी मुलगी दिलीस तर धर्मांतर करीन" असे संभाजीने औरंगजेबाला दिलेले उत्तर यात आले आहे.

ऑर्मच्या पुस्तकातील मराठ्यांचा इतिहास एकतर अपुरा आहे, आणि अस्सल साधनांवर आधारित नाही. तेव्हा मराठ्यांच्या इतिहासलेखनाच्या संदर्भात त्याचा विशेष उल्लेख करण्याची गरज नाही.

---

८. Orme's Historical Fragments of the Mughal Empire, of the Morattoes and of the English Concerns in Indostan. (London, 1782).

ऑर्मचा इतिहास प्रसिद्ध झाल्यानंतर सुमारे ९ वर्षांनी जर्मनीतील हॅले विद्यापीठातील इतिहासाचे प्राध्यापक स्प्रेंगेल एम्. सी. याने १७९१ साली पहिला मराठ्यांचा इतिहास लिहिला असे म्हणावे लागेल. या ग्रंथात शिवाजीपासून १७ मे, १७८२ पर्यंतचा म्हणजे पहिल्या अँग्लो-मराठा युद्धापर्यंतचा—सालबाईच्या तहापर्यंतचा इतिहास यात आला आहे. पहिल्या प्रकाशकाने या पुस्तकाचे फॉर्म्स दुसऱ्याला विकले असावेत असे वाटते. हे पुस्तक विशेष लोकप्रिय झाले नसावे. कारण १८१४ साली हे पुस्तक प्रकाशकाचे नाव बदलून बाजारात आलेले आहे. स्प्रेंगेलच्या इतिहासात प्रामुख्याने इंग्रजी साधनांचा वापर केला आहे. यात ऑर्म, फायर, कंपनीचे अहवाल इत्यादि सुमारे ३९ ग्रंथांचा आणि इंग्रजी खेरीज अन्य युरोपीय भाषांतील सुमारे २४ ग्रंथांचा आधार घेतल्याचे नमूद केले आहे. केर (Kerr) च्या १७८२ साली लिहिलेल्या मराठ्यांच्या हकीकतीची छाननी करून तो ग्रंथ त्याने त्याज्य ठरविला आहे.

"मराठ्यांच्या इतिहासाची इतकी अपुरी आणि सदोष साधने असताना माझा हा इतिहास जर्मन लोकांचे लक्ष वेधून घेऊ शकेल का याबद्दल मी साशंक आहे. माझ्या मते, युरोपात आजपर्यंत मराठ्यां-विषयी आणि त्यांच्या विशेष लक्षणीय क्रांतीविषयी जी माहिती उपलब्ध आहे तिचा विचार प्रस्तुत इतिहासात केला आहे" असे निवेदन स्प्रेंगेलने केले आहे.[९]

स्प्रेंगेल भारतात केव्हाही आला नव्हता. आज त्या पुस्तकाचे महत्त्व नसले तरी खऱ्या अर्थाने केवळ मराठ्यांचा इतिहास निवेदन करणारे युरोपीय भाषेतील पहिले पुस्तक म्हणून त्याचे ऐतिहासिक महत्त्व मान्य करावे लागेल. तसेच उपलब्ध साधनांची चिकित्सा करून आधारभूत असा इतिहास स्प्रेंगेलने लिहिला असल्यामुळे शास्त्रशुद्ध इतिहासलेखनाच्या दृष्टीने देखील त्याचे महत्त्व आहेच. स्प्रेंगेलच्या इतिहासाची नोंद नंतरचे मराठ्यांचे इतिहासकार स्कॉट वेअरिंग अथवा ग्रँट डफ यांनी घेतली नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे.

---

९. History of the Marathas upto the last treaty with England on May 17, 1782 ( 288 pages ) by M. C. Sprengel, Prof. History at Halle Gegel Press and Bookstore, 1791. या ग्रंथाचा परिचय भाइसंमं वर्ष ४ शके १८४५–४६ मध्ये शीलवती केतकरांनी करून दिला आहे ( पृ. १०७–१५ ).

मराठी साधनांवर विशेष भर देऊन मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचा मान स्कॉट वेअरिंग या इंग्रजाने पटकाविला आहे. पुण्यातील कंपनीच्या वकिलातीत सात वर्षे काढल्यामुळे मराठ्यांच्या इतिहासाच्या स्थानिक साधनांचा परिचय त्याला झाला होता, आणि त्यांचा उपयोग करून मराठे आणि दक्षिणदेश यांचा इतिहास इंग्रजांपुढे मांडावा असे त्याला वाटले, आणि १८१० साली, म्हणजे स्प्रेंगेल नंतर १९ वर्षांनी हा इतिहास प्रसिद्ध झाला.[१०]

स्कॉट वेअरिंगने आपले पुस्तक ईस्ट इंडिया कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना अर्पण केले आहे. या ग्रंथाच्या प्रारंभी सुमारे १०० वर्गणी-दारांची (List of subscribers) अशी एक यादी दिली आहे. त्यात एल्फिन्स्टनचे नाव आहे, पण ग्रँटचे नाव नाही. हे पुस्तक बहुधा या वर्गणीदारांपुरतेच मर्यादित असावे.

"वाचकांच्याकडून माझ्या प्रयत्नांना दाद मिळावी अशी प्रार्थना करणे मला आवडत नसले तरी त्यांच्या मतापुढे मी सदैव मान तुकवीन."[११] असे नमूद करून भीतभीतच हा इतिहास वाचकांना त्याने सादर केला आहे. या प्रयत्नाला फारसे यश येईल असा आत्मविश्वास त्याला वाटत नव्हता. विस्तृत प्रमाणावर माहिती पुरवून काही जिज्ञासूंच्या अपेक्षा पूर्ण करू शकत नाही याची त्याला कल्पना होती. पण तरी देखील तो म्हणतो की साधने मिळविण्यासाठी लागणाऱ्या श्रमांची तमा न बाळगता, शक्य तेवढी साधने जमा करून विवेचनाला पूर्णता आणण्याचा आपण प्रयत्न केला आहे. अर्थात हा प्रयत्न फसला आहे असे म्हणणारेही काही वाचक निघतील याची त्याला कल्पना होती.

आपल्या हाती आलेली साधने साररूप आणि लोकांना आवडतील अशा लक्षवेधी घटनांचा त्यात अभाव असल्याने आपला प्रयत्न मर्यादित

---

१०. History of the Mahrattas to which is prefixed an Historical Sketch of the Deccan Containing A short Account of the Rise and Fall of the Mooslim sovereignties prior to the Era of Mahratta Independence by Edward Scott Waring (London, 1810).

११. "I now deliver this work to the public unwilling to deprecate its judgement yet ready to submit to its decision." Scott Waring. Preface xii.

स्वरूपाचा झालेला आहे असे तो म्हणतो. "परंतु मराठ्यांचे एकेकाळी महान राष्ट्र होते. ते उदयाला कसे आले आणि त्यांचा अस्त कसा झाला याचा तपास करणे म्हणजे एक आव्हान स्वीकारणेच होय"[१२] अशी कबुली त्याने दिली आहे.

फार्सी साधने आणि मराठी साधने याची आपल्यापरीने त्याने साधकबाधक चर्चा केली आहे. मुसलमान इतिहासकारांत निःपक्षपातीपणे आणि अचूक माहिती देणारा एकच इतिहासकार झाला आणि तो फेरिस्ता होय असे त्याने आपले मत व्यक्त केले आहे. कॅप्टन जोनॅथन स्कॉटचे फेरिस्ताचे भाषांतर आपल्या ग्रंथाची पहिली दोन प्रकरणे लिहिण्यासाठी त्याने वापरली आहेत. इतर मुसलमान इतिहासकार, त्यांच्या जमातीचा हिंदूंशी वैरभाव असल्यामुळे साहजिकच मराठ्यांच्या कार्याचे मूल्यमापन आवश्यक तितक्या निःपक्षपातीपणाने त्यांच्याकडून होत नाही, त्यांची माहिती ही अनेक वेळा गाळीव आणि भ्रष्ट स्वरूपाची असते; मराठ्यांना दोष देणारा थोडासा जरी आधार मिळाला तरी त्याचा खूप विस्तार केला जातो, असे आपले विचार त्याने मांडले आहेत. त्यांची शैली एकप्रकारे सदोषच आहे. ओढूनताणून अकृत्रिमपणे वापरलेल्या प्रतिमा, विपुलपणे आढळणारे वाक्यातील चढउतार, बोचक वाक्प्रचार इत्यादि त्यांच्या लिखाणाची वैशिष्टये अभिरुचीच्या माणसाला कंटाळवाण्या वाटतात. शिवाय ऐतिहासिक सत्यालाही त्या बाधक आहेत. इतिहासाची रचना काव्यात केली तर वृत्त, गण, मात्रा साधण्यासाठी काही गोष्टींचा त्याग अनिवार्य असतो. फार्सी इतिहास हे जरी काव्य या सदरात मोडत नसले तरी काव्याचे सारे दोष तेथे आढळतात. विचित्र उपमा आणि कृत्रिम भाव-विरोधात्मक वाक्ये यांच्या वैपुल्यामुळे आणि अनावश्यक अशा विशेषणांमुळे वाचकाचे मन द्विधा होते, तो गोंधळतो, असे विचार त्याने फार्सी साधनांच्या बाबतीत मांडले आहेत.[१३]

---

१२. Yet the Mahrattas were once a mighty nation, how they rose, and how they fell, may surely challenge enquiry. Preface p. viii.

१३. Ferishta, who composed a general history of India, as well as a particular history of the Deccan, is almost the only historian who merits the praise of impartiality and accuracy.. ...The Mooslims, of course, view with animosity and

आपल्या पुस्तकात फार्सी हस्तलिखित (MSS) असा जेथे तळटीपेत त्याने उल्लेख केला आहे तेव्हा त्याला नेमके कोणते हस्तलिखित अभिप्रेत आहे हे समजत नाही. मात्र या पुस्तकाच्या परिशिष्टात ज्या विस्तृत टीपा त्याने दिल्या आहेत, त्यात या हस्तलिखितांचा उल्लेख आला आहे. त्यावरून यात बुंदेलाराजा दलपतराय याचा वृत्तान्त, अली इब्राहिमखान या बनारसच्या न्यायाधिशाने १७८६ साली लिहिलेला मराठ्यांचा इतिहास दक्षिणेकडील दंतकथा इत्यादींचा समावेश असावा असे वाटते. फेरिस्तांप्रमाणेच त्याने खाफीखान, सियरुल मुताखरीनचे मुस्ताफाकृत इंग्रजी भाषांतर, इत्यादी फार्सी साधने वापरली होती.

पण त्याचा प्रामुख्याने भर हा मराठी साधनांवर आहे. मराठी साधने ही फार्सी साधनांपेक्षा श्रेष्ठ आहेत हे पटवून देताना तो लिहितो, " मराठ्यांचे इतिहासग्रंथ हे फार्सी इतिहासाप्रमाणे नाहीत. त्यांचे इतिहासकार (काहीजण त्यांना इतिहासकार असे मानण्यास तयार होणार नाहीत.) आपले निवेदन साध्या, सोप्या आणि अकृत्रिम शैलीत करतात. अतिशयोक्तिपूर्ण वाक्प्रचार अथवा अवजड अलंकारिक प्रतिमांचा वापर न करता गतकालातील घटना समर्पक शब्दांत मांडण्यात त्यांना समाधान वाटते...

---

anguish, the progress the Mahrattas have made in the conquest of their fairest provinces:–

From such little that was favourable to the Mahratta character could be expected. The facts they give are garbled and perverted, while the slightest circumstance against them is seized upon, and extended to an immeasurable length. Their style is also a subject of just reprehension. Their forced and unnatural images, their swelling cadences, and modulated phraseolosy, are as disgusting to a discriminating taste, as they must be inimical to historical truth. For in a history composed in verse, something will be sacrificed to measure, and much to rhyme. Although the Persian histories be not written in verse, yet they partake of all its faults. They abound in quaint similes, and forced antithesis, while the redundancy of their epithets distract and be wilder attention. **Preface p. ix.**

जय पराजय या दोन्ही घटना त्यांनी थोडक्यात सांगितल्या आहेत. आपल्या पराजयाचे वर्णन ते संक्षिप्तपणे करतात असे म्हटले तर आपल्या विजयाचे वर्णनसुद्धा अनावश्यक तपशील देऊन ते लांबवीत नाहीत हेही खरे आहे. वाचकाचा काही ग्रह बनावा अथवा त्यांची दिशाभूल करावी यासाठी ते प्रयत्न करीत नाहीत. पण कालसंगति आणि ऐतिहासिक विवेचन याबाबतीत मात्र त्यांचे निवेदन फारच तोकडे असते. मी त्यांच्या साधनांचा योग्य वापर केला आहे किंवा नाही हे सांगणे कठीण आहे, मला माझ्या मर्यादांची जाणीव आहे, तसेच माझ्या साधनांच्या उणीवांच्या बाबतीतही मी अज्ञानी नाही आणि तरीसुद्धा कसलाहि अभिनिवेश न बाळगता मला असे म्हणावेसे वाटते की माझ्याकडे मुख्य जमेची बाजू कोणती असेल तर ती ही की ज्या प्रकारची साधने अस्तित्वात असतील याचीही आतापर्यंत कोणाला कल्पना नव्हती अशा मूळ साधनांच्या साहाय्याने मराठ्यांचा इतिहास पहिल्यांदा या ग्रंथात मांडला आहे."[१४]

अर्थात असे विधान करीत असताना, ऑर्मच्या कार्याचा त्याला विसर पडलेला नव्हता. पण अस्सल आणि विपुल अशा मराठी साधनांचा वापर

---

१४. " Not so the Maratta histories. Their historians ( some will deny them the name ) write in a plain, simple and unaffected style, content to relate passing events in opposite terms, without seeking turgid imagery or inflated phraseology, . Victory and defeat are briefly related; if they pass over the latter too hastily, they do not dwell upon the former with unnecessary minuteness. They do not endeavour to bias or mislead the judgement, but are certainly greatly deficient in chronology and in historical reflections. Whether I have done justice to their works I am at a loss to determine, aware of my own incompetency, and not ignorant of the deficiency of my materials. Yet, without arrogance, I may assume the merit of having been the first to present the reader with a connected history of the Marattas, and sources till lately not known to have existed. "

Preface pp. ix–x.

आपण पहिल्यानेच करतो आहोत हे त्याला निदर्शनास आणावयाचे होते. पुण्याच्या वकिलातीत सात वर्षे काढल्यामुळे इतरांपेक्षा, ऐतिहासिक माहिती गोळा करणे, आपल्याला सोईचे झाले होते असे तो म्हणतो.

शिवाजी–संभाजीवरील चार, शाहूच्या दोन, अशा बखरी; होळकरांची कैफियत, माधवराव, नारायणराव, नागपूरकर भोसले, होळकर, शिंदे, गायकवाड यांच्याविषयीचे मराठी वृत्तान्त त्याने पाहिले असावेत. रायरी बखर ही अधिक प्रमाणभूत आहे असे तो म्हणतो. म्हणजे येथे त्याला ९१ कलमी बखर अभिप्रेत आहे. बाकीच्या बखरी बहुतेक चिटणीसांच्या असाव्यात. काशी येथील एक पंडित विश्वनाथ भट यांनी रचलेला व्रतराज हा ग्रंथ त्याला पेशव्यांच्या खाजगी ग्रंथालयातून पाहावयास मिळाला होता. तेथे एक राजकोशही त्याने पाहिला होता.

याखेरीज ऑर्म क्रॉफर्ड ( Craufurd ), कर्नल केर ( Kerr ), कर्नल टोन, हॉलिंगबेरी ( Hollingberry ), रॉबसन, इत्यादि इंग्रज लेखकांच्या पुस्तकांचाही वापर त्यान आपल्या ग्रंथासाठी केला आहे. कर्नल केरचे पुस्तक हे एका फार्सी ग्रंथाचे भाषांतर आहे. हा ग्रंथ त्याच्याच अनुज्ञेने तयार करण्यात आला होता. परंतु स्कॉट वेअरिंगच्या मते यातला पहिला भाग सर्वस्वी चुकीचा असून दुसरा भाग–म्हणजे पेशव्यांसंबंधीचा भाग–बराचसा ठीक आहे. जर्मन इतिहासकार स्प्रेंगेलने देखील असेच मत व्यक्त केले होते.[१५]

स्कॉट वेअरिंगने आपल्या इतिहासास १७७३ पर्यंतची म्हणजे पहिल्या माधवरावाच्या काळापर्यंतची मर्यादा घालून घेतली आहे. पुढचा इतिहास ताजा आणि लोकांच्या डोळ्यासमोर घडला असल्यामुळे, आणि त्यावर अन्य साहित्य उपलब्ध असल्यामुळे तो भाग समाविष्ट करण्याची गरज त्याला भासली नाही.

---

१५. Orme : Fragments.
Craufurd : A short account of the Mahrattas.
Col. Kerr : A narrative of the Mahrattas (translation).
Col. Tone : Some Institutions of the Mahrattas.
Hollingberry : Nizam Ali Khan ( translation ).
Robson : Life of Hyder.
—Scott : Note 1 pp. 191–196.

या इतिहासाची पहिली दोन प्रकरणे दक्षिण देशाचा भूगोल आणि १५७४ पर्यंतचा इतिहास यांनी भरलेली आहेत. यासाठी ५२ पाने खर्ची पडली आहेत आणि पुढील १७७३ पर्यंतचा इतिहास १३७ पानांत आवरला आहे ( ऑक्टेव्ह साईज ) पुढे सुमारे ९० पाने विवरणात्मक परिशिष्टाची आहेत. याने शिवजन्माची तारीख १६२६–२७ अशी दिली आहे ती बहुधा चिटणीसांच्या बखरीवर आधारित असावी. 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग" हे मराठ्यांच्या राज्याचे प्रमुख लक्षण म्हणून सांगितले आहे. "मराठे रांगडे असले तरी हुशार आहेत, स्वतंत्र पण संकुचित वृत्तीचे, धाडसी पण विश्वासघातकी असे आहेत. सुसंस्कृत दरबारी मानकऱ्यांचा डौल त्यांच्यात नसला तरी त्यांचे सर्व दुर्गुण यांच्यात उतरले आहेत."[१६]

मराठ्यांचा धर्म, भाषा, चालीरीती, उत्सव, श्रावणातील दक्षणा, दसरा आणि शमीस्तोत्र ( व्रतराजावरून घेतलेले ) यांचा त्याने उल्लेख केला आहे.

स्प्रेंगेलपेक्षा स्कॉट वेअरिंगचा इतिहास प्रगत स्वरूपाचा असला, अस्सल साधनांचा विशेषतः स्थानिक साधनांचा येथे मोठ्या प्रमाणावर वापर केला असला तरी खऱ्या अर्थाने हा मराठ्यांचा इतिहास आहे असे मानता येणार नाही. बखरीपेक्षा थोडासा सुसंगत असाच तो ग्रंथ आहे असे म्हणावे लागेल.

ग्रँट डफने, एक स्प्रेंगेल सोडला, तर आपल्या इतर पूर्वसूरींच्या कार्याचा उल्लेख आपल्या प्रस्तावनेत केला आहे. रॉबर्ट ऑर्म आणि स्कॉट वेअरिंग यांना साधने संपादन करण्याच्या कामी किती कष्ट उपसावे लागले असतील याची त्याला पूर्ण कल्पना होती. एक प्रमुख अधिकारी म्हणून चार वर्षे आपणास राहण्याची आणि काम करण्याची संधी मिळाल्यामुळे, आणि ऐतिहासिक साधने विनासायास त्याला उपलब्ध झाल्यामुळे, जे आपल्या पूर्वीच्या इतिहासकारांना कष्टप्रद होते ते आपल्याला सुलभ झाले असे कबूल करून तो पुढे म्हणतो की हा इतिहास लिहिताना मला जे कष्ट

---

१६. "The Mahrattas, though rude, are cunning, independent, yet mean; brave, still treacherous; and without the polish, still possessing the vices of the most refined courtier." –Scott p. 105.

पडले, जो पैसा खर्च करावा लागला त्याची यथार्थ कल्पना फक्त माझ्या सहकाऱ्यांना आणि भारतात माझ्यासारखे काम करण्याचा ज्यांनी प्रयत्न केला त्यांनाच फक्त येऊ शकेल.[१७]

ग्रॅंटच्या इतिहासाचे आणखी एक वैशिष्टच म्हणजे त्याने लेखनाला प्रारंभ केला तेव्हा मराठ्यांचे ऐतिहासिक कार्य संपले होते; तो विषय पूर्ण झाला होता. ऑर्म, स्प्रेंगेल आणि स्कॉट वेअरिंग यांना संपूर्ण मराठ्यांच्या इतिहासाचे निवेदन करणे शक्य झाले नाही कारण ते सारे १८१८ च्या पूर्वीचे इतिहास होते. म्हणूनच एल्फिन्स्टन म्हणतो, "संपूर्णत्व हे तुझ्या विषयाचे एक मोठे सौंदर्य आहे" (The wholeness of your subject is one of its greatest beauties). (४–१-१८२३)

असे जरी असले तरी मराठ्यांच्या इतिहासाचे स्वरूप अधिक व्यापक आणि गुंतागुंतीचे होते. याला अनेक कारणे होती. अपुरी साधने, विविध भाषेतील साधने, आणि भरधाव घडणाऱ्या घटना यामुळे विषयाचे प्रतिपादन करणे किती कठीण आहे याची जाणीव त्याला पुढे पुढे फार होऊ लागली.

मराठ्यांच्या उदयाची कथा रंगविण्यास पुरेशी स्थानिक सामुग्री नव्हती. याकरिता त्याला प्रामुख्याने मुसलमानी साधनग्रंथावर अवलंबून राहावे लागे. शिवाजी आणि शिवकाल या कालखंडाच्या तपशीलवार निवेदनास राजपत्रे ( state papers ) अत्यंत अल्पस्वल्प अशी होती. त्यामुळे बखरीवर विसंबून राहावे लागे.

पुढे पेशव्यांच्या उदयाबरोबर मराठ्यांच्या कार्यकक्षा रुंदावत गेल्या, आणि विशेषतः नर्मदा नदी उतरून मराठ्यांनी उत्तरेकडे प्रवेश केल्यावर तर हा इतिहास फारच गुंतागुंतीचा आणि व्यापक बनला. त्यामुळे मराठ्यांचा इतिहास समजून घेण्यासाठी, मुघल, निजाम, दक्षिणेकडील नबाब मंडळी, म्हैसूरचे राजे, माळवा, गुजराथ, कर्नाटक येथील मराठे सरदार आणि त्यांच्यातील राजकारणे, दाभाडे आणि गायकवाड, भोसले आणि प्रतिनिधी, शिंदे आणि होळकर यांच्यामधील तंटे, युरोपियनांचे आगमन इत्यादि अनेक तपशील बारकाईने तपासून घ्यावे लागत.

शिवाय वेळेची टांगती तलवार सतत डोक्यावर असल्यामुळे त्याला घाईगर्दीने काही गोष्टी आटोपत्या घ्याव्या लागत. त्यामुळे त्याचा बराच

---

१७. ग्रॅंट डफ : प्रस्तावना p. lxxxvi.

गोंधळ उडे. प्रत्यक गोष्टीची हवी तशी शास्त्रशुद्ध छाननी त्याला करता येत नसे. मित्रांनी आपुलकीने आणि प्रामाणिकपणे केलेल्या सूचनांची अंमलबजावणी त्याला करता येईना. प्रकृती दिवसेदिवस ढासळत चालली होती आणि कामाचा डोंगर तर वाढत होता. विश्रांतीची त्याला नितांत गरज होती, आणि इतिहास काही आटोक्यात येत नव्हता. तो वैतागला होता. तो म्हणतो, " एका पाठोपाठ येणाऱ्या या घटना पाहून मी भेदरून गेलो आहे. किती व्यक्ती आणि त्यांचे किती विषय ? आणि एवढे करून वाचकाला त्यामध्ये फारच थोडा रस हे सारे निरुत्साही आहे. पण एकच विचार मला नेहमी उत्तेजित करीत असतो आणि तो म्हणजे, जे कोणत्याही जिवंत माणसाला ज्ञात नाही ते मी पाहतो आहे किंवा पाहतो आहे तशी समजूत करून घेतो आहे. स्कॉट वेअरिंग देखील याच भावनेने मराठ्यांच्या इतिहासलेखनाचे काम करीत होता.

या अज्ञात अशा क्षेत्रात आपण एक मूलभूत स्वरूपाचे (pioneering) काम करीत आहोत हा विचार साऱ्या संकटांना तोंड देण्यास पुरेसा होता. अर्थात हा प्रारंभीचा उत्साह, मराठ्यांच्या इतिहासाच्या विकासाबरोबर कमी होत गेला, आणि प्रतिदिनी वाढणारे साहित्य आणि मित्रांच्या प्रेमळ सूचना यांचा मेळ त्याला घालता येईना, आणि तो भांबावून गेला. तो म्हणतो, "मला काय म्हणावयाचे आहे हेच मला समजत नाही."[१८]

अर्थात या कामासाठी लागणाऱ्या कष्टांत त्याने कसलीच कसूर केली नाही. तो लिहितो, " कसलीही विश्रांती न घेता बारा ते चौदा तास काम करून मी इतिहासलेखनाचे बहुतेक सर्व काम संपविले. मॉरिस-सारख्या अनेक सद्गृहस्थांनी आपले नेहमीचे काम सांभाळून मोठ्या प्रामाणिकपणे कळकळीने निवडलेल्या असंख्य कागदपत्रांचे भाषांतर करण्याच्या कामी मला मदत केली. विश्वासार्ह अशी एकही घटना मिळण्याची आशा नसली तरी असंख्य कागद वाचून काढले. माझ्या पुस्तकात सकृद्दर्शनी आढळणाऱ्या निष्काळजीपणाने लिहिलेल्या भागासंबंधी मला असे सांगावयाचे आहे की असाध्य डोकेदुखी, जी पुढे पुढे अतिशय तापदायक झाली, तीच

---

१८. ग्रँटचे पत्र, ता. २९–५–२२.

"I am exceedingly horrified by events on events, so many characters, and so many interests, and with all so little interesting to the reader, that nothing cheers me except that I see or fancy I see what no one alive knows."

याला कारणीभूत आहे. दर पाच दिवसांनी डोकेदुखीचा झटका यावयाचा, आणि एकदा सुरवात झाली म्हणजे ६ ते १६ तासपर्यंत ती राहावयाची. अशा वेळी कपाळाला थंड पाण्याची पट्टी लपेटून मी कामाला बसे. हा झटका कमी झाला की मला लेखनाची स्फूर्ती येई आणि अशा वेळी दुसऱ्या दिवशीच्या रात्रीपर्यंत जागून मी काम करीत असे, आणि असे काम बहुधा उत्तम आणि विपुल होत असे."[१९]

१९. ग्रँट डफ भाग १, प्रस्तावना पृ. xxxviii.

एल्फिन्स्टनला लिहिलेल्या. एका पत्रात (८–४–१८११) तो म्हणतो,

"My work and my headaches do not agree at all. They are taking a new turn of late and make me giddy and drunk."

# ७

# मराठ्यांच्या इतिहासाची घडण

मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचा निश्चय मनाशी पक्का झाल्यानंतर ग्रँटने साधनांची जमवाजमव, त्यांची मांडणी, चिकित्सा यांकडे विशेष लक्ष पुरविण्यास प्रारंभ केला. एल्फिन्स्टनच्या सांगण्यावरून किंवा स्वतःच त्याने या सुमारास साधनसामुग्रीबाबत एक जाहीरनामा काढला असावा. " जाहीरनामा माहाराज मंडळ हुजुरून समस्त लोकांस समजावे या करिता आज्ञा केली जाती जे बखर व ताम्रपत्रे व जुने सनदा, वतनपत्रे, व इनामपत्रे वगैरे व मुलकाचे हकीकती सुद्धा मराठे अक्षराची व पारसी बालबद्ध व संस्कृत व हिंदुस्थान्यातील व जुने हिंदी राज्यातील व बदर (बिदर) पादशाही व निज्यामशाही व इदलशाही राज्यातील व सिवाजी माहराजाचे राज्याचे कारकीर्दीतील व संभाजी माहराज व राजा...."[1] पुढील भाग फाटलेला आहे. ही मूळ जाहीरनाम्याची नक्कल आहे. हा जाहीरनामा कोणी आणि केव्हा काढला याचा नामनिर्देश नाही. पण साताऱ्याच्या कागदपत्रात हा आढळला, आणि यातील मजकूर हा प्रामुख्याने मराठ्यांच्या इतिहासासंबंधीचा असल्यामुळे ग्रँटशिवाय दुसऱ्या कोणी हा जाहीरनामा काढला असेल असे वाटत नाही.

साताऱ्याचा राजा प्रतापसिंह, बाळाजीपंत नातू, एल्फिन्स्टन, चिटणीस, आणि काही प्रमुख जुन्या अनुभवी व्यक्ती यांची अमोल मदत त्याला साधने जमा करण्याच्या कामी झाली. कागदपत्र जमा करणे, त्यांच्या नकला करणे, निरनिराळ्या शब्दांचे अर्थ लावणे, लोकांच्या मुलाखती घेणे या कामासाठी लागणारा वेळ, पैसा आणि पडणारे श्रम यात त्याने कधीच हयगय केली नाही. या कामी बाळाजीपंत नातूने त्याला विशेष साहाय्य केले.

साताऱ्याचा दप्तरखाना त्याच्या ताब्यात नोव्हेंबर १८१८ मध्ये आला. छत्रपतीचा हा दप्तरखाना असल्यामुळे साहजिकच त्यात अत्यंत मौल्यवान कागदपत्र होते. शिवाजी महाराजांनी आपला सावत्रबंधू

---

१. डे. कॉ. रु. १ फा. ६ : २४.

तंजावरचा व्यंकोजी राजे यास लिहिलेले पत्र, औरंगजेबाची फर्माने, सनदा इत्यादि कागदपत्र यात होते. संभाजी ते शाहू या मधल्या महत्त्वाच्या कालखंडातील म्हणजे १६८० ते १७०७ पर्यंत स्वातंत्र्ययुद्धाच्या काळातील कागदपत्र का नाहीत अशी जेव्हा त्याने विचारणा केली तेव्हा त्याची दोन कारणे सांगण्यात आली. संभाजीच्या मृत्यूनंतर १६८९ साली मुघलांनी मराठ्यांची राजधानी किल्ले रायगड आपल्या काबूत आणली, आणि मराठ्यांचा राजा आश्रयार्थ भटकू लागला तेव्हा या संक्रमणाच्या काळात बराच राजकीय पत्रव्यवहार नष्ट झाला. दुसरे कारण म्हणजे पुढे परशुरामभाऊ पटवर्धनांनी १७९८ साली सातारा शहर लुटले त्यावेळी बराच पत्रव्यवहार जाळला गेला (१५-७-१८१९). १७९८ च्या सुमारास पुणे–सातारा संबंध बिघडत चालले होते. चतरसिंगाने स्वतंत्र होण्याचा चंग बांधला होता. तेव्हा परशुरामभाऊंनी रास्त्यांच्या समवेत साताऱ्यावर हल्ला केला आणि चतरसिंगाचा पराभव करून (४ ऑगस्ट १७९८) शहराचा ताबा घेतला. तेव्हा या दोन कठीण प्रसंगी ऐतिहासिक सामग्री बरीच नष्ट झाली.

राजा आणि त्याचे अधिकारी यांचेकडे कागदपत्र दाखवा असा ग्रँटने सतत लकडा लावण्यास प्रारंभ केला. दप्तरखान्यातील कागदपत्रांचे बस्ते देण्यास प्रथम राजा इतका राजी नव्हता. फार तर काहींच्या नकला ग्रँटने करून घ्याव्यात असे त्याचे म्हणणे होते. आपल्या फडणिसामार्फत त्याने ग्रँटला निरोपही पाठविला होता की, "पारसनीस आणि मुनसी आपल्या घरी अथवा वाड्यात बसून साऱ्या कागदांच्या नकला करून देतील." परंतु हा विचार ग्रँटला रुचला नाही. तो म्हणतो इतका संशय का ? "पाहिजे तर आम्ही हर बस्त्यावर मोहर करू अथवा तुम्ही करा. इतके दिवस ठेवून काये केले व पुढे काये करणार ? आम्ही उतरून बुकात छापून विलायतेस पाठऊ. तेथून ठरेल तरी तुमचा उपयोग"[२] ग्रँटने असा रुद्रावतार धारण केल्याने आबा पारसनीसाने फडणिसाला फार आग्रह न धरण्याबद्दल सांगितले. बळवंतराव चिटणीसाला देखील काही बोलता येईना.

वाड्यात येऊन फडणिसाने घडलेले सारे वृत्त राजाला निवेदन केले. आता पुढची पावले कशी टाकावयाची यासंबंधी खलबते सुरू झाली. बळवंतराव चिटणीस, आबा पारसनीस, चिंतोपंत व दाजीबा उपाध्ये,

---

२. पे. द. ४२ पृ. २३–२४.

आणि स्वत: राजा यांची बैठक रात्री बसली. "कागदपत्र सारे गुंतले, त्यात इंग्रजप्रकर्णी राजकारणाचे पूर्वीचे कागदपत्र सारे पेशव्याचे व इकडील उतराच्या नकला वगैरे व आणखी कितेक कागदपत्र जुने हिंदवी सारे गुंतले. द्रिष्टी पडावयाचे व न पाडावयाचे हे काढून आणावे. त्यास आबा पारसनीस लिहावयास जातात तेव्हा युक्त्या निघतील तितके काढून आणावे यैसे ठरले."[३] हा विचार पक्का झाला.

राजाने आपल्या अधिकाऱ्यांना अशी ताकीद दिली होती की, "कागद ग्रांटास दाखऊन न ठेविता माघारे आणणे आणि ऱ्याहाल त्याची यादी लेहून सेरा मारून घेऊन जाणे."

यावरून साताऱ्यातील सर्वच कागदपत्र ग्रँटला पाहावयास मिळाले असतील असे वाटत नाही. अर्थात या बाबतीत ग्रँटच्या मनात कसलाही संदेह नव्हता. राजाने आपल्याला सर्व महत्त्वाचे कागद दाखविले आहेत, आणि जे काही त्याच्या दप्तरात राहिले आहेत ते अगदीच सामान्य प्रतीचे म्हणजे शर्करायुक्त तिळगुळासंबंधीचे वगैरे आहेत असे तो म्हणतो.[४]

कागदपत्रें ही इतिहासाची अव्वल दर्जाची साधने होत याची ग्रँटला पूर्ण कल्पना होती. ग्रँटला मराठी येत होते किंवा नाही असा एक प्रश्न उपस्थित केला जातो. परंतु त्याच्या मराठीच्या ज्ञानाबद्दल विशेष संदेह मानण्याचे कारण नाही. त्याच्या इंग्रजी पत्रांतून अनेक वेळा मराठी किंवा मराठीत रूढ झालेले फार्सी शब्द वारंवार आढळतात. एके ठिकाणी तर या सतत मराठीच्या वापरामुळे आपले इंग्रजी बिघडले आहे अशीही त्याने तक्रार केली आहे. अर्थात त्याला मोडी कागदपत्र वाचता येत असतील असा तर्क करावयास कसलाही पुरावा उपलब्ध नाही. आपण मराठी कागद वाचले असाही कोठे त्याने दावा केल्याचे आढळत नाही. मात्र चिटणीस, पारसनीस यांच्याकडून कागद वाचून घेऊन त्यातला आशय तो जाणून घेत असावा, आणि महत्त्वाच्या भागाचे भाषांतर करून घेत असावा. मराठी कागदपत्रांचे भाषांतर करणे हे काही सोपे काम नव्हते. त्याला लागणारे परिश्रम हे काही वेळा त्यातून निघणाऱ्या फलनिष्पत्तीहून फारच अधिक असत. हचिनसन नावाच्या एका गृहस्थाने हे भाषांतराचे काम आपण करू असे जेव्हा त्यास सुचविले तेव्हा तो म्हणतो, या भाषांतराच्या कामातला मुख्य दोष म्हणजे १० हात लांबीचा मराठी कागद वाचल्यानंतर कदाचित १० ओळी उपयुक्त आढळतील. (१८२१)

---

३. पे. द. ४२ पृ. २४.
४. पे. द. ४२ पृ. २०.

ऐतिहासिक साधने मिळविण्यासाठी त्याने फारच कष्ट उपसले, प्रामाणिक प्रयत्न केले. "मी सारा प्रदेश जुन्या कागदपत्रासाठी धुंडाळतो आहे...सर्व देशपांडे मंडळी या कामाला जुंपली आहेत. विजापुरात शोध घेणे चालू आहे. बिदरकडे मोहीम पाठविण्याच्या बेतात आहे. थोड्याच दिवसांत मी संपूर्णतया एक पुराणपुरुष बनेन."[५]

साधने गोळा करीत असताना येणाऱ्या विविध अनुभवांची नोंदही त्याने केली आहे. प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचा आढावा घेण्यासाठी त्याला ताम्रपट पाहावे लागत. एका ठिकाणी त्याला एक ताम्रपट सापडला. पण त्याचे १६० रुपये आपण देऊ केल्याने मालकाला त्याचे महत्त्व कसे वाटू लागले आणि शेवटी काहीतरी सबब सांगून त्याने तो देण्याचे कसे टाळले याचा आपला मजेशीर अनुभव ग्रँटने सांगितला आहे. काहीच दिले नसते किंवा ५–१० रुपयांवर त्याची संभावना केली असती तर तो ताम्रपट आपल्या हाती आला असता ही चुटपुट त्याला लागून राहिली.[६]

अशा रीतीने बहुत कष्टाने संपादन केलेल्या कागदपत्रांचे वाचन करणे फार जिकीरीचे काम होते. त्यात त्याला अनेक अडचणी येत. सरदेशमुखी, चौथाई, बाबती यांचा अंमल सर्वत्र सारखा नसे. या शब्दांचे अर्थ कसे लावावयाचे आणि सुसंगती कशी निर्माण करावयाची हा एक फार बिकट प्रश्न होता. या शंकांचे समाधान करून घेण्यासाठी चिटणीस, फडणीस काही वेळा अपुरे पडत. तेव्हा ग्रँट म्हणतो, "फार फिकीर आहे कोणी पुरा माहीतगार बुढा आहे की नाही शहरात ?" यावर आबा पारसनीस बोलले, "बुढ्यास काये माहीत आमल का बुढा होना."

यावर बाळाजीपंताने अमात्याकडील एक जुना कारकून सदाशिव भगवंताचे नाव सुचविले. त्याला त्याने अनेक प्रश्न विचारले तर त्याने "आनन्वित" सांगितले.[७]

---

५. ग्रँटचे पत्र, ता. २५–६–१८२०

"I am raking the country for old papers ..... I shall soon be a complete antiquary."

६. ग्रँटचे पत्र, ता. ८–७–१८२०.

"I stupidly offered him a present of Rs. 160 which no doubt created a notion in his mind of its value which would not have been the case had I more judiciously given him Rs. 10 ... "

७. पे. द. ४२ पृ.१९.

ग्रँटला कोणते प्रश्न भेडसावीत होते याचा विचार केला म्हणजे मराठ्यांचा इतिहास समजावून घेण्यासाठी त्याने कशा प्रकारचे प्रयत्न चालू ठेवले होते याची कल्पना येईल.

बळवंतराव चिटणीसाला त्याने विचारले, "प्रतिनिधीपद कधी, कोणते कारकीर्दीत जाले, पद जाले त्याचे नाव व घालमेल कसी ?"

यावर चिटणीसाने सांगितले की राजाराम महाराज कर्नाटकात जिंजीस असताना प्रल्हाद निराजीस हे पद प्रथम दिले. "परशुराम त्रिंबक प्रतिनिधीपर्यंतची सर्व माहिती, शक, सन ग्रँटने टिपून ठेवले. हे प्रतिनिधीपद पुढे चिटणीसांच्याकडे आले. बळवंतराव चिटणीसाच्या वडिलांनी महाराजांचा म्हणजे प्रतापसिंहाचे वडील यांचा घोडा ओढून काढला म्हणून खूष होऊन हे प्रतिनिधीपद त्यांना देण्यात आले होते. यावर ग्रँट विनोदाने म्हणतो, "बहुत बहुत काम केली, बहुत खुसी आहे आम्हास, हाली माहाराजाचा घोडा पडिला तो तुम्ही का काढिला नाही ?" याचा संदर्भ असा की, पंधरा दिवसांपूर्वी प्रतापसिंहाचा घोडा पडला तेव्हा तो ओढून काढण्यास बळवंतराव नव्हते. अर्थात "आम्ही जवल नव्हतो" असे चिटणीसाने उत्तर दिले.[८]

यानंतर चिटणीसावर प्रश्नांच्या फैरी झडू लागल्या. "बाबती व सरदेशमुखी व मोकासा, चौथाई व सावोत्रा, जाहगीर ही वाटणी कसी आहे; आमल कसा घेतात व स्वराज्ये हे काये, याचा अर्थ, मायेने काये ? .. अष्टप्रधान यास वेतन काय ? नख्त पोहचत होते की सरंजाम ? .... फर्मान पादषाहाचे साल सन कोणते, किती वर्षे जाली ?"[९]

चिटणीसाने सांगितले जैतापुरी दादा चिटणीस आहेत त्यांच्याकडील टिपणे पाहून सर्व माहिती लिहून आणतो. फार्सी पत्रांच्या बाबतीत पारसनीस सांगतील असे कळविले.

जैतापुराहून माहिती आली का अशी पृच्छा लगेच दुसरे दिवशी ग्रँटने केली. पाठविलेला माणूस अद्याप आला नव्हता. "दाखला निवडून" आणला नाही म्हणून ग्रँट बळवंतरावावर रुष्ट झाला होता. "तुम्हांस काल सांगितले किती, फार सुस्तावा केला. फार नाकारी गोष्ट केली" अशा शब्दांत त्याने चिटणीसाला दटावले. येवढ्यात फडणीस एक

८. पे. द. ४२ पृ. १७.
९. पे. द. ४२ पृ. १८.

यादी घेऊन आले आणि त्यावरून "सरदेशमुखी दाहा रुपये व बाबती आठ रुपये व चौथाई मोकासाबाब पंचवीस रुपये व साहोत्रा साहा रुपये या ो येकूण पनास रुपये व एकावन रुपये जाहागीर यैसे आहे" असा हिशेब मांडून दाखविला. परंतु त्याबरोबर फडणीसाने हेही सांगून टाकले की सर्वत्र एक प्रकारची चाल नाही. अमल जबर असेल तर वसूल अधिक होत नसे. अशा वेळी साठच्यालिसी ऐवजी च्यालिसीसाठ असे होत असे. त्यामुळे सर्वत्र एकच दस्तुर नव्हता."[१०]

अर्थात ग्रँटचे समाधान झाले नाही. पारसनीस, बाळाजीपंत नातू, चिटणीस, अमात्यांचा कारकून सदाशिव भगवंत आणि फडणीस या सर्वांनी हात टेकले. त्याने स्वत: एक यादी तयार केली आणि दाखला म्हणून यादीत नोंदविलेले कागदपत्र आणून दाखविण्याची आज्ञा त्याने फडणीसाला केली. त्यावर फडणीस म्हणतो, "आमचे रुमाल तुम्ही वाड्यात नेले, आम्ही काये दाखवावे."

सरदेशमुखी अंमल जुना की नवा हे ग्रँटला जाणून घ्यावयाचे होते. चिटणीसांच्या मते तो जुना अगदी शिवाजीमाहाराजापासूनचा आहे. ग्रँटची काम करण्याची पद्धत बाळाजीपंताच्या आता चांगली अंगवळणी पडली होती. तो चिटणीसास मध्येच अडवून विचारतो, "तुम्ही जुना म्हणता यास आधार काये?" अर्थात चिटणीसाजवळ निश्चित पुरावा नव्हता. एक जुनी याद आणि फर्मान काढून आधार देण्याचा तो वृथा प्रयत्न करतो. एका यादीत लिहिले होते की, "सरदेशमुखी चौथाई **साधले** त्याचे फर्मान करून आणावे." यावर बाळाजीपंताने आक्षेप घेतला. तो म्हणतो, "**साधेल** म्हणा, **साधले** असे म्हणू नका. मात्रा **धवर** द्या, **लवरी** देऊ नका."[११] बाळाजीने सुचविलेली ही दुरुस्ती अर्थातच चिटणीसाला आवडली नाही. दोघांत वादावादी सुरू झाली. ग्रँट ही सारी बौद्धिक चकमक कौतुकाने पाहात होता आणि म्हणत होता, "बहुत आछा लढते." शेवटी भोजनाची वेळ झाल्यामुळे ग्रँटने हा इतिहासचर्चेचा दरबार बरखास्त केला, आणि चिटणीस, फडणीस यास "आज आला याहून उद्या लौकर या" असे बजावले.[१२]

---

१०. पे. द. ४२ पृ. १८–१९.
११. पे. द. ४२ पृ. १९.
१२. पे. द. ४२ पृ. १९.

पुढे दोनतीन दिवसांनी जैतापुरास दादा चिटणीसाकडे पाठविलेला माणूस माहिती घेऊन आला, आणि त्यातील अष्टप्रधानांच्या तैनातीची यादी, बळवंतरावाने ग्रँटकडे सादर केली. दादा चिटणीसांच्या मते "सरदेशमुखी व चौथ हा अमल पूर्वीपासून नव्हे,—फर्मान आणिले त्यापासून आहे" असे पडले. जिल्ह्याचा यैवज सरकारकडे कसा येत असे याच्या याद्या पोतनिसाने दाखविल्या.

सरदेशमुखी पहिली नव्हे हा ग्रँटचा रिंगा सतत चाललाच होता. बाळाजीपंताने सरदेशमुखी हे वतन नाही असे ग्रँटला सांगितले आणि त्याप्रमाणे आपल्या टिपणवहीत ग्रँटने नोंद करून घेतली.[१३]

ग्रँटला शिवकालासंबंधी हवी ती माहिती मिळत नव्हती. शिवाजी-महाराजांनी केलेले तहनामे अथवा इतर काही जुने कागद मिळतील का असे चिटणीसाला विचारले असता तो म्हणतो, "रायगडास औरंगजेबाचा वेढा पडिला. किला घेऊन शाहू माहाराज कबिले सर्व धरून नेले. संभाजी माहाराजास धरून नेले आणि मारिले. नंतर यास नेले तेव्हा मालमालियेत दौलत कागदपत्र सर्व पादशाहचे हस्तगत जाले. राजाराम मात्र सडे पलून निघाले त्याजमुळे जुना कागद तहनामे राहिले नाही. येक सावंताचा तहनामा होता तो बाजीराव रघुनाथ याणि आम्हापासून नेऊन कार्य होताच जवाहीरखान्यात नेऊन ठेविला, परत दिल्हा नाही. तेथे शोध होऊन यावयाजोगे आसलियास शोध करावा." यानंतर बळवंतरावाने शिवाजी महाराजांचा रायगडी इंग्रजाबरोबर झालेला तहनामा दाखविला. अर्थात हा मूळचा तहनामा नसून शाहू महाराजाच्यावेळी तयार केलेली त्याची नक्कल होती असे स्पष्टीकरण चिटणीसाने दिले.[१४]

शाहू महाराज दिल्लीहून साताऱ्याला केव्हा आले? बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीला एकटेच गेले की आणखी काही सरदार त्यांचे-बरोबर होते? मुख्तियार पत्र कोणाला दिले होते? यातील काही प्रश्नांची उत्तरे बखर पाहून चिटणीसाने दिली.

औरंगजेबाकडून खास आलेले केशरी पंज्याचे शिवाजी माहाराजास आलेले फर्मान आबा पारसनिसाकडून त्याने वाचून घेतले, आणि त्यातील काही कलमाविषयी शंका विचारल्या.

---

१३. पे. द. ४२ पृ. २३–२४.
१४. पे. द. ४२ पृ. २२.

आणखी कागद दाखवा अशी ग्रँटची सतत मागणी असे. वास्तविक ग्रँटला असे वाटत होते की राजाकडचे सर्व कागद आपण पाहिले आहेत. राजाने महत्त्वाचे कागदपत्र दडपून ठेवले असावेत अशी त्याला शंका येणे स्वाभाविक होते. स्वतःची खात्री करून घेण्याकरिता जामदारखान्यातील बस्ते आणून राजाच्या सान्निध्यात ते एकदा त्याने सोडून पाहिले. पण ते सर्व कागद मामुली स्वरूपाचे निघाले. तरीदेखील बाळाजीपंताचे म्हणणे असे पडले की, फडणीसाकडून राजाला आणखी काही कागद असल्यास ते सारे दाखविण्याची विनंती करावी. महाराजापाशी अथवा चिटणीसापाशी आणखी काही कागद असतील असा त्याला संशय येतो, तेव्हा याचा 'पुर्ता शोध करावा' असे तो ग्रँटला सुचवितो.

फडणीसाने हा ग्रँटचा निरोप राजाला पोहोचविला. 'काही येक कागद नाहीत' असे महाराजाने उत्तर दिले, आणि जे होते ते कागद दिले आहेत असे चिटणीसाने सांगितले. राजाने फडणीसाला सांगितले की, बाळाजीपंताला इकडे बोलावून आणावे, आपण समक्ष चर्चा करू आणि मग ग्रँटला कळवू.

बाळाजीपंत निरोपासरशी धावून आले. "माहाराज, फडणीस, चिटणीस, बालाजीपंत बसून तावदानाचे खोलीत बोलणे जाले. आदौ स्वाभाविक पावसाच्या वगैरे गोष्टी जाल्या. नंतर फडणीस, चिटणीस उठोन बाहेर आले. बालाजीपंत व येजमानाचे बोलणे जाले. नंतर फडणीस यास हाक मारून आत बोलाविले. माहाराजानी सांगितले की, आमचे मनात संशये आसता तरी सारे कागद पेशव्यासुधा तुमचे पूर्वीचे राजकारणसुधा कशास देतो? दोस्ती जाली तेथे संशय काही नाही. जे होते ते कागद दिल्हे. यापरते कागद नाहीत." असे निक्षून सांगितले तरी बाळाजीपंताने एक खवचट प्रश्न विचारलाच. "तिलगूल वगैरे किरकोल कागद असतील?"

पण राजाने परत तेच उत्तर दिले, "दिल्हे यापरते नाही."

महाराजाकडे काही दाद लागत नाही असे पाहून त्याने बळवंतरावाला विचारले, "तुमचे दफ्तरी काही आणखी आहेत?"

बळवंतरावाने नम्रपणे उत्तर दिले, "जे होते ते पुण्यात तुम्हास दाखविले. नकला तुम्ही करून घेतल्यात हालीही नकला दिल्ह्या. बखर होती तीही दिल्हीच आहे. यापरता साधनी आम्हाजवळ नाही."

पण या प्रश्नाचा छडा लावण्याचा बाळाजीने विडाच उचलला होता. धाकदपटशा दाखवून अथवा गोडीगुलाबीने कागद मिळवून इतिहास-लेखनाच्या कामी ग्रँटला मदत करण्याचा त्याने निश्चय केला असावा. चिटणीसाला तो म्हणतो, " पहा कागद नाही म्हणता, आणखी येखादे समई निघालियास नीट नव्हे." अर्थात चिटणीसाने धीटपणे उत्तर दिले, " नाहीच मग निघतो कश्यानी ? "

यावर महाराजाशी आर्जवी स्वरात बाळाजीने परत बोलणे सुरू केले. " सारे कागद पाहून छाप्यात छापून विलायतेस जाईल. सर्वास माहाराजाचा पराक्रम राज्ये वगैरे जाहीर होईल. याकरिता करितात व ग्रांटाचे लक्ष माहाराजाचे ठिकाणी फार. आसा दुसरा साहेब कोण्ही नाही. वारंवार माहाराजाची कालजी वाहणे व माहाराजाचा बंदोबस्त चांगला व्हावा, आपणास येश यावे हेच चितात. "

तरी महाराज काही वश झाले नाहीत. ते म्हणाले, " कागदपत्रावरी व सनदेवर काये आहे ? आम्ही दोस्ती केली, मेलविली त्या अर्थी जे देतील ते आमचे, आधिक उणे काही म्हणावयाचे नाही. तुम्ही हिंदु आहा पाहिजे ते करा. आमचे मनात अधिक उणे वाटल्यास तुम्हापासी बोलू. त्यापासी काही काही बोलावयाचे नाही. "[१५]

वरील संवादावरून बाळाजी, प्रतापसिंह, चिटणीस यांच्या स्वभाव-विशेषावर बराच प्रकाश पडतो. बाळाजीचा परधार्जिणेपणा आणि प्रतापसिंहाचा स्वाभिमान आणि चातुर्य यांचा चांगलाच प्रत्यय येतो. निराशा पत्करून बाळाजीला कागदपत्रांचा नाद सोडावा लागला.

ग्रँटला इतिहासाचा मालमसाला पुरवीत असताना या मंडळीत आपापसातही काही वेळा चर्चा होत असे. राजाकडे, बळवंतराव चिटणीस, चिंतोपंत भाटे व बापू महाडिक ही सारी मंडळी जमली असता राज्य कसे बुडाले यावर चर्चा सुरू झाली. महाडिकानेच हा जुना विषय उकरून काढला. तो म्हणाला, " पेशवे याचे घरी राज्य चिटणीस याणी घातले. " अर्थात हा आरोप निमूटपणे चिटणीस सहन करणे शक्य नव्हते. तो म्हणतो, " ताराऊ साहेब याचा पूर्व द्वेष शाहू माहाराजाकडेस मिलाले तो धरून मारावे, प्राण घ्यावा हा संकल्प, व रामराजे कैद केले तेव्हा

---

१५. पे. द. ४२ पृ. २४–२५.

माहाराजाचा लक्ष साडोन यास मिळावे हा धर्म नव्हे; व पूर्वील द्वेष सर्वास मारावे पारपत्य करावे हे धरिले. याणी राज्य बुडविले आणि दुसरेवर दोष ठेऊन फल काय ? ''

अर्थात हे वादंग राजाने फार वाढवू दिले नाही. 'आता याचे कारण काय ?' असे बोलून या प्रकरणावर पडदा टाकला.[१६]

मराठ्यांच्या इतिहासातील काही कूट प्रश्न समजावून घेण्याचा ग्रँट कसोशीने प्रयत्न करीत होता. राजारामाच्या काळात निर्माण झालेल्या प्रतिनिधीपदाचा दर्जा काय याचा त्याला बोध होत नव्हता. गदाधर प्रल्हाद याचेकडे प्रतिनिधीपद किती वर्षे होते ? बाळाजी विश्वनाथ आंग्रे याच्यावर चाल करून गेले तेव्हा शाहूचा प्रतिनिधी परशरामपंत होते की गदाधर प्रल्हाद होते ? प्रतिनिधी हे जर वरिष्ठपद होते तर आंग्र्यांचा बंदोबस्त करण्याचा मनसुबा त्याच्याकडे न सोपविता बाळाजी विश्वनाथाकडे का दिला ? या प्रश्नांची मितीवार माहिती काढण्यास त्याने बलवंतरावास सांगितले.

चंद्रराव मोरे अथवा जावळी प्रकरण हेही अत्यंत क्लिष्ट स्वरूपाचे होते. चंद्रराव मोरे हे पातशहाचे चाकर होते की बंडखोर होते ? त्याच्या बापाचे नाव काय ? तो जर बंडखोर असेल तर त्याचे बंड मोडून जावळीचे राज्य काबीज करण्याचे प्रयोजन काय ? चंद्रराव मोऱ्यास का मारले ?

आपल्यापरीने या प्रश्नांची उत्तरे देण्याचा बळवंतराव चिटणीसांनी प्रयत्न केला. चंद्रराव मोऱ्यांच्या बापाचे, मुलाचे, भावाचे अथवा दिवाणाचे नावठिकाण नाही, परंतु बखरीत त्यांना मारले असे नमूद केले आहे असे उत्तर दिले.

त्यावर ग्रँट म्हणाला, " मोऱ्यांनी रडतोंडीचे घाटात शिवाजीस मदत केली अशी नोंद आपल्याकडे आहे, आणि ही गोष्ट तुम्ही बखरीत का नोंदविली नाही हे आपण समजू शकतो ? "

यावर महाराजांनी विचारले, 'कसे काय ?'

तेव्हा ग्रँट म्हणाला, " सिवाजी माहाराजास मदत केली. उपयोगी पडले, त्यास मारिले राज्ये लोभे, तेव्हा हारामखोरी माहाराजाकडे येईल याकरितां लिहिले नाही. "

१६. पे. द. ४२ पृ. २६.

यावर बळवंतराव चिटणीस लगेच म्हणाला, " मदत केलीच नाही. केली असती तर लिहितो. परंतु केलीच नाही म्हणोन लिहिले नाही. साहेब म्हणतात त्यास त्या वेळेचे नव्हे, आम्ही पाहिले नाही. वडिलांनी जे लिहिले ते खरे म्हणोन आम्ही मानतो. वरकड आम्हास दखल काय ? त्याणी का लिहिले नाही खरेखोटे त्यांचे ते जाणेत. "[१७]

शाहू महाराजांनी आपल्या कुत्र्याला पालखी दिली ती कशासाठी ? त्याने वाघ मारला तो कोणत्या डोंगरात अथवा रानात याची सविस्तर हकीकत नोंदविण्यास ग्रँटने सांगितले.

ग्रँटला काही तसबिरी दाखविण्यात आल्या. त्यात रामरावणयुद्धाची एक तसबीर होती. ती पाहून ग्रँट म्हणतो, " हे सर्व लटके, कोण्ही पाहिले आहे ? लबाड सर्व. " तरी परंतु काही तसबिरी, ज्याच्या अंगावर फार्सीत मजकूर लिहिला होता अशा, मुंबईस पाठवून त्याच्या प्रतिकृती तयार करून घेण्याचा त्याने आपला मनोदय व्यक्त केला होता.[१८]

हिंदूंच्या चालीरीतीसंबंधी, शास्त्रासंबंधी त्याने काही शास्त्र्यांशीही चर्चा केली. निळकंठशास्त्र्याबरोबर झालेल्या चर्चेत त्याने हिंदूंचे शास्त्र आणि चालीरीती यांना बरेच दूषण दिले, ' उडऊन देऊन उतर केले ' अशी नोंद राजाच्या रोजनिशीत आहे.[१९]

मराठ्यांच्या इतिहासलेखनास अथवा त्याचा कच्चा आराखडा तयार करण्यास उपयुक्त साधन म्हणजे बखरी याची कल्पना ग्रँटला होती. चिटणीस, देशमुख, देशपांडे यांच्याकडून अनेक बखरी त्याने मिळविल्या होत्या. खटाव-देशपांडे यांच्याकडे शालीवाहन ते रामचंद्रराव यादवपर्यंतची बखर आहे असा एका पत्रात त्याने उल्लेख केला आहे. कोल्हापूरच्या महाराजाकडून त्याने मिळविलेली बखर बहुधा सभासद बखर असावी. आपल्या ग्रंथाच्या तळटीपेत ' मराठी हस्तलिखित ' असा जेथे जेथे त्याने आधार दिला आहे तेथे कोणती तरी बखर, हकीकत, कैफियत त्याला अभिप्रेत आहे असे मानावयास हरकत नाही. अर्थात नेमके कोणत्या

---

१७. पे. द. ४२ पृ. २६–२८.

१८. पे. द. ४२ पृ. २८–३१.

१९. कित्ता पृ. ३१.

बखरीवर आधारित आपले विधान आहे याचा स्पष्ट उल्लेख त्याने केला नसल्याने त्याचा पुरावा शोधणे कठीण झाले आहे. ग्रँटच्या लिखाणातील ही एक मोठीच उणीव आहे असे म्हणावे लागेल.

अव्वल दर्जाचे इतिहासाचे साधन म्हणून बखरीचा वापर करता येणार नाही याची त्याला कल्पना असावी. चिटणीसाकडून मराठ्यांच्या इतिहासाचें संपूर्ण निवेदन करणारी एक बखर सुरवातीस त्याने मिळविली होती. पण ही बखर म्हणजे 'निरर्थक गोष्टींचा भरणा' (a mass of nonsense) आहे अशी प्रथम त्याने हेटाळणी केली असली तरी लगेच त्याने आपल्याला सावरून घेतले आहे. कारण तो म्हणतो की या बखरीतील सर्वच गोष्टी तिरस्करणीय नाहीत. काही महत्त्वाच्या घटना येथे आल्या आहेत.

चिटणीसांनी दिलेल्या बखरीतील माहिती तो, त्याने जी इतर साधने–इंग्रजी–फार्सी–गोळा केली होती, त्यांच्याशी पडताळून पाहात असे. आणि त्याबाबत चिटणिसाशी चर्चा करीत असे. तो म्हणतो, "आम्हापासी लिहिले आहे यास व चिटणीस याणी बखर लिहून दिल्ही त्यास मिलत नाही. माहाराजाची बढाई करून लिहिले आहे. लटके आहे व सर्व राज्य दिलीपासून मोजावयाचे आहे, व सिवाजी माहाराजास जरीपटका निशाण कधी पादशाहानी दिल्हे? पहिले सिवाजी बंडच होते, पादशाहाचे देणे नव्हे, व गादीवर पादशाहा बसले नव्हते व मूल होते तेव्हाच संत्र (स्वतंत्र) ते आहेत."[२०]

अर्थात बळवंतरावाने यावर चटकन काही उत्तर दिले नाही. ग्रँटशी झालेले संभाषण त्याने राजाला निवेदन केले. ग्रँटशी आपण या बाबतीत कसे वागावयाचे याचा कानमंत्र राजाने चिटणीसाला दिला होता. तो म्हणतो, "जे पुसतील माहीतगारी ते बखर दिल्ही या आधारावरच धरून बोलावे. जे पूर्वीपासून माहीत आहे ते असें आहे. मग तुमचे लिहिले असेल ते खरे म्हणावे. आग्रह करू नये. जबरदस्तापुढे आग्रह करून कामाचा नाही व आग्रह करून सिध्ध करून फल होते असे नाही. होणार ते होईल. व कागद आणखी आहे पुसतील तरी नाही म्हणावे. हे दोन जाबसालानी उतरे करावी. रिकामा विच्यार विवंचना घोर करून लभ्ये नाही. समय परत्वे होय म्हणत असावे."[२१]

२०. पे. द. ४२ पृ. ३१.
२१. पे. द. ४२ पृ. २६.

चिटणीसी बखर भाकडकथांनी भरली आहे असे वाटत असले तरी तिचे इंग्रजी भाषांतर करून घेण्याचे काम त्याने सुरू केले होते. नारायणराव नावाचा एक इंग्रजी जाणणारा माणूस ग्रँटकडे होता. बळवंतराव चिटणीस यांच्या साहाय्याने वाड्यातच बसून बखर इंग्रजीत उतरावयास म्हणजे भाषांतर करावयास त्यास ग्रँटने सांगितले होते. शिवीजी महाराजाच्या पूर्वीची काही माहिती असल्यास तीही लिहून घ्यावी असाही आदेश त्याला देण्यात आला होता. अर्थात चिटणीसाने हे स्पष्ट केले होते की, "आमची पैवस्ती सिवाजी माहाराजापलीकडे नाही. माहीत कशावरून आसावे ?"[२२] या बखरीच्या कामाची तो चिटणीसाकडे वारंवार चौकशी करीत असे आणि अधिक माहिती काढण्याकरिता त्याला डिवचून पाहात असे. एकदा तो म्हणाला, "बखर केली परंतु सारी माहाराजाची बढती चागलीच लिहिले. येखादे वेलेस वाईट चालले आसते तरी लिहिले नाही. तेव्हां संषय येतो. सारेच चांगले आसते आसे नाही."

अर्थात चिटणीस आता थोडा धीट झाला होता. तो म्हणाला, "चांगले जाले ते चांगले लिहिले, वाईट जाले ते वाईट लिहिले आहे. संभाजी माहाराजाची वर्तणूक चांगली जाली नाही सर्व बुडविले ते लिहिले आहे. सिवाजी महाराजाची चाल चांगली जाली ती लिहिली आहे."[२३]

१८१९ च्या सुरवातीला चिटणीसी बखरीबद्दलचा ग्रँटचा प्रतिकूल ग्रह, १८२० साली बदलला आणि ही बखर त्याला महत्त्वपूर्ण वाटू लागली. तो म्हणतो, "एकंदरीत ही बखर पुष्कळ महत्त्वाची आहे. शिवाजीच्या कर्नाटकातील हालचालींची उत्तम माहिती यात आली आहे. पण या बखरीचा एक दोष म्हणजे सामान्यतः आपणास हवी असलेली प्रारंभीची माहिती पुरविण्यास ती अपुरी पडते."[२४]

मराठी बखरींची मुसलमानी तवारिकाशी तुलना करून मराठी बखरी तो अधिक प्रमाणभूत मानतो. तो म्हणतो, "मुसलमान लोकांनी तारीफ

---

२२. पे. द. ४२ पृ. २९.
२३. पे. द. ४२ पृ. ३०.
२४. ग्रँटचे पत्र, ता. २५-६-२० रो. क्र. ५. पृ. १३४ : १२-३-२२.
"On the whole most valuable, as it gives a good account of Sivajees expedition into the Carnatic, but is in general defective in the early details we wish to get."

फार करून किताब लिहिली ती लबाड फार. हिंदूंचे लिहिणे निमे खरे व निमे खोटे याप्रमाणे आहे." एके टिकाणी तो म्हणतो, "मुसलमान मिजाजखोर व मऱ्हाटे दिलाचे साफ."[२५]

पुण्याच्या दप्तरखान्यात त्यास चिमाजी आप्पा, ब्रह्मेंद्रस्वामी यांचा पत्रव्यवहार पाहावयास मिळाला. पण या दप्तरखान्यातून १७२० नंतरचा बऱ्याच काळापर्यंतचा–विशेषतः बाजीरावाच्या कारकीर्दीच्या इतिहासास उपयुक्त असे कागद आढळत नाहीत अशी त्याने तक्रार केली आहे.[२६]

मराठ्यांचा इतिहास फार्सी साधनांच्या वापराशिवाय अपुरा आणि अनधिकृत राहील याची पुरेपूर कल्पना ग्रँटला होती. स्कॉट वेअरिंगने मराठी साधनांची खूप भलावण केली आहे आणि फार्सी साधने, एक फरिस्ता सोडून, सारी त्याज्य ठरविली आहेत. त्याचा फार्सी साधनांचा विशेष अभ्यास नसल्याने त्याने असे मत बनविणे स्वाभाविक होते. ग्रँटला मराठी आणि फार्सी या दोन्ही भाषा अवगत असल्यामुळे या दोन्ही भाषांतील साधनांचे महत्त्व त्याला पटले होते व त्याचा तौलनिक अभ्यास करणे त्याला शक्य झाले होते.

दक्षिणदेशाचा मराठ्यांच्या कालापूर्वीचा इतिहास फार्सी साधनांशिवाय लिहिणे प्रायः अशक्य होते. अनेक फार्सी ग्रंथ ग्रँटने हाताळले असावेत असे वाटते. फेरिस्ता, खाफीखान, अबुल हुसेन काझी व मीर इब्राहिम यांचे विजापूरचे इतिहास, दुसऱ्या आदिलशहाचा इतिहासकार नुरुल्ला, अलीनाम्याचा कर्ता नुसरती, मौला जहूरचा महमूदनामा, झुबैरीचा बुसातिन उस् सलातीन, इत्यादि फार्सी ग्रंथ त्याच्या अवलोकनात होते हे त्याच्या ग्रंथाच्या तळटीपांवरून दिसते.

मराठी साधनांत चिटणीसी बखरीला जे महत्त्व ग्रँटने दिले आहे तशाच प्रकारचे महत्त्व फार्सी साधनांत खाफीखान यास त्याने दिले आहे. मुन्तखब–उल्–लुबाब हा त्याचा मुघलांचा इतिहास निवेदन करणारा ग्रंथ. या ग्रंथाची रचना १७३५ मध्ये झाली. आज मुघलांच्या इतिहासाचे साधन म्हणून सुद्धा या इतिहासाला फारसे महत्त्व दिले जात नाही.

---

२५. पे. द. ४२ पृ. ३१.
२६. Grant Duff Vol. I, P. 80 *fn*. Letter to Gordon dt. 15–2–1821.

त्याच्या मते, मराठी साधनांच्या साहाय्याने शिवाजी आणि त्याचे वंशज यांचा इतिहास सांगणे सुलभ होते. पण शिवकालापूर्वी महाराष्ट्रात असणाऱ्या मुस्लिम राजघराण्यांचा इतिहास सांगण्यास मराठी साधने प्रायः कुचकामी आहेत. फेरिस्त्याचा इतिहास हा एक उत्तम साधनग्रंथ आहे. १७ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंतचा दक्षिणदेशाचा इतिहास रचण्यास हा प्रमाणभूत ग्रंथ मानता येईल. फेरिस्ताचा विशेष अभ्यास खानदेश जिल्ह्याचा कलेक्टर आणि ग्रँटचा समकालीन अधिकारी, कॅप्टन जॉन ब्रिग्ज याने केला होता. पुढे त्याने चार भागांत या पुस्तकाचे भाषांतर केले. फेरिस्त्याच्या विषयाच्या व्याप्तीबद्दल ग्रँटचे ब्रिग्जशी काही मतभेद होते.[२७]

ग्रँटला असे समजले होते की ब्रिग्जजवळ असलेल्या फेरिस्त्याच्या प्रतीत विजापूरच्या अस्तापर्यंतचा इतिहास आलेला आहे. प्रस्तुत संदर्भात तो लिहितो, " हे अशक्य आहे असे मला वाटते. कारण मूर्तिजा निजामशहा पहिला याच्याविषयी त्याने जे लिहिले आहे त्यावरून मला असे वाटते की फेरिस्ताने आपल्या इतिहासाची काही प्रकरणे त्या घटना घडल्याबरोबर लगेच लिहिली असावीत. १५८९ मध्ये दिलवरखानाचा एक साथीदार म्हणून एका लढाईत आपण गुंतल्याचे त्याने सांगितले आहे. १७ वे शतक सुरू झाल्यानंतरची हकीकत फेरिस्ताने लिहिली असे मानले तर याची दखल ' खाफीखान ' अथवा ' सियरुल मुताखरीन ' चा लेखक यांनी घेतली नाही असे सिद्ध होते." ( मार्च १८२२ ). या बाबतीत ग्रँटचे दृढ मत असे होते की फेरिस्ताचा इतिहास १५९६ सालीच संपला आहे. परंतु फेरिस्ता १६२६ साली मरण पावला असल्यामुळे ब्रिग्जच्या म्हणण्याप्रमाणे याच्या इतिहासात १७ व्या शतकाच्या पहिल्या दशकाच्या हकीकती येणे अशक्य नाही.

फेरिस्ता अशा रीतीने निकालात काढल्यावर फार्सी साधनांत, महाराष्ट्रातील मुसलमान राज्यांच्या इतिहासासाठी त्याला सर्वस्वी खाफीखानावर अवलंबून राहावे लागले. खाफीखानाची हस्तलिखित प्रत मिळविण्याच्या कामी त्याला यश आले खरे, पण त्याला मिळालेली प्रत सदोष होती. अर्थात काही माहिती ताडून पाहण्याच्या दृष्टीने ती प्रत उपयुक्त असली तरी त्यातील कित्येक भागाच्या यथार्थतेविषयी त्याच्या मनात शंका होती. मुंबई सरकारच्या नोकरीतील विल्यम इरस्किन आणि नागपूर रेसिडेन्सीमधील कॅप्टन गॉर्डन यांनी भाषांतरित केलेला खाफीखानचा

---

२७. History of the Deccan Ed. Briggs Vol. I, p. xli.

भाग वाचून त्याचे मत या लेखकाविषयी बरेच अनुकूल बनले होते. कॅप्टन गॉर्डनला तो लिहितो, " फेरिस्ताचे भाषांतर वाचले. या देशातील एकूण एक लिखित हकीकतींचा कपटा गोळा केला आणि मला असे दिसून आले की १६०० ते १६५० या कालखंडाच्या ज्ञानासंबंधी फार मोठी पोकळी आहे, आणि ही पोकळी भरून काढण्याचे महत्त्वपूर्ण काम माझ्या अपेक्षेपेक्षा खाफीखान फारच मोठ्या प्रमाणात करतो आहे.[२८]

याच पत्रात तो गॉर्डनला खाफीखानचे भाषांतर पूर्ण करण्याची विनंती करतो. ते काम अपुरे राहिले तर ती मोठी शोकांतिका होईल (१५-२-१८२१). विल्यम इरस्किनला देखील तो अशाच प्रकारची विनंती करतो. या दोघांनी स्वतंत्रपणे केलेल्या भाषांतरांच्या हस्तलिखित प्रती ब्रिटिश म्युझियम, लंडन येथे पाहावयास मिळतात.[२९]

मोहम्मद हनीफ या औरंगाबादच्या एका गृहस्थाने खाफीखानची एक चांगली प्रत त्याला दिली होती. खाफीखानाच्या अधिकृततेविषयी तो निरनिराळ्या लोकांच्याकडे चौकशी करीत असे, आणि लोकमत अजमाविण्याचा प्रयत्न करी. विजापूरच्या एका वृद्ध सय्यदने सांगितले, " खाफीखान हा सामान्यपणे मुघलांचा एका चांगला इतिहासकार आहे. पण तो शहाजहानाचा पक्षपाती वाटतो, आणि विजापुराविषयी त्याने लिहिले आहे ते काही अंशी चुकीचे आहे." (१५-२-१८२१).

विल्यम इरस्किनला तो लिहितो, " खाफीखानाकडे माझा कल अधिक झुकतो आहे. काही ठिकाणी हिंदूंनी केलेल्या विधानापेक्षा, खाफीखानाचे विधान सर्वस्वी भिन्न असले तरी त्या दोहोंत मला खाफीखानाला प्राधान्य द्यावे असे वाटते... शिवाजीच्या प्रारंभीच्या हालचालीपूर्वीच्या इतिहासकथनास खाफीखान बऱ्याच अंशी अधिकृत मानावयास

---

२८. ग्रँटचे पत्र, ता. १५-२-१८२१.

" After reading the translation of Ferishta and collecting every scrap of written legend to be had in this country I found an immense blank from the year 1600 to 1650, which Khufee Khan enables me to fill up much better than I expected."

२९. William Erskine's collection : Add 26615 and 26616. 2 vols. Translation by Captain Gordon, Add 26617-19 : 3 vols.

हरकत नाही. जेथे मराठी बखरीबद्दल शंका घ्यावयास वाव आहे तेथे खाफीखानाचा आधार नाकारण्यास कोणतेही सयुक्तिक कारण नाही.[३०]

मराठी साधनांपैकी चिटणीसी बखर आणि फार्सी साधनांपैकी खाफीखान याबद्दलचे ग्रँटचे विचार पाहिले म्हणजे या दोन दुय्यम प्रकारच्या इतिहासाच्या साधनांचा त्याच्या लिखाणावर विशेष प्रभाव का पडला आहे याची कल्पना येते. वास्तविक चिटणीसी बखर ही १९ व्या शतकात रचली गेली, आणि इतिहासाचे साधन म्हणून तिचे स्थान दुय्यम स्वरूपाचे आहे. खाफीखानाचा १७३५ साली रचलेला मुघलांच्या इतिहासाचा ग्रंथ आता त्याज्य मानला जातो. तेव्हा या दोन दुय्यम दर्जाच्या साधनांचा सर्रास वापर केल्याने निदान काही बाबतीत तरी ग्रँटच्या इतिहासाच्या अधिकृतपणाविषयी शंका घेण्यास वाव राहिला आहे.

ग्रँटच्या पत्रव्यवहारावरून तसेच त्याच्या पुस्तकातील उल्लेखावरून अलमगीरनामा, मासिर–इ–आलमगिरी अथवा अखबाराची त्याला माहिती होती असे दिसत नाही. राजाच्या दप्तरखान्यात जे फार्सी कागद सापडले त्यात शहाजहानची पत्रे (१६४९), औरंगजेब आणि त्याच्या नंतरचे बादशाहा (१६५६ ते १७०७) यांची फर्माने, सय्यद हुसेन (१७१८) याची पत्रे आणि बाळाजी विश्वनाथाने १७१९ साली बादशाहाकडून आणलेल्या सनदा होत्या. १७१९ ते १७२५ या कालखंडातील काही फार्सी कागद होते. ग्रँटने हे सर्व कागद पाहिले, त्यांच्या नकला केल्या. सर जदुनाथ सरकारांनी आपल्या 'हाऊस ऑफ शिवाजी' या ग्रंथात सातान्याच्या दप्तरखान्यातील फार्सी कागदांची जी इंग्रजी भाषांतरे प्रसिद्ध केली आहेत ती बहुधा ग्रँटने पाहिलेली असावीत. या संग्रहातील फार्सी कागदांच्या नकला भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रही आहेत. १७१९ च्या तीन सनदा एल्फिन्स्टन, ग्रँट या सर्वांनी पाहिल्या होत्या. ग्रँटने त्यांचा वापर आपल्या ग्रंथात केला आहे. मात्र आज त्या सनदा कोठे आढळत नाहीत. ग्रँटने

---

३०. ग्रँटचे पत्र, ता. २०–२–१८२१.

"....I am inclined to follow his authority in preference to any other though unduly different from Hindoo Statement in some points. ... .... Khafee Khan, however, upto the time when Sevajee commenced his career must be an authority where there is no better reason to doubt him than a Mahratta Bukar."

नेमकी कोणती पत्रें पाहिली याचा उल्लेख त्याच्या ग्रंथात अथवा पत्रव्यवहारात आढळत नाही. त्यामुळे नेमकी कोणती पत्रे आहेत आणि बाकीच्यांचे काय झाले याबद्दल निश्चित काही सांगता येत नाही.

ग्रँटला फार्सी भाषा अवगत होती. बॉम्बे बटालियनमध्ये 'फार्सी दुभाषा' हा एक त्याचा हुद्दा होता. कंपनीच्या नोकरास ही भाषा येणे आवश्यक मानले जात असे. असे असले तरी जॉन ब्रिग्ज, विल्यम इरस्किन, गॉर्डन ही माणसे हस्तलिखिते वाचण्यात जशी निष्णात होती तसा ग्रँट नसावा. कारण इतिहासलेखनासाठी मूळ फार्सी ग्रंथापेक्षा या मित्रांनी केलेल्या भाषांतराचाच त्याने प्रामुख्याने वापर केला आहे. प्रत्यक्षात, प्रतिदिनी वाढणारा हा फार्सी कागदांचा संचय त्याला तापदायकच वाटत होता. एल्फिन्स्टनने त्याला बजावले होते की उत्तरेकडील मुसलमानांचे इतिहास, हैद्राबाद येथील संग्रह मुस्ताफाने केलेले सियरुल मुताखरीनचे इंग्रजी भाषांतर--ज्याचे मूल्य सुवर्णासारखे आहे (२४-२-२२)- अशा ग्रंथाचे परिशीलन करण्याविषयी त्यास बजावले होते. फेरिस्ताने वापर केलेल्या साधनांची एक लांबलचक यादीही त्याने त्याला दिली होती. अर्थात ग्रँटला हे सारे पटत होते. पण वेळेच्या अभावी याकडे त्याला दुर्लक्ष करावे लागे. तो म्हणतो, "माझी साधनाची तयारी भक्कम आहे, पण त्यांची संख्या इतकी मोठी आहे, आणि हा विषयही कंटाळवाणा आहे. हे श्रम जर मला इतके तापदायक वाटतात, तर मग वाचकांची काय अवस्था होईल ?"[३१]

आपल्या इतिहासाच्या उत्तरार्धात ग्रँटला युरोपीय भाषातील कागदपत्रांचा, पुस्तकांचा, दप्तरखान्यांचा बराच उपयोग करून घेता आला. ऑर्म, स्कॉट वेअरिंग यांचे सिद्ध इतिहास, त्यासाठी त्यांनी वापरलेली साधने, मुंबई, कलकत्ता, सुरत येथील फॅक्टरी रेकॉर्डस्, फ्रेंच, डच, पोर्तुगीज यांचे रेकॉर्डस्, इत्यादि साधनांचा त्याने पुरेसा वापर केला आहे. अर्थात इंग्रजी साधनांवर त्याचा अधिक भर होता. १७३९ सालची वसईची

---

३१. ग्रँटचे पत्र, ता. २२-६-२२.
"I am getting stronger in authorities, but the size is tremendous, the subject tedious, and if the labour is sickening to me, it will be appaling to the reader."

मोहीम रंगविण्यासाठी त्याने पोर्तुगीज कागदपत्रे पाहिली होती. काही तारखा निश्चित करण्यासाठी त्याने पोर्तुगीज विजरईशी (गव्हर्नर) पत्रव्यवहार केला होता. १७८० मध्ये वडगावच्या चकमकीत इंग्रजांना मानहानी पत्करावी लागली आणि मराठ्यांशी नमते घ्यावे लागले. या संबंधीची कागदपत्रे पाहून ग्रँट म्हणतो की, "या काळात इंग्रज अधिकाऱ्यांनी एकमेकावर जे गदारोळ उठविले त्यामुळे त्यांच्याविषयी आपले मत प्रतिकूल झाले."[३२]

एल्फिन्स्टनने त्याला मॉस्टीन, मॅलेट, पामर यांचे अहवाल (dispatches), शिंद्यांच्या छावणीतून लिहिलेली अँडरसनची पत्रे, बॅरी क्लोज या पुण्यातील रेसिडेंटने दिलेली बाजीरावाची माहिती त्याने स्वतः मुंबई आणि बंगाल सरकारकडे सद्यःस्थितीचे वर्णन करणारी वेळोवेळी धाडलेली पत्रे, आशियाटिक रिसर्चेस या ग्रंथात प्रसिद्ध झालेली पानिपतासंबंधीची माहिती, पार्लमेंटरी रेकॉर्डस् इत्यादि साधने पाहण्याची सूचना केली होती (२७–४–२२). मॅलेट आणि पामर यांच्या अहवालातून मराठेशाहीत माधवरावाच्या मृत्यूपासून बाजीरावाच्या अधिकारयोगापर्यंत जे निरनिराळे कट, कारस्थाने, भांडणे, गुप्त करार झाले त्यांची माहिती मिळण्याची शक्यता होती. या अहवालाच्या नकला हव्या असल्यास, आपण कलकत्त्याहून आणवून देऊ असेही आश्वासन त्याने त्याला दिले होते. बंगालहून आणणे आवश्यक अशा कागदपत्रांची यादी त्याने दिली आणि या कामासाठी १०००/– रुपयापर्यंत खर्च करण्याची आपली इच्छा व्यक्त केली.[३३]

इंग्रजी साधनांचा वापर करताना साहजिकच ग्रँटला मोकळेपणा वाटत असे. त्यांचा त्याने मुक्तपणे वापर केला आहे. त्यामुळे त्याच्या इतिहासाच्या शेवटच्या भागात जितके बारीकसारीक तपशील आले आहेत, तितके प्रारंभीच्या भागात नाहीत. विशेषतः १७७४ नंतरचा काळ हा अधिक विस्तृतपणे लिहिला गेला आहे याचे कारण साधनांची अनुकूलता हेच होय. काही ठिकाणी एकेका सनासाठी त्याने स्वतंत्र प्रकरण लिहिले आहे.

---

३२. ग्रँटचे पत्र, ता. १२–४–२२.
"I am little disgusted with my Bombay friends when I find the acrimonious discussions which followed the convention of Wurgaom."

३३. बंगालातून ग्रँटने जे उतारे आणले ते बहुतेक सर्व 'ग्रँट डफचे कागद' या शीर्षकाखाली इंडिया ऑफीस लायब्ररी, लंडन येथे आहेत. MSS : EUR : D — 463–475 आणि B-109.

या खेरीज काही मराठी साधनांचे इंग्रजी भाषांतर त्याने करवून घेतले होते. उदाहरणार्थ, चिटणीसी बखर या कामासाठी नारायणरावांची खास नेमणूक केली होती. बाळाजीपंत नातूस त्याने समकालीन इतिहास रचण्याची विनंती केली होती. बाळजीने ही कामगिरी त्वरेने केली. बाळाजीपंताने लिहिलेला इतिहास मॉरिसकडून त्याने इंग्रजी भाषेत करवून घेतला.[३४] या गोष्टीचा उल्लेख कृतज्ञतापूर्वक ग्रँटने आपल्या पुस्तकात केला आहे. डेक्कन कॉलेज संग्रहातील एका यादीत म्हटले आहे, " बखर पावली, बहुत मेहरबानगी जाली पाहून परत पाठवू " अशा आशयाचे एक पत्र बाळाजीपंतास पाठविण्याची आज्ञा त्याने केली होती.[३५]

वरील विवेचनावरून ग्रँटने इतिहासाच्या साधनासाठी केलेल्या परिश्रमाची तर कल्पना येतेच, पण इतिहासाकडे पाहण्याच्या त्याच्या दृष्टिकोनाविषयी काही अंदाज करता येतो. इतिहासलेखनाचा जणु काय एक कारखानाच त्याने उघडला होता असे त्याच्या अविरतपणे चाललेल्या उपक्रमावरून वाटते. चिटणीस, पारसनीस, फडणीस आणि काही कारकून मंडळी दौती आणि फराच्या लेखण्या सरसावून कागदपत्रांचे अर्थ लावताहेत, चर्चा करताहेत, नकला, भाषांतरे करताहेत हे दृश्य जुलै १९, १८१९ नंतर जवळ जवळ नित्याचे झाले होते, असे म्हणावयास हरकत नाही. चिटणीसाला उलटसुलट प्रश्न विचारून सत्य काढून घेण्याचा तो सतत प्रयत्न करीत असताना दिसतो.

साधनांची जुळवणी होत असताना, इतिहासाच्या लेखनास हळूहळू त्याने प्रारंभ केला होता. एल्फिन्स्टन आणि इतर मित्र यांना तो आपली प्रकरणे परीक्षणार्थ पाठवीत असे. त्यांच्याशी झालेल्या पत्राव्यवहारावरून मराठ्यांच्या इतिहासाच्या रचनेच्या प्रगतीचे टप्पे आपल्याला सांगता येतात. अमूक एक भाग पूर्ण झाला, अमूक भाग इतक्या दिवसात पूर्ण करण्याचा संकल्प केला आहे, अशा तऱ्हेचे वृत्त तो आपल्या साथीदारांना देत असे. १८२१ च्या जानेवारीत तो म्हणतो, " माझा मित्र शिवाजी याच्याकडे लक्ष पुरविण्यास निवांत वेळच मिळत नाही. " ४ एप्रिल १८२१ च्या

---

३४. ग्रँट डफ विभाग २ पृ. ४७० *fn.*

३५. डे. कॉ. रु. ५५ फा. १२ : २९ दि. ८–९–१८२२.

पत्रात तो लिहितो, "या ऑक्टोबरपर्यंत शिवाजीवरील प्रकरण मी निश्चित पूर्ण करेन." त्याच महिन्याच्या शेवटी तो "मलिकंबरावरील प्रकरणातून सुटलो" असा सुटकेचा निश्वास टाकतो.

शिवचरित्र प्रथम वाटले होते तितके सोपे नाही याची त्याला कल्पना क्रमाक्रमाने येत होती. ऑक्टोबरचा संकल्प त्याला पूर्ण करता आला नाही. प्रकृती ढासळत होती, सत्तांतराचा दिवस जवळ येत होता, त्यामुळे त्याला निवांत वेळ मिळत नव्हता. "शेवटी अनेक वेळा खंड पडून माझे शिवचरित्र संपले (फेब्रुवारी, १८२२) असे तो आनंदाने कळवितो. संकल्पापेक्षा चार महिनेच फक्त अधिक लागले. त्यानंतर मात्र तो नेटाने कामाला लागतो. एप्रिलमध्ये तो लिहितो, "उद्याच्या डाकेसाठी संभाजी प्रकरण तयार आहे" (९-४-२२). दुसऱ्या दिवशी "एक प्रकरणी संभाजी आज डाकेत टाकला" (१०-४-२२) असे तो न विसरता कळवितो. पुढे दोन दिवसांनी तो कळवितो की, "राजाराम आणि १७०७ पर्यंतचा भाग लौकरच धाडीत आहे." (१२-४-२२)

या त्याच्या पत्रांवरून कोणता भाग केव्हा संपवावयाचा याचे वेळापत्रक त्याने मनाशी आखले असावे, आणि ती वेळ साधण्याची त्याची सतत धडपड चालली असावी असे दिसून येते. १७०७ पर्यंतचा म्हणजे औरंगजेबाचा मृत्यू आणि शाहूची सूटका येथपर्यंतचा इतिहास त्याने ३११ पानांत आटोपता घेतला आहे.[३६] यात पहिली सुमारे १०० पाने दक्षिणदेशाचा १००० पासूनचा इतिहास, बहामनी राज्य आणि त्याची शकले, मराठे सरदार आणि शिवपूर्वकाल याच्यासाठी वेचली आहेत. आणि पुढील सुमारे ८०० पाने ही १८ वे शतक रंगविण्यासाठी खर्च केली आहेत. यापैकी १९ व्या शतकासाठी २३४ पाने दिली आहेत.

संभाजीपर्यंतचा भाग पुरा करण्यास त्याला सुमारे ३ वर्षे लागली. याचे कारण साधनांची दुर्मिळता हे तर आहेच, पण ही दुर्मिळ साधने बरीच दुर्बोधही होती. प्रारंभीचा इतिहास म्हणजे जवळ जवळ ७०० वर्षांचा इतिहास (१००० ते १७०७) त्याला ⅓ भागात आटोपता घ्यावा लागला याचे प्रमुख कारण म्हणजे आवश्यक त्या साधनांचा अभाव

३६. येथे १९२१ साली प्रसिद्ध झालेली ६ वी आवृत्ती अभिप्रेत आहे. ही डेमी साईज आवृत्ती दोन भागांत असून, त्यात पहिला भाग ५८५ व दुसरा भाग ५३४ अशी एकूण १११९ पृष्ठे आहेत.

होय. पुढच्या $\frac{2}{3}$ भागासाठी त्याला प्रामुख्याने युरोपीय साधने उपलब्ध होती, आणि शेवटच्या १०–१२ वर्षांचा इतिहास तर त्याने प्रत्यक्ष अनुभवला होता. मराठ्यांचा इतिहास समाप्त करण्यात शेवटी शेवटी त्यानेही भाग घेतला होता. तेव्हा साहजिकच त्याचा शेवटचा भाग हा विस्तृत झाला आहे. एकेका वर्षासाठी एकेक स्वतंत्र प्रकरण तो यामुळेच लिहू शकला.

१७०७ ते १७७० पर्यंतचा इतिहास ऑगस्ट, १८२२ पर्यंत हातावेगळा करण्याचा मनोदय त्याने बोलून दाखविला आणि पानिपत म्हणजे १७६१ पर्यंतचा भाग त्याने २६ जुलैपर्यंत लिहून पूर्ण केला. १७८२ पर्यंतचा सालबाईच्या तहापर्यंतचा इतिहास शक्यतो लौकर पुरा करून त्यावर एल्फिन्स्टन आदि लोकांची मते घेण्यास तो फार उत्सुक होता. २५ नोव्हेंबरला त्याने सातारा सोडले आणि १२ जानेवारी १८२३ ला भारताचा निरोप घेतला. मध्यंतरीचा महिना दीड महिन्याचा काळ त्याने लोककथा गोळा करण्याच्या कामी आणि मुंबईच्या ऑफिसमधून काही अधिक माहिती जमा करण्यासाठी खर्च केला. अगदी शेवटच्या दिवसापर्यंत मराठ्यांच्या इतिहासाची घडण करण्यात तो गुंतला होता. कारण एकदा भारतदेश सुटला म्हणजे त्याला हे शक्य झाले नसते. जे १० वर्षे सतत खपूनही शक्य झाले नसते ते त्याने इतर सारे व्याप सांभाळून अवघ्या तीन वर्षांत पूर्ण केले हे निःसंशय कौतुकास्पद आहे.

८

# एल्फिन्स्टन

ग्रँट डफला मराठ्यांच्या इतिहासाची एवढी प्रचंड इमारत उभी करण्याच्या कामी अनेक इंग्रज आणि एतद्देशीय मित्रांची मदत घ्यावी लागली. याचा ऋणनिर्देश त्याने आपल्या प्रस्तावनेत मोठ्या नम्रतेने केला आहे.

पेशव्यांचा प्रदेश जिंकून घेतल्यानंतर, गव्हर्नर जनरल मार्कवीस ऑफ हेस्टिंग्जने या प्रदेशाची व्यवस्था लावण्याची संपूर्ण जबाबदारी एल्फिन्स्टनवर टाकली. पेशव्यांचा राजकीय आणि खाजगी पत्रव्यवहार त्याच्या हाती आला. पुण्याचा अधिकारी कॅप्टन हेन्री डंडास रॉबर्टसन याने एल्फिन्स्टनच्या आज्ञेनुसार ग्रँटच्या विश्वासू नोकरांना पेशव्यांच्या वाड्यातील असंख्य कागदपत्रांच्या नकला करण्याची परवानगी दिली. एल्फिन्स्टनची गव्हर्नर म्हणून नेमणूक झाल्यावर चॅपलिनची कमिशनरपदी नियुक्ती झाली. त्याचा साहाय्यक जॉन मॅकलिऑड (John Macleod) याने मराठ्यांच्या उत्पन्नाची तपासणी करून त्यातील महत्त्वाच्या भागाच्या नकला करून दिल्या. साताऱ्यातील कागदपत्र पाहण्यास फारशी अडचण नव्हतीच. पेशव्यांना कधीच पाहावयास न मिळालेले कागद पाहण्याचे भाग्य मला लाभले होते असे तो म्हणतो. एल्फिन्स्टन मुंबईचा गव्हर्नर झाला तेव्हा मुंबई येथील रेकॉर्ड पाहणे फार सोयीचे झाले. १७९५ पर्यंतचे सर्व सरकारी आणि गुप्त पत्रव्यवहार वाचून त्याने विस्तृत अशी टिपणे तयार केली होती. फ्रॅन्सिस वॉर्डन हा प्रमुख सचिव होता. त्याने सर्व सवलती तर दिल्याच, पण त्याने या रेकॉर्डातून संकलित केलेली स्वतःची टिपणे त्याला दिल्यामुळे त्याचे बरेच श्रम वाचले. सुरतेचा पोलिटिकल एजंट रोमर याने सुरतेचे जुने फॅक्टरी रेकॉर्डस् वाचून त्याच्या स्वखर्चाने नकला बनविल्या आणि त्या ग्रँटला धाडल्या; एवढेच नव्हे तर एक फार्सी हस्तलिखित मिळाले ते देखील धाडले. गोव्याच्या गव्हर्नराने त्याला काही पोर्तुगीज उतारे दिले.

लंडन येथील ईस्ट इंडिया हाऊसमध्ये असलेले भारतविषयक कागदपत्र पाहण्याची परवानगी कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनी दिली होती. अर्थात ही संमती मर्यादित स्वरूपाची होती. बंगालचा काही पत्रव्यवहार, आणि मराठी साधनांतून संकलित केलेल्या घटना पडताळून पाहण्यासाठी आवश्यक तो पत्रव्यवहार, जो त्याला मुंबईच्या ऑफिसात मिळाला नाही असा, एवढा भाग पाहण्याची परवानगी मिळाली होती. इंडिया हाऊसमधील अधिकाऱ्यांनी त्याला जुने कागद वाचण्याच्या कामी खूपच मदत केली. विशेषतः ऑर्मस्ट्रांग या चलाख आणि सहृदय अधिकाऱ्याची त्याला विशेष मदत झाली. इंडिया हाऊसचे हे सर्व रेकॉर्ड आता इंडिया ऑफिस लायब्ररीच्या स्वाधीन असून लंडन येथील ब्लॅक प्रायर विभागात नव्याने बांधलेल्या अकरा मजली इमारतीत व्यवस्थित ठेवण्यात आलेले आहे. संशोधकाला आवश्यक त्या सर्व सोयी उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत, आणि जगांतील सर्व भागातील लोक आपापल्या देशाच्या इतिहासाचे धागे जुळविण्यास येथे जमलेले असतात.

आपल्या स्वकीयाचा गौरवपूर्ण उल्लेख करताना, ज्या स्थानिक व्यक्तींनी अथवा घराण्यांनी त्याला या कामी मौलिक मदत केली होती त्यांना तो विसरलेला नाही. प्रत्येक व्यक्तीचा नावनिशीवार उल्लेख या प्रस्तावनेत आला नाही याचे कारण, ही प्रस्तावना प्रामुख्याने इंग्रज वाचकांसाठी लिहिली असल्यामुळे ती नामावली येथे देणे त्याला संयुक्तिक वाटले नसावे. पण आवश्यक तेथे तळटीपात त्याचा निर्देश त्याने केला आहे. देवस्थानचे दप्तर तसेच खाजगी संग्रह त्याच्या विनंतीनुसार स्थानिक अधिकाऱ्यांनी धुंडाळले होते. कैफियती, बादशाहाची आणि इतर राजांची पत्रे, खाजगी आणि सरकारी पत्रव्यवहार, प्रमुख घराण्यांच्या ताब्यात असलेली राजपत्रे, न्यायनिवाडे, फार्सी–मराठी हस्तलिखिते, इत्यादि साधने स्थानिक अधिकाऱ्यांच्या मदतीने, जाहीरनामे काढून, पडेल ती किंमत देऊन त्याने जमविली होती. यांतील हस्तलिखितांची संख्या शंभराच्यावर होती. यातील काही इतिहासावरील ग्रंथ त्याने लिहिलेल्या इतिहासाहून मोठे होते. ही सारी हस्तलिखिते त्याने इंग्रजीत उतरवून घेतली होती. काही मराठे सरदार आणि ब्राह्मण घराणी यांच्याशी त्याचे मित्रत्वाचे संबंध असल्यामुळे, इतर युरोपियन इतिहासकारांना जे साध्य झाले नाही ते ग्रँटला विनासायास मिळविता आले. या लोकांपैकी काहींनी तर इतिहास घडविण्याच्या कामी बरावाईट हातभार लावला होता. त्यामुळे त्यांच्याशी होणारी चर्चादेखील उपयुक्त ठरली. पण त्याहून विशेष म्हणजे आपले हक्क आणि वतने,

इनामे, नवीन राजवटीत प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी पुराव्यादाखल जे जुने कागद सादर केले ते ग्रँटला फार उपयुक्त ठरले. कित्येक मराठे आणि ब्राह्मण सरदारांनी मुक्तहस्ते त्याला अनेक महत्त्वाचे कागद तर दिलेच, पण निरनिराळ्या घटनांवरील आपली मते देखील मोठ्या आपुलकीने कळविली.

साताऱ्याच्या राज्यात हेन्री अँडॅम्स या आपल्या मित्राची 'रेव्हेन्यू सर्वेअर' म्हणून त्याने बरेच प्रयत्न करून नेमणूक करून घेतली होती. हा अत्यंत कष्टाळू आणि प्रामाणिक अधिकारी होता. विल्यम रिचर्ड मॉरीस या मुंबईच्या अधिकाऱ्यासमवेत त्याने ग्रँटकरिता अनेक मराठी कागदांचे, हस्तलिखितांचे भाषांतर केले होते. आपले दैनंदिन काम सांभाळून ग्रँटला कसलीही मदत करण्यास हे दोघेही मित्र सतत हजर असत. महाराष्ट्राचा नकाशा अँडॅम्सने बनविला आणि त्याचा वापर ग्रँटने आपल्या पुस्तकासाठी केला. हा नकाशा तयार करण्यासाठी मुंबई, मद्रास, गुजराथ येथून माहिती मागविण्यात आली होती.

युरोपियन कलावंतांनी काढलेली चित्रे, स्थानिक लोकांशी थोडेसे साम्य दर्शविणाऱ्या प्रतिमा ग्रँटने आपल्या इतिहासासाठी जमविल्या होत्या. विजापूरच्या अवशेषांची दोन चित्रे आणि इब्राहिम अदिलशहाच्या थडग्याचे अचूक चित्र ही मुंबईच्या लेफ्टनंट डब्ल्यू. डब्ल्यू. डॉवेल याने करून दिली होती. पण काही चित्रे छापणे अधिक खर्चाचे असल्यामुळे इच्छा असूनही ग्रँटला तो नाद सोडावा लागला.

पण इतिहासलेखनाच्या कामी त्याला खरी मदत केली ती एल्फिन्स्टनप्रमाणेच इतर इंग्रज मित्रांनी होय. प्रस्तावनेत ग्रँटने त्यांचा नामनिर्देश केला असला तरी त्यांनी केलेली मदत कशा स्वरूपाची होती याची कल्पना या मित्राशी त्याने केलेल्या पत्रव्यवहारावरूनच येऊ शकेल. या मित्रपरिवारात एडिंबराचा विल्यम इरस्किन, मुंबईचे कर्नल शुलधम (Shuldham) आणि व्हॅन्स केनेडी; सर जेम्स मॅकिनटॉश; जेम्स मिल, जेनकिन्स, ले. कर्नल जॉन ब्रिग्ज, जॉन मॅक्लिऑड यांचा समावेश होता. इतिहासाचे लेखन प्रायः त्याने साताऱ्यातच केले. लिहून होतील तशी प्रकरणे तो संबंधित मित्राकडे पाठवी, आणि त्यांच्या सूचनांप्रमाणे ती प्रकरणे सुधारून घेत असे. एल्फिन्स्टन, जॉन ब्रिग्ज, विल्यम इरस्किन, चॅपलिन, व्हॅन्स केनेडी यांनी केलेले साहाय्य विशेष मोलाचे होते.[1]

---

१. हा भाग ग्रँटने आपल्या ग्रंथाला जोडलेल्या प्रस्तावनेवर आधारित आहे.

मराठ्यांचा समग्र इतिहास लिहीत असताना ग्रँट डफला ज्या व्यक्तींनी साहाय्य केले त्यात माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टनचा हिस्सा फार मोठा आहे. या दोघांचे नाते गुरु-शिष्याचे होते. राजकारण आणि इतिहासलेखन या दोन विषयांवर या दोघांमध्ये १८१८ ते १८२२ या कालात अखंड पत्र-व्यवहार चालला होता. आणि पुढेसुद्धा कौटुंबिक, भारतीय राजकारण, आंतरराष्ट्रीय राजकारण, इत्यादि विविध विषयांवर अगदी शेवटपर्यंत, १८५८ पर्यंत त्याचा पत्रव्यवहार सुरू होता.

एल्फिन्स्टन स्वतः एक जाणता इतिहासकार होता. वास्तविक मराठ्यांचा इतिहास लिहिण्याचे मनसुबे तो स्वतःच रचीत होता. पण १८१७ पासून कामाचा व्याप सतत वाढत गेल्यामुळे त्याला आपला विचार नेहमी पुढे ढकलावा लागला. १९ जुलै १८१९ रोजी ग्रँटने जेव्हा मराठ्यांच्या इतिहासाचे लेखन करण्याचे आपले मनोगत भीत भीत त्याच्याकडे व्यक्त केले तेव्हा प्रथमच त्याने आपल्या मनात दडी धरून बसलेला हा विचार उघडपणे बोलून दाखविला. परंतु त्याचबरोबर आपल्या हातून हे काम तडीस जाणार नाही याची स्पष्ट चिन्हे दिसत असल्यामुळे ग्रँटच्या कल्पनेचे त्याने सहर्ष स्वागत केले, आणि त्याला प्रोत्साहन तर दिलेच पण आवश्यक ते साहाय्यही केले.

इतिहासलेखनासंबंधीच्या १९ व्या शतकात रूढ असलेल्या कल्पना एल्फिन्स्टन आणि ग्रँट डफ यांच्यामध्ये या विषयासंबंधी झालेल्या पत्र-व्यवहारावरून स्पष्ट होतात. इतिहासाची साधने, लेखनशैली, घटनांची मांडणी इत्यादि विषयासंबंधी एल्फिन्स्टनचे विचार कार्यवाहीत आणण्याचा प्रयत्न ग्रँट करीत असावा. परंतु एल्फिन्स्टनची सूचनात्मक पत्रे आणि ग्रँटच्या हातून उतरलेला इतिहास या दोहोंचा एकत्र विचार केला असता आपल्या गुरूचे विचार ग्रँटला पचविता आले नाहीत, ते पुरेपूर कार्यवाहीत आणता आले नाहीत असेच म्हणावे लागेल.

पेशव्यांकडून जिंकून घेतलेल्या प्रदेशासंबंधी आपला अहवाल १८१९ साली एल्फिन्स्टनने सादर केला. मराठ्यांच्या इतिहासाची रूपरेखा या निमित्ताने त्याची तयारी झाली होती, आणि मराठ्यांच्या ऐतिहासिक कार्याविषयी काही निश्चित मते त्याने बनविली होती. त्या अनुरोधाने तो ग्रँटला मार्गदर्शन करीत असे. मुघली साम्राज्याचा ऱ्हास आणि ब्रिटिश सत्तेचा उदय या संदर्भात साऱ्या घटनांचा पूर्ण विचार करूनच मराठ्यांचा इतिहास लिहिला पाहिजे असे त्याचे मत होते.

ग्रँटने प्रकरणे लिहून पाठविली की ती तो मोठ्या आस्थेने वाची आणि आपल्या सूचना ज्याला तो कानपिचक्या (censures) म्हणतो–निर्भीडपणे आणि विस्तृतपणे करी. वाचलेल्या प्रकरणात सुधारणा कोठे हवी, अधिक वाचन कोठे हवे, शैली कशी असावी, कोणता भाग गाळावा, कोणता भाग संदिग्ध वाटतो, इत्यादि सूचना तो करीत असे. एल्फिन्स्टन-वर त्याचा इतका विलक्षण विश्वास होता की, दुसऱ्या मित्रांनी केलेल्या सूचनादेखील विचारार्थ तो त्याच्याकडे पाठवीत असे. त्याची पद्धत सामान्यपणे अशी होती : ज्याच्याकडे प्रकरण वाचावयास दिले असेल त्याने आपल्या सूचना, दुरुस्त्या दुसऱ्या एका पानावर स्वतंत्रपणे लिहून पाठवाव्यात अशी त्याने विनंती केलेली असे. हेतू हा की एकाच्या मताचा दुसऱ्यावर परिणाम होऊ नये, वाचताना पूर्वग्रह बनू नयेत आणि निःपक्ष-पातीपणे आपल्या प्रकरणांचे परीक्षण व्हावे. (१४–३–१८२२)

एल्फिन्स्टनने केलेल्या सूचना केवळ उपयुक्त आहेत असे नाही, तर पुढे जी आपली मानहानी अथवा नाचक्की झाली असती तीपासून बचाव करणाऱ्या आहेत अशी त्याची भावना होती (२१–३–२२). "अपेक्षेपेक्षा अधिक दोषनिदर्शक अशा या सूचनांनी मला धीट बनविले आहे" असे तो म्हणतो.[२]

इतिहासलेखनातील प्रमुख भाग म्हणजे साधनचिकित्सा. प्रस्तुत संदर्भात कोणती साधने ग्राह्य आणि कोणती दुय्यम स्वरूपाची यासंबंधीचे विवेचन एल्फिन्स्टनने केले आहे. बखरी–तवारिखा ही काही इतिहासाची अव्वल दर्जाची साधने नव्हत. ग्रँटने त्यांचा वापर बराच केला आहे याची कल्पना एल्फिन्स्टनला आली असावी. कारण तो म्हणतो, "असंख्य अशा असंबद्ध बखरी आणि फुशारकी मारणाऱ्या तवारिखा यांमधून घटना निवडून त्यांची मांडणी करणे आणि त्यातून एक सुसंगत आणि अर्थपूर्ण इतिहास तयार करणे हे काम कठीणच आहे आणि ते फक्त तूच एकटा करू शकशील असा मला भरवसा आहे.[३] प्रसंगी तुला कल्पनेचा आधार

२. ग्रँटचे पत्र, ता. ९–४–२२.

"They give me much stronger encouragement than I had ventured to hope."

३. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २०–४–२२.

"...get at facts and combine them with judgement so as to make a consistent and rational history out of a mass of gossiping bakhars and gasconading tawareekhs."

घ्यावा लागेल तेव्हा आपल्या मनातील शंका व्यक्त करण्यासाठी 'बहुधा' 'वरकरणी' अथवा अशा आशयाचे शब्दप्रयोग तुला वापरावे लागतील. अर्थात या वाक्प्रयोगांचा तू अतिरेक करता कामा नये. जे उघड आहे, सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे ते सांगण्यात काही हशील नाही. या दोहोंचा मध्य साधणे यातच इतिहासकाराचे कौशल्य आहे."[४]

राजवाडे यांनी देखील ग्रँटने केलेल्या या बखरीच्या अतिरेकी वापराची दखल घेतली असून ते म्हणतात ग्रँट डफचा इतिहास म्हणजे बखरींची सुधारून वाढविलेली आवृत्ती होय. कारण यातील बरीचशी माहिती बखरीतूनच घेतली आहे. फरक येवढाच की मराठी बखरीपेक्षा हा इतिहास जास्त व्यवस्थित आहे.[५] येथे एक गोष्ट नमूद करावीशी वाटते ती ही की १८२९ साली कॅप्टन केपन आणि बाबा साने यांनी या इतिहासाचे मराठी भाषांतर केले आणि ग्रंथाचे नाव ग्रँट डफकृत "मराठ्यांची बखर" असेच दिले होते.

फार्सी साधने कोणती वापरावीत, फेरिस्त्याने कोणती साधने वापरली होती याची एक लांबलचक यादी त्याने ग्रँटला दिली होती. इंग्रजी साधने तर त्याला सुपरिचित होती. ही साधने प्राप्त करून देण्याबाबत त्याने हरप्रकारची मदत केली होती. पुण्याचा कमिशनर असताना आणि पुढे मुंबईचा गव्हर्नर झाल्यावर त्याने त्याला अनेक सवलती दिल्या होत्या.

इतिहास हा नेहमी साध्या, सोप्या आणि सरळ भाषेत लिहावा असे त्याचे म्हणणे होते. ग्रँटला लिहिलेल्या एका पत्रात तो म्हणतो, "आपल्या लिखाणात तू निश्चितपणे साधेपणा राखला पाहिजेस, आपण इतिहास अलंकारिक अथवा विद्वत्ताप्रचुर भाषेत लिहिला पाहिजे ही भावना बाळ-

४. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २०-४-२२.

"When you only conjecture you can put in 'probably' 'apparently' or some other phrase to mark doubt, and after all you must not do it too much, and must not explain what is obvious and light up noonday. The art of a historian is to hit the medium; of the two classes, brevity and obscurity are the least evils."

५. राजवाडे प्रस्तावना, खंड १ पृ. ३०-३१.



माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन

गण्याचे कारण नाही. अर्थात यामुळे लांबलचक आणि अलंकारिक भाषेने इवरलेली वर्णने तुला घालता येणार नाहीत. पण घटना आणि प्रसंग सामान्य माणसाला जसे दिसतील तसे ते सोप्या भाषेत रंगविले पाहिजेत. आपल्याकडे एक जुनी म्हण आहे, ज्या गोष्टीचे वर्णन तुला करावयाचे आहे, तीवर प्रथम खूप विचार कर आणि मग तुला जे काही म्हणावयाचे आहे ते शैलीचा वगैरे कसलाहि विचार न करता झरझर लिहून काढ."[६]

दुसऱ्या एका पत्रात त्याने त्याला ताकीद दिली आहे की प्रौढ आणि अलंकारिक शैलीचा तू स्वीकार केल्यास ते हानिकारक ठरेल.[७]

इतिहास म्हणजे केवळ कालानुक्रमाने मांडलेली घटनांची जंत्री नव्हे. घटनांचा अर्थ लावता आला पाहिजे, त्यांचा परस्परांशी असलेला कार्य-कारण भाव स्पष्ट करून दाखविता आला पाहिजे. इतिहासलेखनाचे हे तत्त्व समजावून देण्याकरिता म्हणून एल्फिन्स्टनने उदाहरणादाखल मराठ्यांच्या इतिहासातील अत्यंत उज्ज्वल आणि रोमहर्षक कालखंड इ. १६८०–१७०७ हा निवडला. या काळात मराठ्यांनी मोगली परचक्राशी निकराची झुंज दिली आणि स्वराज्य आणि स्वातंत्र्य यांचे रक्षण केले. न्यायमूर्ती रानड्यांनी याला मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाचा कालखंड म्हणून गौरविले आहे. पण तत्पूर्वी सिडने ओवेनने १८७२ साली प्रसिद्ध झालेल्या आपल्या पुस्तकात हा शब्दप्रयोग Maratha War of Independence

---

६. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २४–२–२२.
" you ought certainly to keep up a tone of simplicity and disregard of fine writing and this would of course exclude elaborate and high wrought descriptions, but scenes and events should be painted as they appear to a plain man and in plain language. It is an old maxim to think over thing to be described and then put down what you have in your mind without much attention to the expression. "

७. you are ruined, if you assume a stately formal style. (८–४–२२)

वापरला आहे. एक स्वतंत्र प्रकरण त्यावर आहे.[८] पण या लढ्याचे महत्त्व एल्फिन्स्टनने बरोबर टिपले होते. ग्रँटचे राजारामावरील प्रकरण वाचीत असताना सुचलेले विचार त्याने ग्रँटला कळविले. मराठ्यांच्या या अत्यंत गतिमान इतिहासामागील चैतन्य तू जाणून घे असे सांगून तो म्हणतो, "संताजी अथवा धनाजी वीस वीस हजार सैन्याचे नेतृत्व पत्करून मोहिमेवर निघतात, तेव्हा मला असे वाटते—कदाचित माझे विचार बरोबरही नसतील—की हे सैनिक विजापूर, गोवळकोंड्याच्या अवशेषांतून, दगडामातीतून निर्माण झाले आहेत, शिवाजीचे आणि संभाजीचे ते जुने सहकारी आहेत; दक्षिणदेशाच्या अवनतीच्या काळात उदयाला आलेले ते देशमुख पाळेगारांचे थवे आहेत; अथवा जुलूम-जबरदस्ती आणि नुकसानी यामुळे वैतागलेले, ज्या तऱ्हेच्या गुन्ह्यांमुळे त्यांना त्रास सहन करावा लागला होता, तशाच प्रकारचे गुन्हे करण्यास उद्युक्त झालेले ते नागरिक आणि रयत आहेत. समाजातील या साऱ्या थरांची हकीकत तू सांगितली नाहीस तर संताजी–धनाजीच्या मागे धावणारी ही सहस्रावधी सेना, पाताळातून तर वर आली नाही असा समज परक्या माणसाच्या मनांत निर्माण व्हावयाचा."[९]

एल्फिन्स्टनचे हे पत्र अतिशय महत्त्वाचे आहे. याचे कारण मराठ्यांच्या इतिहासाचे मर्म त्याला कळले होते हे यावरून दिसून येते. मराठ्यांच्या हालचालीमागे केवळ लुटारूपणा अथवा घातपाती कृत्ये

---

८. सिडने ओवेन, इंडिया ऑन द् इव्ह ऑफ ब्रिटिश कॉन्क्वेस्ट, पृ. १३९–१६९.

९. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २०–४–२२.

"When Santaji or Dhanaji starts up at the head of 20,000 men, it occurs to me, perhaps erroneously, that they are the debris of the armies of Bijapur and Golconda, the old followers of Shivaji and Sambhaji, the gangs of Deshmookhs and Poligars who sprung in the decline of the Deccan monarchies, and finally the citizens and peasants, who were driven by tyranny and spoliation to practice the crimes by which they had suffered; but unless you give some account of this, they will seem to a stranger to have started up from the earth."

करण्याचा हेतू नाही तर, एका विशिष्ट ध्येयाने प्रेरित झालेले हे लोक आहेत आणि ते साध्य करण्यासाठी सर्वस्वाचा त्याग करावयास ते सिद्ध झाले होते हे त्याने बरोबर हेरले होते. तेव्हा मराठ्यांचा इतिहास रचताना हे महत्त्वाचे सूत्र दृष्टिआड करता येणार नाही असे तो ग्रँटला समजावून देतो.

अर्थात हे सारे तत्त्वज्ञान ग्रँटला पचविता आले नाही, हे त्याच्या इतिहासाच्या स्वरूपावरून स्पष्ट होते. तो म्हणतो, "इतिहासकर्ते मराठे हे असे विचित्र नायक आहेत की त्यांनी निर्माण केलेल्या गोंधळाच्या वाढीच्या तपशीलात एक कंटाळवाणा असा तोच तोपणा आहे, आणि या काळात त्यांच्या हालचालींच्या निवेदनात मला रस निर्माणच करता येत नाही आणि म्हणूनच तुमची अशी समजूत झाली असावी की वाचकांचे लक्ष केंद्रित करण्यासाठी मी औरंगजेबासारखा एक निवेदनाचा बिंदू निश्चित केला पाहिजे."[१०]

औरंगजेब हा मध्यबिंदू कल्पून मराठ्यांचा १६८० ते १७०७ या कालखंडातील इतिहास रंगवावा असे एल्फिन्स्टनला वाटत असावे अशी ग्रँटने जी समजूत करून घेतली होती ती निराधार होती. एल्फिन्स्टनला नेमके काय म्हणावयाचे होते ते त्याला समजले नसावे. दक्षिणेच्या मोहिमेवर आलेल्या या बादशाहाविषयी आपले मत चांगले नसून, मोगलांचा इतिहास सांगून वाचकांच्या सहनशक्तीला निष्कारण ताण देण्याची आपली इच्छा नाही असे तो म्हणतो.[११]

वास्तविक पाहता एल्फिन्स्टनने आपल्या पत्रात औरंगजेबाचा चुकूनही उल्लेख केला नाही. त्याला फक्त इतिहासनिवेदनामागे काही हेतू

---

१०. ग्रँटचे पत्र, ता. २२–४–२२.
"The Marathas are such actors for the page of history and there is such a dreary sameness in the detail of the progress of the confusion they created that it is the total want of interest in them which makes you wish for some object on which to fix attention."

११. ग्रँटचे पत्र, ता. २२–४–२२.
"I hold a poor opinion of Aurangzeb from the time his entering on the Deccan War, and that I do not wish to tire the reader to death by narrating the Mughal history."

हवा, मध्यबिंदू हवा, एवढच सुचवावयाचे होते. महाराष्ट्रातील सुप्तशक्तींना कशी चेतना मिळाली, मराठे आपले भेदभाव विसरून मोगलांशी टक्कर देण्यास कसे एकत्र आले, याचे विवेचन त्याला अभिप्रेत होते. नुसत्या शुष्क घटना एकापुढे एक मांडत बसण्यापेक्षा, त्यामागे काही तात्त्विक भूमिका आहे का याचे विवेचन करणे आवश्यक आहे असे एल्फिन्स्टनचे म्हणणे होते.

ग्रँटला इतक्या तपशीलात शिरून इतिहास लिहिण्यास आवश्यक तेवढा अवधी नव्हता अथवा एल्फिन्स्टन एवढी त्याची प्रतिभेची झेप नव्हती असे मानणे भाग आहे. आणि याच कारणामुळे इतिहासातील या महत्त्वाच्या कालखंडावरील त्याचे निवेदन अगदीच निरस झाले आहे. आपल्या पुस्तकाची सुमारे ७५ पाने संभाजी ते शाहूचे आगमन या २७ वर्षांसाठी दिली आहेत, आणि घटनांचे वर्णन इतके निर्विकार झाले आहे की वाचणाऱ्याला या काळात येथे काही प्रचंड घडत होते असे मुळी वाटतच नाही. न्यायमूर्ती रानडयांनी या मराठयांच्या हालचालींना काही अर्थ होता, हे एक प्रकारचे लोकयुद्ध अथवा स्वातंत्र्ययुद्ध होते असा पुढे जो सिद्धान्त मांडला, त्याची कल्पना एल्फिन्स्टनला केव्हाच आलेली होती. रानडे यांनी एल्फिन्स्टनच्या या विचारांची दखल घेतली होती का ? कोलब्रुकने लिहिलेल्या एल्फिन्स्टनच्या चरित्रात हे पत्र आले आहे. हे पुस्तक १८८४ साली प्रसिद्ध झाले, आणि रानडयांचे विचार १८९४–९५ सालापासून घडत होते.

मराठयांच्या इतिहासाची मांडणी एका विशिष्ट पद्धतीने करावी अशी त्याची विचारसरणी होती. तो म्हणतो, "प्रथम तू आपल्या वाचकांना मराठयांच्या चालीरीतींची ओळख करून दे. मराठे लोक आणि त्यांचे पुढारी सतत त्यांच्या नजरेसमोर राहू देत. यामुळे मराठयांचे हेतू आणि कार्यपद्धती यांचे ज्ञान त्यांना होईल." (२१–३–२२). प्रस्तुत संदर्भात सतराव्या शतकात भारतात आलेल्या बर्नियर या फ्रेंच प्रवाशाच्या लेखनपद्धतीचा आदर्श आपल्यासमोर ठेवण्याविषयी तो ग्रँटला सुचवितो. एका दूरवरच्या देशातील लोकांच्या व्यवहाराची हकीकत निवेदन करावयाची म्हणजे इतिहास आणि प्रवासवर्णन यांचा सुंदर मिलाफ साधला पाहिजे. हे बर्नियरला चांगले साधले होते. मराठयांच्या इतिहासातील शिवाजी आणि शायिस्तेखान या प्रकरणाचे नमुन्यादाखल म्हणून एक उदाहरण एल्फिन्स्टनने घेतले. त्याला वाटते की इतिहासकाराने या दोन्ही पक्षातील लोकांची, त्यांच्या तळांची वर्णने दिली तर

हा प्रसंग अधिक चित्तवेधक होईल. शायिस्तेखान या मुघली सरदाराचा विलासी थाटमाट, त्याचा भव्य तंबू आणि त्याची दर्पयुक्त वागणूक एका बाजूला आणि दुसऱ्या बाजूला शिवाजीचे अर्धनग्न, रांगडे, साहसी आणि हुन्नरी मराठे जर उभे केले तर अगदी मोजक्या शब्दांत त्यातील विरोधाभास स्पष्ट होईल आणि साऱ्या प्रसंगाला एकप्रकारे उटाव येईल."[१२]

तो पुढे म्हणतो, "जेव्हा तू प्रथमच एखाद्या हल्ल्याचे वर्णन करशील तेव्हा लुटारूंचा तळ आणि त्यातील भयानक व्यक्ती याचे निःसंदिग्ध असे वर्णन दे."

कोणताही इतिहास वाचनीय आणि चित्तवेधक झाला पाहिजे असे एल्‌फिन्स्टनचे मत होते. ग्रँटने सादर केलेल्या हस्तलिखिताचा बराचसा भाग वाचून झाल्यावर त्याला असे वाटू लागले की, त्याने आपल्या ग्रंथाचे संभाव्य वाचक आपल्या डोळ्यापुढे ठेवून रचना केलेली नाही. आपला वाचक हा मोगलांचा इतिहास चांगला जाणणारा आहे आणि त्या इतिहासाचा धागा त्याला, मधून मधून कितीही क्रमभंग झाला तरी गवसेल अथवा तुटलेला धागा शोधून काढण्यासाठी मागील प्रकरणे उलटण्याचे परिश्रम तो घेईल हे गृहीत धरून इतिहास लिहिणे उचित ठरणार नाही. प्रस्तुत संदर्भात तो म्हणतो, "कार्यकारणभावाचा असा उत्कृष्ट संयोग तू साधला पाहिजेस की, ज्यायोगे परस्परातील संबंध विनासायास स्पष्ट होतील आणि वाचकांच्या ग्रहणशक्तीचाही अधिक्षेप होणार नाही."[१३]

---

१२. एल्‌फिन्स्टनचे पत्र, ता. २१-३-२२.

"When you bring Sivajee and Shayisteh khan together, contrast in a few touches the luxurious magnificence and pride of the Mohammedan with the hardy, bold and crafty character of the half-naked Mahratta."

१३. एल्‌फिन्स्टनचे पत्र, ता. १-४-२२.

"My great fault with you is that you think too well of your reader, you suppose him well acquainted with the Mogul history and you expect him to have the quickness to pick up a story after frequent interruptions, or the industry to turn back and search for the broken thread. Now I am afraid it requires a little more pains to beat good matter into ordinarry skills, you must

घटनांची विशिष्ट पद्धतीने मांडणी करणे आणि आपल्या निवेदन शैलीला सतत उजाळा देत राहणे हे नित्य चालू ठेवावे, असा सल्ला त्याने ग्रँटला दिला होता. युरोपातील वाचकांच्यासाठी प्रामुख्याने हे पुस्तक लिहिले जात असल्यामुळे त्या वाचकांना या इतिहासातील नायकांचा प्रथम पूर्ण परिचय करून देऊन मग इतिहासकथन केले पाहिजे (२१-३-२२). तसेच युरोपातील लोकांच्या अभिरुचीकडे लक्ष ठेवावे आणि त्यानुसार प्रसंगी आपल्या लेखनात बदल करावा असेही त्याने सुचविले होते. रोमचा प्रसिद्ध इतिहासकार गिबन याचा दाखला येथे त्याने दिला आहे. गिबनने आपल्या पुस्तकाची पहिली काही पृष्ठे सात वेळा लिहिली, आणि तरीसुद्धा त्याचे क्वचितच समाधान झाले असेल (१-४-२२).

आपल्या लिखणातील आणि विचारातील गोंधळ टाळण्याचा उत्कृष्ट मार्ग म्हणजे आपल्या विषयातील मान्यवर अशा अधिकारी व्यक्तींच्या ग्रंथांचे परिशीलन. त्याने ग्रँटला असे सुचविले होते की, युरोपात गेल्यावर त्याने आपले लिखाण एखाद्या साहित्यिकाला अथवा सिद्धहस्त लेखकाला दाखवावे, म्हणजे प्रस्तुत पुस्तकाचा विषय आणि त्याची मांडणी याबद्दल त्यांच्याकडून योग्य ते मार्गदर्शन होईल आणि आपले लिखाण वाचकांपुढे कसे सादर करावयाचे याचीही कल्पना येईल (५-१२-२२).

इतिहास निवेदन करीत असताना मधून मधून आख्यायिका, दंतकथा पेरण्याची शिफारस एल्फिन्स्टनने केली होती. अशा आख्यायिका गोळा करण्याचे काम आपल्या मुंबईच्या शेवटल्या वास्तव्यात ग्रँटने केले. आख्यायिकांमुळे वर्णने हुबेहूब तर होतातच, पण त्याचबरोबर निवेदनाच्या चाकांना वंगण घालण्याचे कार्यही साधते. मात्र सर्व प्रकारच्या कोट्या अथवा कसल्याही प्रकारचे गुप्त आघात या गोष्टी कटाक्षाने टाळल्या पाहिजेत. कारण असे लिहिणे इतिहासाच्या पद्धतीत बसत नाही असे तो आवर्जून सांगतो.[१४]

---

connect causes and effects so that the relation may be seen without an effort and yet without appearing to explain too much or to undervalue the worthy readers understanding."

१४. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. ५-१२-२२.

"You should endeavour to collect anecdotes and gather materials for picturesque descriptions. Such matter is required to grease the wheels of

एल्फिन्स्टनला ग्रँटच्या कर्तृत्वाबद्दल शंका नसली तरी त्याच्या लेखनशैलीवर तो फारसा खूष नव्हता असे दिसते. अर्थात आपले विचार तो मोठ्या विनयाने पण ठासून मांडीत असे. याचा परिणाम काही वेळा होत असावा. एका पत्रात तो म्हणतो, "अपेक्षेपेक्षा लौकर तुझी पहिली तीन प्रकरणे मी वाचून काढली. मला फार आनंद वाटला. आता तुझी निवेदनशैली पूर्वीपेक्षा बरीच सुधारली आहे, ती संथ आणि पक्व होत आहे. पूर्वीचे दोषही आता फारसे राहिले नाहीत."[१५]

ग्रँटने वाचावयास दिलेल्या प्रकरणाच्या गुणदोषांचे निर्भीडपणे तो विवेचन करीत असे. पानिपतासंबंधीचे त्याचे प्रकरण त्याला खूप आवडले. तो म्हणतो, "हे प्रकरण अत्यंत जिवंत आणि अतिशय रंजक असे वठले आहे. (...Paniput is lively and interesting in the highest degree.) अर्थात असे असले तरी त्यावरून परत एकदा सफाईचा हात फिरला पाहिजे, अनावश्यक गोष्टी त्यातून काढल्या पाहिजेत आणि अधिक चैतन्यकारक घटना आणि प्रभावी वर्णने त्यात आली पाहिजेत, असे त्याने सांगितले (१५-१०-२२). आपल्या गुरूच्या ह्या सूचनांचे काटेकोर पालन कदाचित ग्रँटने केले असावे. कारण त्याच्या इतिहासातील हे एक चांगले प्रकरण आहे असे राजवाड्यांनी आपल्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत केले आहे.[१६]

एल्फिन्स्टनची पूर्ण खात्री होती की, जेव्हा त्याच्या विषयाचा अभ्यास पक्का होईल, लेखनात तो बरीच मजल गाठेल, त्यावेळी आपोआपच त्याच्या लिखाणात सुधारणा होतील. त्याच्या वाचकांनाही या कालखंडातील घटना आणि संबंधित व्यक्ती यांचा अधिक परिचय होत जाईल,

---

your narrative. Above all you must cut out all jokes and sly hits of every description as quite unsuited to history."

१५. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २१-३-२२.

"I got sooner through your three first chapters than I had hoped. I read them with great pleasure. You have acquired a much more calm, matured historical style than you had at first, and have absolutely none of the faults that I used to attribute to you."

१६. राजवाडे प्रस्तावना, खंड १, पृ. २७.

लेखनात सहजता येईल आणि रचनाकौशल्य प्रतिदिनी वृद्धिंगत होईल असा आशावाद त्याने व्यक्त केला आहे. आता पुढे लिहू की नको असा प्रश्न ग्रँटने विचारला होता त्याला हे उत्तर म्हणून त्याने दिले आहे.[१७]

लेखनशैलीचा हा प्रश्न ग्रँटला नेहमीच भेडसावीत असे. वस्तुत: ज्ञानाचा कसलाही अभिनिवेश न बाळगता, अगदी साधी निवेदनपद्धती त्याला सातत्याने टिकवावयाची होती. दोनदा, तीनदा आणि प्रसंगी चारदा लिहूनसुद्धा आपण सुधारणा करण्यास तयार आहोत असे अभिवचन त्याने एल्फिन्स्टनला दिले होते (२१–३–२२). निवेदनशैलीबाबत त्याने केलेल्या सूचनांशी संपूर्णपणे सहमत असूनही त्याला ते प्रत्यक्षात उतरविता आले नाही. त्यामुळे त्याचे सारे लेखन, विशेषत: प्रारंभीचा भाग तपशीलाने भरलेला आणि कंटाळवाणा झाला आहे.

कल्पनाशक्तीची जोड देऊन प्रसंगी निवेदन करावे लागेल, आपल्या मनातील शंका 'बहुधा' 'कदाचित' इत्यादि वाक्प्रयोग वापरून व्यक्त कराव्या लागतील याची एल्फिन्स्टनला जाणीव होती. परंतु याचा अतिरेक टाळणे आवश्यक होते. आपले लिखाण सफाईदार का नाही, त्यात संदिग्धपणा का राहिला आहे, 'बहुधा' 'कदाचित' 'वरकरणी' असे अनिश्चितता व्यक्त करणारे शब्दप्रयोग आपल्याला का करावे लागले याचा ग्रँटने आपल्या मनाशी शोध घेण्याचा प्रयत्न केला होता. त्याला असे वाटत होते की कदाचित सतत भाषांतरे करीत राहिल्यामुळे आणि नवे काही चांगले वाचन न केल्यामुळे आपली भाषा धेडगुजरी बनली असावी. फार्सी, मराठी आणि पुष्कळशी हिंदुस्थानी यांच्या भेसळीचा आपल्या भाषेवर प्रभाव पडला असावा. तो म्हणतो, "माझ्या परीने मी निष्कर्ष काढले आहेत. जे काही या साधनांना सांगावयाचे होते ते थोडक्यात आणि व्यवस्थितपणे मांडण्याचा प्रयत्न मी केला आहे आणि त्यामुळेच

---

१७. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २१–३–२२.

"As you advance, your subject will extend and improve, your readers' interest will be excited by their acquaintance with the actors and the scene, and your own facility and power of composition will daily increase."

माझ्या लिखाणात ‘ बहुधा ’ ‘ कदाचित ’ ‘ वरकरणी ’ इत्यादि शब्दांचा सुळसुळाट झाला असावा.”[१८]

ग्रँटच्या लिखाणात काही उणीवा, दोष का राहिले याचा विचार करू लागल्यास असे दिसून येते की, त्याने हाती घेतलेल्या विषयाचे व्यापक आणि गुंतागुंतीचे स्वरूप, त्याला अभ्यासावयास लागलेल्या साधनसामुग्रीची वैशिष्टये आणि सर्वात अधिक तापदायक म्हणजे वेळेचे बंधन, या गोष्टी प्रामुख्याने या सदोषतेला कारणीभूत झाल्या असाव्यात. आपले दैनंदिन आणि अत्यंत कटकटीचे असे प्रशासनाचे काम सांभाळून त्याने इतिहास-लेखनाचे कार्य पूर्ण केले होते. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत अनेक आपत्तींना तोंड देत त्याने हे काम अवघ्या अडीच ते तीन वर्षांत पूर्ण केले होते. जीवघेणी डोकेदुखी सहन करून, कपाळावर थंड पाण्याच्या पट्टया लपेटून १८-१८ तास काम करून त्याने आपले मनोरथ पूर्ण केले. रात्र कोठे संपली आणि दिवस कोठे सुरू झाला याचेही काही वेळा त्याला भान राहात नसे.

मराठयांच्या इतिहासाचा आवाका फारच मोठा होता. सर्व उपलब्ध साधनांचे सखोल परीक्षण करणे त्याला शक्य नव्हते. १८२२ साल अखेरपर्यंत त्याला इतिहासलेखन संपविणे आवश्यक होते. कारण १८२३ च्या जानेवारीत तो दीर्घमुदतीच्या रजेवर मायदेशी जाणार होता. इंग्लंडमध्ये आवश्यक ती साधने आणि विशेषतः लेखनकार्यात मार्गदर्शन आणि साहाय्य मिळणे शक्य नव्हते. पुढे पुढे साधनांचा पसारा वाढू लागला. मित्रांनी अगदी प्रामाणिकपणे केलेल्या सूचनांचे प्रमाणही वाढू लागले, आणि अवधी तर थोडा राहिला होता. हे सारे आपल्याला जमेल आणि मनाशी योजलेला बेत तडीस जाईल असा भरवसा त्याला वाटेना. शेवटी शेवटी तर तो वैतागून गेला होता. “ आता मला माझ्या विषयाचे प्रेम राहिले नाही. केव्हा एकदा इंग्रजांच्या आगमनापर्यंत (म्हणजे शेवटपर्यंत) येतो असे मला झाले आहे. ” असे तो एका पत्रात म्हणतो (२२–५–२२).

---

१८. ग्रँटचे पत्र, ता. ३१–३–२२.

“ by the constant translation and the want of reading I suspect my idiom is a mixture of Persian, Maratha and abundance of Hindustanee. ... although I have generalized and condensed and arranged what I conceive they intend to convey, this is the reason of all my ‘ perhaps ’, ‘ probablys ’, ‘ mights ’ and ‘ apparentlys ’.”

फार्सी-मराठी साधनांच्या जंजाळातून बाहेर पडून इंग्रजी साधनांच्या प्रांतात येण्यास तो उत्सुक होता. मराठे-इंग्रज युद्धापासूनचा त्याचा इतिहास अत्यंत बोलका झाला आहे याचे कारण वर्ण्यविषयावरील त्याची पकड आणि कोणत्याही प्रश्नाला उत्तर देण्याची त्याची सिद्धता हे होय. आणि म्हणूनच ग्रँटवर टीका करताना ज्या परिस्थितीत त्याने इतिहासलेखन केले तिचा आपण विचार केला पाहिजे.

या सगळ्या अडीअडचणींतून शेवटी मराठ्यांचा इतिहास बराचसा पुरा झाला, तेव्हा एल्फिन्स्टन त्याला लिहितो, "सगळे अडसर बाजूला सारून तुझ्या मराठ्यांच्या इतिहासाने आता सुखरूप स्थळी प्रवेश केला आहे. बोटीने केपला वळसा घातला आहे आणि आता पुढचा प्रवास तर ज्ञात अक्षांशांतून व्हावयाचा आहे. आता तिला द्रुतगती प्राप्त होवो आणि ती इप्सित स्थळी पोहोचो हीच इच्छा."[१९]

मराठ्यांचा इतिहास १८१९ पर्यंत आणण्यास तो सांगतो. कारण मराठे आणि इंग्रज यांच्या संबंधामुळे या संपूर्ण इतिहासात एक नवीन प्रकारची रसनिर्मिती होईल असे त्याला वाटते (४-१-२३).

ग्रँटच्या परिश्रमांची एल्फिन्स्टनने सर्वत्र मुक्तकंठाने स्तुती केली आहे. त्याच्या ग्रंथाचे ऐतिहासिक वाङ्मयातील महत्त्व त्याला पुरेपूर पटले होते. तो म्हणतो, "तुझे पुस्तक श्रेष्ठ आहे. अज्ञात अशा कितीतरी गोष्टींबद्दल असणारे औत्सुक्य तुझ्या पुस्तकामुळे पूर्ण होईल. मराठ्यांच्या मोठेपणाची सारी बीजे वाचकांचे संपूर्ण समाधान होईल इतक्या उघडपणे येथे मांडली आहेत. तुझा 'मराठ्यांचा इतिहास' एक मौलिक आणि लोकप्रिय ग्रंथ ठरेल याबद्दल माझ्या मनात तिळमात्र शंका नाही."[२०]

---

१९. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. १५-१०-२२.

"Maratha history crossed through great barriers, and entered into safer grounds......to have now weathered the Cape and be sure of a safe voyage, through known latitudes now before her, well may she speed and fairly finish her intent."

२०. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. ८-४-२२.

"This book is excellent and satisfying curiosity on many points till unknown. All the seeds of the Maratha greatness are laid open to the

आपल्या पूर्वीचा पुण्याचा रेसिडेंट कर्नल बॅरी क्लोज यास ग्रँटच्या संकल्पित इतिहासासंबंधी लिहिताना तो म्हणतो, "हा एक उत्कृष्ट इतिहास-ग्रंथ होईल. शिवाजी, संभाजी, राजाराम या व्यक्ती हैदर आणि टिपू यांच्या-इतक्या सुलभतेने आणि स्पष्टपणे आता प्रकाशात आल्या आहेत."[२१]

एल्फिन्स्टनबद्दल वाटणारी कृतज्ञता त्याने अनेक रीतींनी व्यक्त केली आहे. आपले हे साहित्यिक अपत्य त्यालाच अर्पण करावयाचे त्याने मनाशी योजिले होते. ग्रँटच्या या कल्पनेला उद्देशून एल्फिन्स्टन म्हणतो, "प्रकाशित होणाऱ्या तुझ्या ग्रंथात माझा उल्लेख करण्याच्या तुझ्या संकल्पाने माझा फारच गौरव होत आहे. तुझे हे हस्तलिखित प्रसिद्ध होण्याची मी वाट पाहात आहे."[२२]

ग्रँटच्या मराठ्यांच्या इतिहासाचा प्रारंभ एल्फिन्स्टनच्या अर्पण-पत्रिकेने झाला आहे आणि १८१७–१८ साली ज्या चातुर्याने त्याने पेशव्यांचा प्रदेश काबीज केला आणि कंपनीची राजवट स्थिर केली त्या महान कार्यावर स्तुतिसुमने उधळून या ग्रंथाची सांगता झाली आहे.

इंग्लंडच्या परतीच्या प्रवासीत जर काही अपघाती मृत्यू घडला तर आपली सारी साधनसामग्री एल्फिन्स्टनकडे पोहोचवावी अशी विनंती त्याने बोटीच्या अधिकाऱ्यांना केली होती. मराठ्यांच्या इतिहासाची पूर्ती आपल्याकडून झाली नाही तर तोच एक हे काम पूर्ण करू शकेल असा त्याला भरवसा होता ( २९–१२–२२ ).

पुढे १८२९ साली त्याला पुत्ररत्न झाले तेव्हा त्याचे नाव माऊंट-स्टुअर्ट एल्फिन्स्टन असे ठेवून गुरूविषयीचे प्रेम व्यक्त करण्याची संधी त्याने वाया जाऊ दिली नाही. एल्फिन्स्टनने भारताचा इतिहास लिहिला.

---

complete satisfaction of the reader. I have no doubt whatever, that the Maratha History will be a valuable and even a popular work."

२१. बॅरी क्लोजला एल्फिन्स्टनचे पत्र, ता. ५–५–१८२२.

"It will be an excellent history; Sivajee, Sambhaji and Rajaram now stand in full light as simplified and intelligible as Hyder and Tippo."

२२. एल्फिन्स्टनचे ग्रँटला पत्र, ता. ४–१-१८२३.

"I am much flattered by your proposed notice of me in your publication, I wish I saw it in print."

त्यात मराठ्यांसंबंधी जेथे जेथे उल्लेख आला तेथे त्याने ग्रँट डफच्या इतिहासाचा आवर्जून निर्देश केला आहे. एल्फिन्स्टनशी त्याचा पत्रव्यवहार अगदी त्याच्या मृत्यूपर्यंत म्हणजे १८५८ सालापर्यंत चालू होता. मराठ्यांच्या इतिहासाचा खप कसा कमी आहे, आपण परीक्षणासाठी हे पुस्तक कसे दिले नाही इत्यादि इतिहासविषयक बातम्यांबरोबरच आपल्या खाजगी जीवनातील घडामोडी, शेतीव्यवसाय, कुटुंबीय मंडळी, आजार इत्यादि घरगुती विषयांवर त्याने लिहिले आहे. प्रसंगी युरोपचे राजकारण, साताऱ्यातील घटना यांवरही त्याने आपली मतें एल्फिन्स्टनपुढे व्यक्त केली आहेत. मराठ्यांच्या इतिहासाचा एवढा प्रचंड ग्रंथ लिहिणाऱ्या ग्रँट डफने आपल्या उर्वरित आयुष्यात एल्फिन्स्टनला पत्रे लिहिण्याखेरीज दुसरे काहीही लिखाण केले नाही. एल्फिन्स्टनवरील त्याची ही भक्ती अजोड आहे.



९

# साथीदार

एल्फिन्स्टन हा त्याचा प्रमुख साथीदार असला तरी इतर अनेक मित्रांनी त्याची शंकास्थळे दूर करून त्याच्या इतिहासलेखनाच्या प्रगतीला हातभार लावला होता. या लोकांशी त्याने ज्या विविध विषयांवर चर्चा केली आहे त्यावरून आपला इतिहास शास्त्रशुद्ध आणि बिनचूक व्हावा यासाठी त्याने केलेल्या प्रचंड धडपडीची कल्पना येते. या त्याच्या साथीदारांत व्हॉन्स केनेडी, जॉन ब्रिग्ज, विल्यम इरस्किन, पॉटिंजर, चॅपलिन इत्यादि अधिकाऱ्यांचा उल्लेख करता येईल.

व्हॉन्स केनेडी[1] (१७८४–१८४६) हा कोशकार, पौर्वात्य भाषा आणि संस्कृती ह्यांचा अभ्यासक म्हणून सुपरिचित आहे. एक कॅडेट म्हणून तो १८०० साली मुंबईस आला. एल्फिन्स्टनच्या काळात फार्सी आणि संस्कृत भाषांचा जाणकार म्हणून त्याने नाव संपादन केले होते. १८१९ ते ३१ या काळात मुंबईच्या 'बॉम्बे लिटररी सोसायटीचा (हीच पुढे 'बॉम्बे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी' बनली) चिटणीस होता. ग्रँट आपल्या इतिहासासाठी अनेक प्रकारची साधने गोळा करीत असे, त्यात ताम्रपटही असत. कोकणात दौऱ्यावर असताना त्याला १२ व्या शतकातील पन्हाळचाच्या राजाचा एक ताम्रपट मिळाला. त्याची सविस्तर माहिती आणि आपली मते त्याने व्हॉन्स केनेडीला पत्रद्वारे कळविली (११ जाने. १८२१). चर्चेचा विषय होता तगर. ग्रँटचे हे पत्र म्हणजे एक उत्कृष्ट शोधनिबंधच मानावा लागेल.

साताऱ्याच्या एका ब्राह्मणाने त्याला एक संस्कृत ताम्रपट दिला होता. याचे तीन भाग होते व तो एका कडचाने चांगला बांधला होता. डॉ. टेलर-कडून त्याचे भाषांतर त्याने करवून घेतले. ग्रँटला संस्कृत येत नव्हते. डॉ. टेलरने केलेले भाषांतरही सदोष होते तरी परंतु त्यात उल्लेखिलेल्या

---

१. गं. दे. खानोलकर : अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक, प्रथम खंड, भाग दुसरा (पुणे, १९६६ दु. आ.) पृ. १२७–३३.

'तगर' या शहराचा त्याला शोध घ्यावयाचा होता आणि १८२०–२१ मध्ये त्याने यासंबंधी व्यक्त केलेले या पत्रातील विचार अत्यंत महत्त्वाचे आहेत. आपल्या पुस्तकात तगरविषयी त्याने ५–६ ओळीच लिहिल्या असल्या तरी तेवढी माहिती लिहिण्यासाठी त्याने केलेली चर्चा ही अत्यंत मौलिक स्वरूपाची आहे. प्रस्तुत विषयावर लिटररी सोसायटीच्या मासिक पुस्तकात त्याने एक लेखही लिहिला होता. तो सिद्धान्तरूपाने वाचकांच्या पुढे ठेवण्यापूर्वी त्याने व्हॉन्स केनेडीबरोबर चर्चा केली होती.[२]

तगर हे ठिकाण नेमके आहे कोठे याबद्दल विद्वानांत कित्येक दिवस वाद सुरू होते. श्री. राजवाडे यांनी इतिहास आणि ऐतिहासिक मासिकात 'तगर ऊर्फ तगरेश्वर' यासंबंधी लेख लिहून या प्रश्नाची ऐतिहासिक दृष्टचा चर्चा करून आपले मत मांडले आहे.[३] टॉलेमी आणि पेरिप्लसचा कर्ता या दोघांनी या तगरचा उल्लेख केला असल्याने ग्रीकांना ते ज्ञात होते असे मानता येईल. मराठचांच्या इतिहासाच्या साधनांत राजवाडचांना तगर शब्द कोठेही आढळला नाही. बॉम्बे लिटररी सोसायटीने डॉ. टेलरच्या नावे छापलेल्या एका ताम्रपटात तगरचा उल्लेख आला आहे, तो ताम्रपट ग्रँटनेच मिळविला होता. राजवाडचांनी असे विधान केले आहे की, डॉ. टेलर यांनी दिलेली माहिती ग्रँट डफने आपल्या बखरीत उतरून घेतली, हे विधान वस्तुस्थितीला धरून नाही. हा ताम्रपट ग्रँटकडूनच टेलरला मिळाला आणि ग्रँटने स्वतंत्र लेख लिहून या विषयावरील आपली मते प्रसिद्ध केली होती. राजवाडचांनी या लेखाचा उल्लेख केला नाही. ग्रँटने आपल्या तगर शहरासंबंधी विद्वानांनी काय कयास केले हे प्रथम थोडक्यात पाहून मग ग्रँटचे विचार जाणून घेणे मनोरंजक ठरेल.[४]

व्हिन्सेंट आणि विल्फर्ड यांच्या मते देवगड ऊर्फ दौलताबाद हेच तगर होते. भगवानलाल इंद्राजी यांनी 'जुन्नर' शहराशी त्याचा संबंध जोडला. यूलच्या मते तगर म्हणजे गुलबर्गा असावे. भांडारकरांनी धारुरचे नाव घेतले तर कॅंपबेल बंगालच्या किनाऱ्यावर ते शोधू लागला. फ्लीटने

---

२. ग्रँट डफ भाग २, पृ. २३, तळटीप ४ पाहा. लिटररी सोयायटी भाग ३ मध्ये हा निबंध प्रसिद्ध झाला आहे.

३. इतिहास आणि ऐतिहासिक भाग १ ला, खंड १ ला, पृ. २५७–७१.

४. इतिहास आणि ऐतिहासिक पृ. २५८.

प्रथम तगर हे करवीरच होय असे मत मांडले होते. पुढे त्याने बीड, धारुर असे करीत उस्मानाबाद जिल्ह्यातील नळदुर्गपासून जवळ असलेले तेर हेच ग्रीकांना ज्ञात असलेले तगर हे शहर होय असा निष्कर्ष काढला आणि तो आता मान्य झाला आहे.

राजवाडे यांनी आपल्या लेखात साधकबाधक चर्चा करून तेर हे कनकगिरीच्या उत्तरेस असून ही दोन्ही ठिकाणे शहाजीराजे यांस काही काल जहागीर होती असे म्हटले आहे. तगर ऊर्फ तगरेश्वराशी संबंध जोडून हे स्थान बादामी, गदग, होस्पेट व बल्लारी ह्यांच्या टप्प्यात १५ पासून ३० कोसांच्या अंतरावर आहे. अर्थात राजवाड्यांचा हा तर्क बरोबर नाही हे आता सर्वमान्य झाले आहे.[५]

पण ग्रँटचे याबाबत काय विचार होते हे जर आपण जाणून घेण्याचा प्रयत्न केला तर आज मान्य झालेल्या ठिकाणाच्या संदर्भात ते मनोरंजक ठरेल. तेर हे गावाचे नाव त्याने दिले नाही. पण ते गोदावरी काठी आणि बीड शहराच्या ईशान्येस असावे असा आपला तर्क व्यक्त केला आहे. (it was probably situated on the bank of the Godavery, a little to the north-east of the modern town of Bheer.) आज मान्य झालेल्या सिद्धान्ताप्रमाणे तगर ऊर्फ तेर हे उस्मानाबाद जिल्ह्यात असून गोदातीराचा त्याचा कोठेच संबंध येत नाही हे खरे असले तरी उस्मानाबाद आणि बीड जिल्ह्याच्या सरहद्दी इतक्या लागून आहेत की ग्रँटचे निष्कर्ष पाहून तो योग्य मार्गाने चालला होता असे अनुमान काढावयाला प्रत्यवाय नसावा.

तगरचा शोध लावण्याचा प्रयत्न करणारा ग्रँट पूर्वीचा संशोधक म्हणजे मेजर विल्फर्ड होय. त्याचे मत तगर म्हणजे दौलताबाद होय. आजचे दौलताबाद अथवा देवगड ज्या ठिकाणी वसले आहे त्याच ठिकाणी पूर्वीचे शहर तगर हे होते. ग्रँट या मताशी सहमत नव्हता. मेजर विल्फर्डने पेरिप्लसचा आधार घेतला होता. पैठणच्या पूर्वेस दहा दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर तगर आहे, आणि भडोचच्या दक्षिणेस २० दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर पैठण असून तगरकडे जाणारा रस्ता बालाघाट डोंगरातून जातो. त्याने भडोच ते पैठण हे अंतर २१७ मैलांचे धरले

५. इ. ऐ. पृ. २७१, २६९.
दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड २ रा.
—तेर येथील चार शिलालेख—ग. ह. खरे. पृ. ७४–८४.

आहे. ग्रँटच्या मते नंदुरबार आणि साल्हेरमुल्हेरचे इंग्रजी व्यापारी अंकाई-टंकाई घाटातून गोदावरीकडे येण्यास जो रस्ता वापरीत होते, त्या रस्त्याने भडोचपासून निघून ते २१७ मैल अंतर कापून आले तर गोदावरीनदी-काठच्या पुणतांबे (अहमदनगर जिल्हा) येथे येतील. पैठण हे या स्थळा-पासून ५० मैलांवर अथवा ५ दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर आहे. तेव्हा पेरिप्लसमध्ये जो प्लुटनाह ( Plutanah ) असा उल्लेख आहे तो पैठणसंबंधी नसून पुणतांब्यासंबंधीचा आहे, आणि पैठण अथवा पट्टम हे जे प्रतिष्ठान या शब्दाचे अपभ्रंश आहेत ते मुंगीपैठणासंबंधीचे आहेत. पैठणहून दौलताबाद पूर्वेस साधारणपणे ३५ मैलांवर आहे. त्यामुळे पैठणहून दहा दिवस असे मानले तर दौलताबाद हे ठिकाण येत नसून त्याच्याही पुढे पूर्वेच्या दिशेने जावे लागते. म्हणजे आपण बीड जिल्ह्यात येतो.

दुसरा प्रश्न देवगिरी ही राजधानी केव्हा होती ? पहिली पठाणांची स्वारी ( त्याला येथे अल्लाउद्दीन खिलजी अभिप्रेत आहे. ) झाली तेव्हा देवगड अथवा देवगिरी ही राजधानी होती. परंतु ती राजधानी कशी झाली—काही क्रांतीमुळे अथवा स्वच्छेने, हे सांगणे कठीण आहे. पैठणच्या शालीवाहनांची सत्ता वाढली, आणि प्रचलित सरकारविरुद्ध बंड करून दुसरी राजवट, दुसऱ्या ठिकाणी निर्माण होणे शक्य आहे. परंतु तगरचे राजे शालीवाहनांची सत्ता मानीत होते किंवा ते त्यांच्या वर्चस्वाखाली होते असे कोठेही आढळत नाही. तेव्हा तगरच्या राजाने आपले राजधानीचे शहर बदलले असावे, अथवा एक मोठी बाजारपेठ म्हणून पुढील काळात तगर भरभराटीस आले असावे, असा अंदाज करावयास काहीच पुरावा नाही. तेव्हा देवगिरीचा आणि तगरचा तसा अर्थाअर्थी काही संबंध नसून ही दोन्ही अगदी भिन्न आहेत. विल्फर्डने ज्या ताम्रपटाचा आधार घेतला आहे त्यात फक्त कोकणातील १४०० ग्रामांचा अधिपती अरिकेसरी देवराज याने तगर शहराचा अधिपती शिलाहार वंशातील जीमूतवाहनाशी आपला संबंध जोडला आहे असा उल्लेख आहे.

मेजर विल्फर्डचे मत कर्नल विल्क्स, मिसेस विल्क्स आणि एडिंबरा रिव्ह्यू हे मासिक यांनी ग्राह्य मानले आहे. पण पुणतांबे, पैठण ही ठिकाणे जर नकाशावर पाहिली तर विल्फर्डच्या निवेदनातील त्रुटिते लक्षात येतील असे ग्रँटचे म्हणणे होते. थोडक्यात, तगर, पैठण आणि देवगिरी ही एकाच विभागातील पण अगदी भिन्न अशी शहरे होती, आणि निरनिराळ्या काळात त्यांना महत्त्व प्राप्त झाले होते. या भागातील जिल्हाधिकाऱ्यांनी मनावर

घेतले तर खूप जुनी माहिती मिळू शकेल, आणि दक्षिणदेशच्या या प्राचीन शहराच्या इतिहासावर बराच प्रकाश टाकता येईल असे ग्रँट म्हणतो.

तगरसंबंधी किती व्यवस्थित विवेचन ग्रँटने केले आहे हे त्याने व्हॉन्स केनेडीला लिहिलेल्या वरील पत्रावरून कळून येईल.[६] डॉ. टेलरने दिलेली माहिती ग्रँटने आपल्या बखरीत उतरून घेतली आहे हे राजवाड्यांचे विधान बरोबर तर नाहीच, पण लिटररी सोसायटीच्या अंकात ग्रँटने स्वतः लिहिलेल्या टिपणांचा त्यांनी उल्लेख देखील केला नाही याचे आश्चर्य वाटते. केनेडीने ग्रँटवर मोठी धारदार टीका केली होती. एल्फिन्स्टनला ही केनेडीची टीका कळविताना ग्रँट लिहितो, " मी या क्षणी युरोपला परत जाण्याचा इतका निश्चय केला आहे की, प्रकृती ठीक राहील असे कोणीही आश्वासन दिले तरी मराठ्यांचा इतिहास पुरा करण्यासाठी म्हणून मी आता येथे मुळीच राहणार नाही. व्हॉन्स केनेडीने माझ्या इतिहासाच्या पहिल्या भागावर असे काही कोरडे ओढले आहेत की, माझ्या रक्ताने माखलेला तो कोरडा त्याच्या हातात असून तो माझ्या इतिहासाच्या इतर भागावर चमकावला जातो आहे असे मला वाटते. अर्थात केनेडीची टीका योग्य आहे असे मला खरोखर वाटते."[७]

केनेडीचा मुख्य आरोप असा होता की ग्रँटच्या लिखाणातील सुरवातीचा भाग अतिशय गोंधळ निर्माण करणारा आहे. त्याचे सारे म्हणणे ग्रँटने एल्फिन्स्टनकडे विचारार्थ पाठविले होते. त्याच्या मते केनेडीच्या तक्रारीचे मूळ हे या विषयाच्या स्वरूपातूनच उद्भवते. अर्थात आपण निराश झालो नाही अशी कबुली देऊन तो म्हणतो की केनेडीच्या प्रत्येक शब्दाशब्दाचा मी पूर्ण विचार करीन. तो पुढे म्हणतो, " आठ महिन्यांपूर्वी

---

६. व्हॉन्स केनेडीप्रमाणे ब्रिग्जलाही त्याने तगरसंबंधी पत्र लिहिले होते. (१५-८-१८२०)

७. ग्रँटचे पत्र (२९-१२-२२).

" Vans Kennedy has given my Ist volume such a castigation, the bash clotted with my blood is still whirling in his hand over the other volumes, and I really think that most of what he has said is very fair. "

तुम्ही जर केनेडीसारखे कडक बनला असता तर मी काहीही खंत न मानता, अगदी नम्रपणे हे माझे लिखाण अग्नीच्या स्वाधीन केले असते."[८]

या पत्राला एल्फिन्स्टनने लगेच उत्तर पाठविले. केनेडीच्या सूचना कठोर असल्या तरी प्रामाणिक आणि धीटपणे केलेल्या आहेत. त्यात सहानुभूतीचा अंशही आहेच. त्याने केलेली विधाने ही सर्वसाधारणपणे बरोबर असून त्यांचा काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. अर्थात त्या वाचून खच्ची न होण्याबद्दल तो त्याला बजावतो. तो म्हणतो, "किती झाले तरी हा तुझ्या इतिहासाचा कच्चा खर्डा आहे. अर्थात तो फार मौलिक आहे. पूर्वी कधीही सांगितल्या नाहीत इतक्या घटना यात आल्या आहेत. आणि तू व्यक्त केलेले विचार विस्तृत नसले तरी बरोबर आणि न्याय आहेत...केनेडीने एक शिवाजी सोडला तर तुझ्या पुस्तकाचा अगदी सुमार भाग वाचला आहे. हिंदूंच्या आणि मुसलमानांच्या इतिहासाला तुझ्या पुस्तकात गौणपदच राहणार."[९]

एल्फिन्स्टनच्या विश्वासातली जी काही थोडी माणसे होती त्यात कॅप्टन जॉन ब्रिग्ज याचा उल्लेख करावा लागेल. पेशव्यांच्या विरुद्ध १८१७–१८ साली पुण्याहून होणाऱ्या हालचालीत एल्फिन्स्टनबरोबर इतर अधिकाऱ्यांप्रमाणे कॅप्टन ब्रिग्जही सामील होता. १८१५ साली एल्फिन्स्टनचा तिसरा साहाय्यक म्हणून तो पुण्यात आला. त्याचे मुख्य काम म्हणजे एल्फिन्स्टनच्या हस्तकांनी निरनिराळ्या राज्यातून पाठविलेल्या गुप्त

---

८. कित्ता, ता. २९–१२–१८२२.
"Eight months ago had you been as severe I should almost, without regret, however much humbled, have put fire to the whole of it."

९. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. ४–१–२३.
"Your work as it now stands was always understood to be rough draft only, and as such, it is extremely valuble. It is rich in facts beyond all former example, and the views you take of the subject though not completely expanded are always judicious and correct..... what Kennedy read (except Sivajee) is the very worst part of your book. The account of the Hindoos and the Mahomedan history deserve little quarters."

बातम्यांचे भाषांतर करणे हे होते. मराठ्यांचे राज्य खालसा झाल्यावर एल्फिन्स्टनने त्याची नेमणूक खानदेशचा कलेक्टर आणि पोलिटिकल एजंट म्हणून केली. १८२३ साली ग्रँटनंतर तो साताऱ्यास रेसिडेंट म्हणून आला. एल्फिन्स्टन, मन्रो, चॅपलिन, रॉबर्टसन, ग्रँट, पॉटिंजर आणि ब्रिग्ज या माणसांनी पेशव्यांकडून काबीज केलेल्या मुलुखाची नीट व्यवस्था लावून ब्रिटिश राजवट भक्कम पायावर उभी करण्याची महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली होती.

जॉन ब्रिग्जची आपल्याला खूप मदत होईल अशी ग्रँटची अपेक्षा होती. १९ जुलै, १८१९ च्या पत्रात आपणास ज्या कोणाकडून साहाय्य मिळेल असा कयास बांधला होता त्यात एल्फिन्स्टन बरोबरच विल्यमस् आणि मीड (Meade) हे शिंदे, होळकरांच्या कागदपत्रासाठी, गॉर्डन नागपूरच्या सामुग्रीसाठी मदत करतील असे विधान करून पुढे म्हटले आहे की, "ब्रिग्ज-देखील मदत करील असे म्हणण्याचे मी धाडस करतो आहे."[१०]

ग्रँटचा स्वभाव काहीसा उतावळा होता. त्याला हवी असलेली माहिती देण्यास कोणी थोडा जरी विलंब केला तरी त्याच्याविषयी याच्या मनात शंकाकुशंकांचे काहूर उठत असे. ब्रिग्जबद्दल त्याने निष्कारण काही ग्रह करून घेतले होते. एल्फिन्स्टनला एका पत्रात तो लिहितो, "रॉबर्टसन, पॉटिंजर आणि ब्रिग्ज यांच्याकडून मी मदतीची अपेक्षा केली होती, पण त्यांची तशी इच्छा दिसत नाही. ठीक आहे, मला प्रस्तावनेत थोडे कमी निर्देश करावे लागतील एवढेच...मी त्यांना दाखवून देईन की त्यांच्या मदतीशिवायही मी काही करू शकतो."[११]

अर्थात पॉटिंजर, ब्रिग्ज ही सारी मंडळी त्याला मदत करण्याच्या खटपटीतच असतात, पण स्वतःचे दैनंदिन काम सांभाळून त्यांना हे मित्र-कार्य करावे लागत असल्यामुळे थोडासा विलंब होणे स्वाभाविक होते. पॉटिंजरला एका पत्रात तो लिहितो, "तूं आणि ब्रिग्ज यांची गेल्या पंधरवडचात मी बरीच निंदा–नालस्ती चालविली आहे. कारण तुमच्या-

---

१०. ग्रँटचे पत्र, ता. १९–७–१८१९.
"Briggs would also I dare say assist."

११. ग्रँटचे पत्र, ता. ८–७–१८२०.
"I shall have something less to say in the preface...I'll show them I can make something of it without their aid."

पासून मी ज्या अपेक्षा केल्या होत्या त्या प्रमाणात मला तुमच्याकडून प्रतिसाद न मिळाल्यामुळे मी निराश झालो होतो."[१२]

एल्‌फिन्स्टनकडे त्याने ब्रिग्जविषयी तक्रार करण्यास प्रारंभ केला होता. पण तेवढ्यात त्याला अपेक्षित असे उत्तर ब्रिग्जकडून आल्यामुळे तो थोडा खजील झाला होता. कारण एल्‌फिन्स्टनला तो लिहितो, "ब्रिग्जला दोष देण्यात मी फार घाई केली. मी त्याला विचारलेल्या शंकांसंबंधी त्याने परिश्रमपूर्वक आणि मोठ्या ममतेने एक विस्तृत आणि अधिकृत असे पत्र लिहिले आहे. अर्थात मी त्याच्याशी संपूर्ण सहमत नाही. आपल्याला माहीतच आहे की तो सर्वस्वी पठाण अथवा मुघल आहे. आणि मी एक गरीब मराठा माणूस असल्यामुळे साहजिकच माझे त्याच्याशी मतभेद आहेत."[१३]

मुसलमानी राजवटीचा इतिहास लिहिण्याचा संकल्प ब्रिग्जने केला होता, आणि त्याच्या सिद्धीसाठी तो झटत होता. मराठ्यांच्या इतिहासाची पार्श्वभूमी म्हणून दक्षिणदेशातील मुसलमानी राजवटीचा इतिहास सांगणे आवश्यक होते. परंतु ब्रिग्ज हे सारे सविस्तरपणे करणार असल्यामुळे ग्रँटने हा इतिहास संक्षिप्त रूपाने द्यावयाचे ठरविले. त्यात प्रामुख्याने मुसलमानांच्या स्वाऱ्या, त्यांनी जिंकून घेतलेले प्रदेश, त्याच्यातील नंतरच्या काळातील बंडाळी, मुसलमानी राजघराण्याची यादी, मुसलमान येण्यापूर्वी या भागाची स्थिती कशी होती? बहामनी राजवटीखाली मराठ्यांची स्थिती कशी होती? आणि नंतर त्यात काय बदल झाले? सत्तेकडे ते कसे क्रमशः आकर्षिले गेले? त्यांनी केलेली बंडे, एक बंडखोर नेता म्हणून शहाजीचा झालेला उदय, त्याची साहसे आणि सत्ता, शिवाजीच्या उदयाचा तपशील, त्याचा लष्करी आणि मुलकी कारभार, या सुमारास

---

१२. ग्रँटचे पत्र, ता. १३-८-१८२०.

"I have been damning the soul and body of you and John Briggs for the last fortnight for my disappointment at not hearing from you was in proportion to the expectation I had formed."

१३. ग्रँटचे पत्र, ता. १२-८-२०.

"..but he, you know, is a Moghul or a Patan at all events. Mee a ghureeb Maharatta Manoos, and naturally disagree."

मुघल, मुसलमान, पोर्तुगीज आणि इंग्रज यांची स्थिती कशी होती ? इत्यादि गोष्टींचा समावेश करावयाचा होता.

तेव्हा हा सारा भाग संक्षेपाने सांगितला म्हणजे ब्रिग्जच्या प्रांतात अतिक्रमण केल्यासारखे होणार नाही. त्याच्यातील आणि आपल्यातील शीवेचा खटला आपोआप नष्ट होईल ( Briggs and I shall avoid all *seewecha khutla* ). शिवाय आपल्या पूर्वसूरींनी ज्या क्षेत्रात उत्तम कामगिरी केली होती तेथे शिरण्याची महत्त्वाकांक्षा ग्रँटला मुळीच नव्हती. ब्रिग्जचे फार्सीचे ज्ञान उत्तम असल्यामुळे या मुसलमानी इतिहासावर त्याच्या हातून अन्याय होणार नाही. मुसलमानी इतिहासाची त्रोटक रूपरेखा सांगितल्याखेरीज, जोनॅथन स्कॉटचे अथवा आता होऊ घातलेले ब्रिग्जचे फेरिस्ताचे भाषांतर ज्यांनी वाचले नसेल, अशा वाचकांना आपला इतिहास समजणार नाही अशी भीती वाटत असल्यामुळे मराठ्यांच्या हकीकती सांगण्यापूर्वी दक्षिणेतील मुसलमानांच्या विशेषतः १००० इ. स. पासूनच्या हालचाली सांगण्याचा त्याने विचार केला होता (१२-८-१८२०).

ब्रिग्जबरोबर त्याला अनेक मुद्यांवर चर्चा करावयाची होती. विचारांची देवाणघेवाण करण्यापासून कशा प्रकारचा आनंद मिळू शकतो याची कल्पना जे अशा तऱ्हेच्या संशोधनात गढलेले आहेत त्यांनाच येऊ शकेल असे तो म्हणतो.[१४]

इतिहास लिहिण्याची कल्पना सोडून न दिल्याबद्दल तो त्याचे अभिनंदन करतो. आपण दोघांनी परस्परांच्या सहकार्याने दक्षिणदेशाच्या इतिहासातील उणीवा भरून काढून काहीतरी लोकोपयोगी काम करू शकू असा भरवसा त्याने व्यक्त केला आहे. मुसलमानी इतिहास हा तुझा प्रांत आहे, आणि त्यात आपण हस्तक्षेप करणार नाही असे आश्वासन तो ब्रिग्जला देतो.

तगरविषयी ग्रँटची मते आता पक्की झाली होती. बीडच्या जवळपास हे गाव कोठेतरी असावे असा आपला तर्क सर्व कारणांसह ब्रिग्जपुढे

---

१४. ग्रँटचे पत्र, ता. १५-८-२०.

"It is perhaps only those who are engaged in an undertaking such as ours that can tell the pleasure which an interchange of opinions affords on the subject of our enquiries."

मांडला होता. ब्रिग्जने नगरच्या इतिहासाचे संशोधन सुरू केले होते. यातून तगरचे स्थान निश्चित करण्यास मदत होईल असे त्याला वाटत होते.

ताम्रपटात येणारा जिवदेव हा कोण असा एक प्रश्न ग्रँटने उपस्थित केला आहे. ग्रँटच्या मते हा जिवदेव म्हणजे शिवाजीच्या मातुलग्रहापैकी जाधव असून त्यासंबंधी अधिक संशोधन केले पाहिजे. ब्रिग्जला तो अगदी जुन्या कागदपत्रात यासंबंधी काही उल्लेख येतो का, जाधव घराण्यासंबंधी काही लोककथा आहेत का याचा तपास करावयास सांगतो.

दक्षिणदेशाची सामाजिक-आर्थिक व्यवस्था जाणून घेण्यासाठी या भागातील देशाधिकारी, ग्रामाधिकारी यांचे मूळ शोधणे आवश्यक होते. गावचा पाटील, कुलकर्णी, बलुतेदार, आलुतेदार, विभागाचे देशमुख आणि देशपांडे इत्यादि अधिकाऱ्यांचे हक्क, कामे हे जाणून घेण्याचा प्रयत्न ग्रँटने केला आहे. प्रस्तुत संदर्भात चॅपलिनने जे शंभराहून अधिक प्रश्न त्याला विचारले होते त्याची उत्तरे मोठ्या परिश्रमाने त्याने तयार केली आणि त्यातील काही माहिती आपल्या इतिहासात, काही वेळा तळटीपा म्हणून त्याने दिली आहे. अशा या अधिकाऱ्यांपैकी देशमुख-देशपांडे या संस्थांच्या उत्पत्तीबद्दल त्याच्या मनात काही संदेह होते.

ब्रिग्ज हा इतिहासाचा, विशेषतः मराठेपूर्वकालाच्या दक्षिणदेशाच्या इतिहासाचा चांगला माहितगार असल्यामुळे त्याची मदत घेणे ग्रँटला इष्ट वाटले. या देशमुखी प्रकरणावरून दोघांत झालेला पत्रव्यवहार अत्यंत उद्बोधक आहे. ग्रँटचे म्हणणे या संस्था मुसलमानी अमलात अस्तित्वात आल्या. ब्रिग्जच्या मते या संस्था हिंदूंच्या असून त्या बऱ्याच पुरातन आहेत.

देशमुख या जोडशब्दातील पहिला शब्द देश हा 'दस्' म्हणजे 'दहा' अथवा देस म्हणजे 'विभाग' यापासून आला असावा. दस् याचा संबंध 'दहा मुठीं'शी जोडला जातो. दहा मुठी धान्य मिळविण्याचा अधिकार असलेले वंशपरंपरागत अधिकार म्हणजे देशमुख होत. 'मुख' या दुसऱ्या शब्दाचेदेखील दोन अर्थ होऊ शकतील. एक तोंड आणि दुसरा मुख्य अथवा प्रमुख. मराठे पहिला अर्थ मानून देशमुखाला देशाचा प्रवक्ता समजतात तर मुसलमान दुसरा अर्थ घेऊन त्याला देशप्रमुख असे समजतात असे ग्रँटचे मत आहे. न्यायमूर्ती रानडे यांच्या मते देशमुख हा देशाचा प्रमुख मुलकी आणि पोलीसीबंदोबस्त पाहणारा अधिकारी होय.

देशाधिकारी ही संस्था पुरातन आहे. ग्रामाधिकारी आपले पंचायतीचे खटले या देशाधिकाऱ्यांकडे अधिक विचारार्थ धाडीत असत. या उल्लेखाचा आधार घेऊन देशाधिकारी म्हणजेच देशमुख असे समीकरण काही मांडतात, आणि ही संस्था मुसलमानपूर्व आहे असे मत व्यक्त करतात. परंतु ग्रँटला ही विचारसरणी मान्य नाही. देशाधिकारी हे कायमचे वतनदार अधिकारी होते का ? त्यांचे हक्क काय होते ? असे प्रश्न उपस्थित तो करतो. 'अधिकार' याचा अर्थ प्रथम अथवा प्रमुख. हा शब्द हक्कदर्शक आहे. 'अधिकार' हा शब्द वृत्ती अथवा वतन सूचित करीत नाही. अधिकारी म्हणजे एखादा अधिकार प्राप्त झाला आहे अशी व्यक्ती. हा सरकारचा प्रतिनिधीदेखील असू शकेल. देशाधिकारी हा देशमुखाहून वरच्या दर्जाचा अधिकारी असला पाहिजे. मराठ्यांच्या लेखनपद्धतीवर मुसलमानांचा बराच प्रभाव पडला आहे. संस्कृत शब्दांचा वापर करणे जेथे सहजासहजी शक्य आहे तेथेच तो केला आहे. एखादे इनाम दिले म्हणजे त्या सनदेच्या चार प्रती करीत असत. एक प्रत इनाम मिळालेल्या व्यक्तीला; दुसरी, ज्या गावात इनाम दिले असेल त्या गावच्या पाटलाला; तिसरी, त्या प्रदेशाचे अधिकारी, देशमुख आणि देशपांडे; आणि चौथी, देशाधिकारी व लेखक यांना. यापैकी देशाधिकाऱ्यांचा उल्लेख करतांना राजश्री देशाधिकारी आणि लेखक वर्तमान भावी अथवा हाल व इस्तकबाल हे संकेतवाचक शब्द वापरले जात. वर्तमान भावी हे शब्द बहुतेक मुसलमानी अमलापासूनचे असावेत. कारण ते उघडउघड हाल व इस्तकबालचे प्रतिशब्द असून, तशा अर्थाचे संस्कृत संकेतवाचक शब्द पूर्वीच्या कागदपत्रात आले असावेत असे वाटत नाही.

देशमुखी संस्था पुरातन अथवा मुसलमानपूर्व आहे असे मानणाऱ्यांचे म्हणणे असे की, सनदेतील संकेतवाचक शब्द हे केवळ विद्यमान अधिकाऱ्यांना उद्देशून आहेत. हे सरकारी अधिकारी पूर्वीच्या देशप्रमुख अथवा देशमुखांच्या ऐवजी आलेले आहेत.

या उलट काहींचे म्हणणे असे की गावचा पाटील आणि देशाचा राजा यांच्यामध्ये पूर्वी कोणीही वंशपरंपरागत अधिकारी नव्हते, आणि देशमुख–देशपांडे हे अधिकारी खास मुसलमान काळातील होत. मुसलमानांनी दक्षिणेत जेव्हा बंडावा पुकारला तेव्हा मराठे नायक अथवा पाळेगार यांना त्यांनी बादशाहाविरुद्ध चेतविले, आणि आपल्याकडे वश करून घेण्याचा प्रयत्न केला. त्यांना आपल्या कार्यात सामील करून घेणे मुसलमानांना आवश्यक होते. वतनासाठी या लोकांत सतत भांडणे होत, खूनसुद्धा पडत. तेव्हा

अशा भांडणांना उत्तेजन देऊन, दुफळी माजवून प्रबल पक्षाचा आपल्या सरकारला पाठिंबा मिळविणे ही मुसलमानांची राजनीती होती. या भांडणांत जो यशस्वी ठरेल त्याला त्या विभागाचा प्रमुख म्हणून मानण्यास त्यांची तयारी असे. या सर्व अधिकाऱ्यांना, देशाधिकाऱ्यांना त्यांच्या विभागात काही हक्क आणि सवलती दिल्या गेल्या. वतन हे अशा या हालचालीतून निर्माण झाले. वतन हा शब्द अरेबिक असून त्याचा अर्थ स्वदेश असा आहे. ग्रँटने वतन आणि वृत्ती हे शब्द समानार्थी मानले आहेत. वतन आणि वृत्ती या दोन गोष्टी अगदी भिन्न आहेत हे आज्ञापत्रकारांनी पूर्वीच सांगून ठेवले आहे; पण ग्रँटच्या वाचनात तो ग्रंथ आला नसावा, अथवा इतका तपशील त्याला कोणी सांगितला नसावा.

थोडक्यात, मराठेकालातील देशमुख ही संस्था मुसलमानी काळात अस्तित्वात आली, बहामनीपूर्व नसली तरी बहामनीकालातील निश्चित असावी आणि सतराव्या शतकात तिला प्राप्त झालेले स्वरूप हे सर्वस्वी मुसलमानांमुळे होय. काहींच्या मते १५८२ साली म्हणजे अकबराच्या काळात या संस्थेचा उल्लेख आढळतो असे आहे. पण ग्रँटला मात्र ही संस्था त्याही पूर्वीच्या मुसलमानी काळातील असावी असे वाटते.[१५]

कॅप्टन ब्रिग्जने ग्रँटची मते खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे. त्यावरून दक्षिणदेशाच्या इतिहासावरील त्याची पकड तर दिसून येतेच पण त्याचबरोबर विद्यमान स्थितीचे त्याने केलेले विश्लेषण त्याच्या वैचारिक पातळीची शलाका दर्शविते. ग्रँटच्या १५ ऑगस्ट १८२० च्या पत्राला धुळ्याहून २४ ऑगस्टला तो उत्तर लिहितो.

देशमुख-देशपांडे या संस्था मुसलमानांनी निर्माण केल्या असे तो मानीत नाही. म्हैसूर भागात मुसलमानांचा प्रवेश होण्यापूर्वी अशा प्रकारचे अधिकारी होते. सिलोनमध्ये देखील 'दिसावस' अथवा देसाई नावाचे देशाधिकारी होते, आणि सिलोनमध्ये मुसलमान गेले ते काही भारतातून नाही. तेव्हा या ऐतिहासिक घटनांच्या संदर्भात या संस्थांची उत्पत्ती कशी शोधावयाची ? नवीन काही सुधारणा केल्या तर त्या सर्वस्वी आपल्याच आहेत अशी फुशारकी मुसलमान मारीत असत.

---

१५. ग्रँटची मते त्याच्या पुस्तकात (भाग १, पृ. ३५ ते ३९ तळटीपांसह) आणि ब्रिग्ज (१५–८–२०), पॉटिंजर (१३-८-२०) यांना लिहिलेल्या पत्रात आली आहेत. पत्रातील चर्चेलाच पुस्तकात मूर्त स्वरूप प्राप्त झाले आहे.

तोडरमलची जमीनमहसूलपद्धती ही वास्तविक संपूर्ण हिंदू असली तरी त्यात फार्सी नामाभिधाने आणि किताब आल्यामुळे इस्लामधर्माचीच महती वाढली आहे. दक्षिणदेशाच्या इतिहासात अथवा साधनसामुग्रीत मुसलमानांचा उदय झाल्यापासून एका शतकानंतरच्या काळात हिंदू राजांची अथवा अधिकाऱ्यांची नावे तुम्हाला आढळणार नाहीत. नंतरच्या काळात हिंदू नावे आणि हुद्दे पुढे येऊ लागले याचा अर्थच हा की, मुसलमानांनी ते नष्ट करून टाकण्याचा प्रयत्न केला पण त्यांना ते काही शक्य झाले नाही.[१६]

या चर्चेला चालना दिल्याबद्दल आणि अद्याप समाधानकारक पुरावा उपलब्ध न झाल्याची कबुली दिल्याबद्दल ब्रिग्ज ग्रँटचे आभार मानतो. मतभेदांतूनच इष्ट अथवा सत्य गोष्टी बाहेर येण्याची शक्यता असते. ग्रँटने भिन्न मत व्यक्त केल्यामुळे, त्याचे समाधान करण्यासाठी या विषयावर अधिक संशोधन करण्याची गरज ब्रिग्जला भासू लागली. एखादा जुना देशमुख शोधण्याच्या तो मागे लागला. परंतु मुसलमानी काळात नासधूस खूप मोठ्या प्रमाणावर झाल्यामुळे पूर्वीचा इतिहास गवसणे कठीण झाले आहे. प्राचीन वैभव जमीनदोस्त झाले आहे म्हणून तो हळहळतो.

मलिक अंबरच्या मृत्युतिथीसंबंधी ग्रँटच्या मनात गोंधळ निर्माण झाला होता. वास्तविक स्कॉटने १६२६ मध्ये तो मेला असे म्हटले होते. परंतु काही हिंदू लेखक आणि विल्यम फिंच या व्यापाऱ्याच्या निवेदनावरून तो नंतरच्या काळातही जिवंत असावा अशी शंका त्याच्या मनात आली होती. परंतु त्याला निर्णयात्मक असे उत्तर सापडत नव्हते. याबाबतीत ब्रिग्जलाही काही अधिक माहिती देता येत नव्हती. दक्षिण-देशातील निरनिराळ्या स्थळांना भेटी देऊन आपण जी विस्तृत टिपणे तयार केली होती ती ५ नोव्हेंबर १८१७ रोजी मराठ्यांनी संगम बंगला पेटवून दिला होता त्यात नष्ट झाली असे त्याने ग्रँटला कळविले आहे.[१७]

---

१६. ब्रिग्जचे पत्र, ता २४–८–२०.

१७. ब्रिग्जचे पत्र, ता. २४–८–२०.

"I had a thick folio volume, nearly full containing notes, taken on the spot, of all the dates, carefully worked out with descriptions of the tombs of Beejapoor, Golconda, Bidar and Roza, clearing up and confirming all the remarkable events in the Mohammedan history of the

महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सीमांबद्दल ग्रँटने पृच्छा केली होती. याबाबतीत दोघांची मते बरीचशी जुळणारी होती. तो म्हणतो, "या प्रांताच्या सरहद्दी उजव्या अथव्या डाव्या बाजूस काही मैल इकडे तिकडे सरकल्या तर त्याबद्दल मी भांडणार नाही. परंतु ज्या गावची लोकभाषा मराठी नाही ते गाव मी महाराष्ट्रात घालू देणार नाही, हे पक्के लक्षात ठेव. तसेच पल्ली, हल्ली, कोट्टा, कोट, हल, कल, हाल अथवा पेट्टा या उपाधी असलेली सर्व गावे मी महाराष्ट्रातून काढून टाकीन. आणि 'गाव', 'नगर', 'गड', 'खेड', 'वाडी' अशा उपाधी असलेली गावे जर नजरचुकीने माझ्या हद्दीतून निसटली असली तर मी त्यांना महाराष्ट्रात घेईन. अर्थात ज्या गावांचा शेवट 'उर', 'पूर' या शब्दांनी होतो अशी गावे महाराष्ट्र, तेलंगण आणि कर्नाटक येथे सापडत असल्यामुळे त्या गावांचा प्रश्न सोडविणे थोडेसे कठीण जाईल."[१८]

मलिक अंबराच्या जमीनमहसूल व्यवस्थेची प्रशंसा करीत असताना भारतीय अर्थव्यवस्थेबद्दलचे आपले विचार त्याने मोजक्या शब्दांत पण प्रभावीपणे मांडले आहेत. आपल्या विचारांना आधार म्हणून मनूकडे तो धाव घेतो. मनूने राजाचा हिस्सा एकूण उत्पादनाच्या $\frac{1}{6}$ ठरवून दिला होता,

---

Deccan; but this, and all my MSS which I thought were valuable were lost in the conflagration of the Sungum." (5th Nov. 1817)

१८. कित्ता, ता. २४–८–२०.

"I am happy to find our Mahratta boundaries so nearly agree. I will not quarrel with you for differing a few miles to the right or left in defining Maharashtra. But recollect, I admit no village into the Mahratta limits whose native tounge is not Mahratta, and I do most stoutly reject all places which have 'pully' 'hully' 'Kotta' 'Kot' 'hul' 'kul' 'hal' or 'petta' as terminations or initials. While I embrace with parental fondness all the 'gaums' 'nuggurs' 'gurhs' 'kherds' and 'warees' that may have escaped my boundary line. There are some few, such as 'oor' 'poor' etc. that are common to the Mahratta, Telinga and Canara limits."

आणि जमिनीची मालकी कायम आणि वंशपरंपरागत स्वरूपाची केली होती. जमीन विकण्याचा मालकाला अधिकार आहे हेही त्याने मान्य केले होते. आपल्या आर्थिक व्यवस्थेचा सारा भार जमिनीवर टाकण्याचे तत्त्व फारसे हितावह ठरणार नाही असे त्याचे मत होते. रयतेकडून अधिक मागणी करणे म्हणजे फलाच्या आशेने झाडाच्या मुळांना उखडण्या-सारखे अथवा ताडीसाठी झाड कापावयाचे आणि खजुराचीही अपेक्षा करावयाची अशासारखे होईल. यापासून रयत, जमीनदार अथवा मध्यमवर्गीय लोक यांपैकी कोणाचेच कल्याण साधले जाणार नाही. व्यापार उदीम, कारखानदारी वाढणार नाही. फ्रेंच तत्त्वज्ञ फिझिओक्रॅटस् यांच्या सिद्धान्तातील फोलपणा आता विचारवंतांना कळून चुकला आहे. जमिनी-वरील जादा करआकारणी आपल्या देशाला प्रगतिपथावर नेणारी नाही."[१९]

ब्रिग्जचे हे सडेतोड, रेखीव आणि मुद्देसूद पत्र पाहून ग्रँट दिपून गेला. तो म्हणतो, "तू एक अजिंक्य असा शत्रू आहेस. प्रत्यक्ष हल्ला करण्याचे टाळणे तुला श्रेयस्कर वाटत असावे. तू गायी मारणारा पठाण, तुर्क आहेस. मी एक मराठा माणूस आहे. प्रसंगानुरूप लढणे किंवा पळ काढणे ही माझी कार्यपद्धती. असो, गेली गोष्ट येत नाही. तू माझ्यावर जोरदार हल्ला केला आहेस. मी काही त्याचा प्रतिकार करू शकत नाही."[२०]

---

१९. ब्रिग्जचे पत्र, ता. २४-८-२०.

"To draw our resources on a constantly increasing scale from the land, is very like digging away the root of a tree to get at its fruit, or tapping the palm for toddy, and still expecting to have dates. A comfortable peasantry is the basis of an affluent gentry and nobility and affluence is the parent of manufactures and trade, which are the most desirable, the most productive and the most durable sources of wealth to a state."

२०. ग्रँटचे पत्र, ता. ३१-८-२०.

"You are a formidable adversary, and would rather avoid coming to regular action. You are a Patana Toork that slaughters kine. I am a Mahratta Manoos and can fight or flee as these require. However *gele gosht yet nahee*."

ब्रिग्जने सिलोनमधील देसाईपदाविषयी लिहिले होते पण त्याबद्दल अधिक माहिती कोठे मिळेल याची तो चौकशी करतो. देसगत आणि देशमुख या शब्दांचा काही संबंध जोडता येईल का असाही एक विचार त्याच्या मनात येऊन जातो. सिलोनच्या कमिशनराने १७९६ मध्ये लिहिलेल्या अहवालात पुराव्यानिशी या साऱ्या गोष्टी मांडल्या असतील का हे पाहणे आवश्यक होते. सिलोनचे देसाई हे लष्करी अधिकारी होते की सनदी याचा तपास लावणे अगत्याचे होते. तसेच म्हैसूरकडे मुसलमान पूर्वकाळात देशमुख होते याला पुरावा काय याची माहिती त्याला हवी होती. परमेश्वर कृपेने आपल्या साऱ्या शंकांचे निरसन होईल अशी तो आशा बाळगतो. स्कॉटच्या फेरिस्ताच्या भाषांतरात जमीनदार हा शब्द आला असून तो तुझ्याकडील मूळ प्रतीत आहे का ? आणि हा जमीनदार म्हणजेच देशमुख का ? अशी ब्रिग्जकडे तो चौकशी करतो. (३१-८-१८२०) पुढे सुमारे तीन आठवड्यांनी लिहिलेल्या पत्रात त्याने परत हा देशमुख–देशपांड्यांचा प्रश्न उपस्थित केला असून याबाबतीत निर्णायक मत द्यावे अशी इच्छा व्यक्त केली आहे. १८२१ साली साताऱ्यासंबंधीचा एक विस्तृत अहवाल त्याने चॅपलिनला सादर केला होता, त्यात देशमुख–देशपांड्यांच्या उत्पत्तीबद्दल चर्चा केली आहे. १८२६ पर्यंत त्याने या विषयावर देशमुख–देशपांडे हे मुसलमानकालातील अंमलदार आहेत असे आपले मत बनवून ते इतिहासात नोंदविले आहे.

दक्षिणदेशाचा मराठे पूर्वकालाचा इतिहास निवेदन करणारी पहिली सहा प्रकरणे त्याने ब्रिग्जकडे पाठविली होती. मुसलमानांच्या इतिहासाबद्दल त्याने व्यक्त केलेली मते वाजवी आणि विचार करण्यासारखी आहेत असे एल्फिन्स्टनला तो कळवितो. ब्रिग्जच्या सूचना विचारार्थ तो एल्फिन्स्टन-कडे पाठवितो, आणि त्यांना किती महत्त्व द्यावयाचे याबाबतीत सल्ला विचारतो. ब्रिग्जने केलेल्या उपदेशाबद्दल तो कृतज्ञता व्यक्त करतो. परंतु त्याच्या मते ब्रिग्जने केलेला उपदेश प्रामाणिकपणाचा असला तरी शहाणपणाचा नाही असे तो म्हणतो.[२१]

ब्रिग्जने फार्सी साधनांवर विशेष भर देण्याचा उपदेश त्याला केला होता. परंतु १८२२ च्या मे महिन्यात मिळालेला हा सल्ला त्याला

---

२१. ग्रँटचे पत्र :

"I feel obliged by his advice which is perhaps candid than wise."

प्रत्यक्षात आणणे शक्य नव्हते. इतिहासलेखनात त्याने बरीच प्रगती केली होती आणि आता मागे जाऊन परत सर्व गोष्टी पाहणे वेळेच्या अभावी त्याला शक्य नव्हते. अर्थात अनावश्यक भाग काढून टाकणे, आणि आवश्यक तो सुधारणे या गोष्टी करण्यास तो तयार होता. परंतु इतिहासलेखनाचे काम ठराविक मुदतीत पुरे करण्याच्या दृष्टीने पुढचा भाग लिहिणे हे त्याच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे होते. आणि म्हणूनच ब्रिग्जच्या सूचनांबद्दल आपल्या गुरूचे विचार जाणून घेण्यास तो उत्सुक होता. ( २२-५-१८२२ )

ग्रँटच्या पत्राला एल्फिन्स्टन आपली सारी कामे बाजूला ठेवून प्रथम उत्तर लिहीत असावा असे वाटते. कारण २२ च्या त्याच्या पत्राला लगेच २५ ला उत्तर त्याने धाडले आहे. ब्रिग्जच्या सूचना योग्य आहेत असे आपले स्पष्ट मत सांगून तो म्हणतो, "अर्थात ब्रिग्जची ही मते पहिल्या सहा प्रकरणांपुरतीच मर्यादित असल्यामुळे, मराठ्यांचा भाग त्यात विशेष आला नव्हता, तेव्हा मुसलमानांबद्दल ब्रिग्जने अधिक विचार करणे स्वाभाविक होते. पण यामुळे निराश होण्याचे काही कारण नाही. तू जेव्हा मायदेशी जाशील तेव्हा या सर्व तपशिलाचा तुला शांतपणे विचार करता येईल. तोपर्यंत तू लिहिण्याचे काम अखंडपणे चालू ठेवले पाहिजेस, त्याखेरीज तुझी साधनें कितपत पूर्ण स्वरूपाची आहेत याची कल्पना येणार नाही. तुला जितके चांगले लिहिता येईल तितके लिही, कारण ही एक चांगली सवय आहे; एवढेच नव्हे तर पहिली प्रतिक्रिया असते तीमधून जिवंत भाषेचा ओघ आपोआप येतो. अगदी निडरपणे आणि निर्भीडपणे लिही. कारण पुढे या सर्व मतांचा शांतपणे विचार करावयास भरपूर वेळ आहे."[२२] या शब्दात त्याचे सांत्वन करून तो पुढे म्हणतो की,

२२. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २५-५-२२.

"..I received your letter with Briggs notes. I do not think amiss of many of them considering that he had only read your first book. The Mahrattas had not then come into play and it was natural for him to think more of the Mussullmans. Never fear about your strife. When you get home and have the events before you without the necessity of attending to the (?-illegible); when you have the characteristics of the Mahrattas full in your mind unperplexed by

"मुसलमानांनी लिहिलेले इतिहास तू गोळा कर. ते वाचण्यास येथे तुला सवड झाली नाही तर तू घरी गेल्यावर वाच, अथवा प्रवासात एखादा मुनशी बरोबर घेऊन ते वाचून काढ. परंतु हे काम पूर्ण करण्याचा विचार कोणतीही सबब पुढे करून मनातून काढून टाकू नको. ब्रिग्जची काही मते मी मान्य केली आहेत याचा अर्थ तू आपल्या इतिहासात मराठ्यांना दुय्यम स्थान द्यावे असा नव्हे. त्याची पुष्कळ मते मी ग्राह्य मानीत नाही याचे कारण मुसलमानांच्या इतिहासावरून त्याने ज्या घटना घेतल्या आहेत, त्या तू दिलेल्या घटनांपेक्षा अधिक सत्य असतील असे मला वाटत नाही."[२३]

एल्फिन्स्टनच्या उपदेशाचा रोख ग्रँटच्या बरोबर लक्षात आला होता. त्याने त्याबद्दल त्याचे मनःपूर्वक आभार मानले. आता फार्सी साधने पाहणार नाही, मला वेळ नाही, त्यांचा कंटाळा आला आहे ही पूर्वीची भाषा त्याने टाकून दिली, आणि निश्चय केला की कितीही परिश्रम पडोत फार्सी साधनांचा अभ्यास करणार (४–६–१८२२). मासीर-अल-उमरा, मीरात अहमदी इत्यादि ग्रंथ वाचल्यानंतर आपले साधनांवरील प्रभुत्व

---

the constant sight of those ordinary features which they have in common with all mankind, depend on it, your narrative will be more flowing and your descriptions more striking. You must write now because without doing so you cannot discover how far your materials are complete, ..write as well as you can, because it is a good habit and because first impressions offen inspire the lively language but write boldly and dashingly remembering that you will have time enough to illegible and to correct hereafter."

२३. एल्फिन्स्टनचे पत्र, ता. २५–५–२२.

"It is in this sense that I have marked Brigg's observations in his letter not that I think for a moment that you should make the Mahrattas secondary. There are many of Brigg's remarks that l have not marked though I think them good because I do not know the facts stated in them from Mahommedan Histories are truer than those you have given."

वाढत चालले आहे याची त्याला कल्पना येते. पण साधनांबरोबरच इतिहासाचा आकारही वाढत जातो. त्यामुळे आपला विषय कदाचित कंटाळवाणा होईल अशी भीती त्याला वाटू लागते. हा विषय मांडण्यासाठी लागणारे श्रम जर इतके अप्रिय मला वाटतात, तर पुढे वाचकांची स्थिती काय होईल याचा विचारच न करणे बरे असे तो म्हणतो.[२४]

वरील पत्रव्यवहारावरून ब्रिग्जमुळे फार्सी साधनांचे महत्त्व त्याला कसे पटले होते आणि कित्येक प्रश्नांची छाननी करण्याचे मार्ग कसे गवसले याची कल्पना येईल.

एल्फिन्स्टनच्या खालोखाल ग्रँटचा विश्वास विल्यम इरस्किन या मुंबईसरकारच्या सनदी नोकरीतील आपल्या मित्रावर होता. फार्सी भाषेचा तो एक चांगला अभ्यासक होता. हिजरी आणि फसली सनाबद्दल तो त्याच्याशी प्रदीर्घ चर्चा करतो.[२५] त्याचप्रमाणे मधून मधून फार्सी साधनांची माहिती तो त्याला विचारीत असतो (११-१-२१). ब्रिग्जप्रमाणेच इरस्किनची मदत त्याला मराठ्यांच्या इतिहासाच्या आरंभीच्या काळाची माहिती देण्यासाठी हवी होती. १६३६ पर्यंतच्या इतिहासाची सहा प्रकरणे, जी त्याने ब्रिग्जलाही पाठविली होती, ती त्याला इरस्किनकडून तपासून हवी होती.

मराठ्यांचा इतिहास लिहिताना त्याला सतत भेडसावणारी गोष्ट म्हणजे विस्ताराची होती. शिवाजीची कारकीर्द मोठी आणि घटनांनी भरलेली होती ती आपल्या हातून संक्षिप्त होणार नाही हे तो स्पष्ट करतो. पण येसाजी कंक, तानाजी मालुसरे, बाजी पासलकर यांची देखील चरित्रे संक्षिप्त कशी करावयाची हा त्याला प्रश्न पडतो. अर्थात काही काटछाट आवश्यकच होती. प्रारंभीचा मुसलमानी इतिहासाचा भाग गाळावा का? इरस्किनने मुसलमानी इतिहासाचा अभ्यास केला असल्यामुळे यापैकी कोणता भाग गाळणे योग्य ठरेल हे तो त्यालाच विचारतो, आणि त्याच हेतूने पहिली सहा प्रकरणे त्याच्याकडे पाठवितो. पहिल्या तीन प्रकरणांत

---

२४. ग्रँटचे पत्र, ता. २२-६-२२.

"I am getting stronger in authorities, but the size is tremendous, the subject tedious, and if the labour be sickening to me, it will be appaling to the reader."

२५. ग्रँट डफ भाग १ पृ. ४७ वरील तळटीपेचा उगम या पत्रात आहे. (२५-६-२०)

त्याने पूर्वी केलेल्या सूचनांप्रमाणे बदल केला होताच. प्रकरणे वाचीत असताना जे विचार सुचतील ते वेगळ्या पानांवर नोंदविण्याची त्याने एल्फिन्स्टनला सूचना केली होती. यात कोणता भाग चुकीचा आहे, कोणता भाग अनावश्यक आहे, कोणता दुर्बोध अथवा अपुरा आहे या गोष्टींची नोंद व्हावी अशी तो विनंती करतो. बहुतेक प्रत्येक ओळीत चुका असण्याची शक्यता आहे, तेव्हा त्या दुरुस्त करण्याची कृपा करावी अशी नम्र विनंती करावयास तो विसरत नाही. एल्फिन्स्टनकडून आलेल्या या साऱ्या सूचना नंतर तो इरस्किनकडे पाठविणार होता. इरस्किनलाही त्याने आपल्या सूचना स्वतंत्र पानावर टिपून ठेवण्याची विनंती केली होती.

इरस्किनने ग्रँटच्या पुस्तकाचा बराचसा भाग वाचला असावा. मराठ्यांच्या इतिहासाचे हे एकमेव पुस्तक ठरेल अशी त्याने प्रशंसा केल्यामुळे दोन, तीन, चार वेळा हस्तलिखित सुधारण्याचा प्रसंग आपल्याबर आला तरी आपण मागेपुढे पाहणार नाही असे तो आश्वासन देतो.[२६] इरस्किनने औरंगजेबावर लिहावे अशी तो त्याला विनंती करतो (१२–४–२२).

एल्फिन्स्टन आणि इरस्किन या दोघांच्या टिपणांना तो विशेष महत्त्व देत असे, कारण हे दोघे टीका करीत असले, दोषदिग्दर्शन करीत असले तरी ग्रँटची वारंवार प्रशंसा करून त्याला या कामासाठी आवश्यक ते प्रोत्साहन आणि साहाय्य देत असत. एल्फिन्स्टन एकदा म्हणाला होता की, आपली टिपणे घाईगर्दीत केल्यामुळे ती थोडीशी निष्काळजीपणाची वाटतील. पण ग्रँटला मात्र ती फारच प्रशंसनीय आहेत असे वाटत होते. तसेच इरस्किनची टिपणे विचारार्थ एल्फिन्स्टनकडे पाठविताना तो म्हणतो की, यावरून माझ्यासाठी त्याने किती परिश्रम केले आहेत याची सहज कल्पना येईल. त्याने केलेल्या दुरुस्त्या इतक्या समर्पक आहेत की त्या पाहून मला माझ्या मूर्खपणाचे आश्चर्य वाटले असे तो स्पष्टपणे कबूल करतो. इरस्किनने सुचविलेल्या विशेष दुरुस्त्या आणि एल्फिन्स्टनने केलेल्या सामान्य स्वरूपाच्या सुधारणा यामुळे आपला इतिहास सुधारून लिहिण्यास बरीच मदत होईल अशी त्याला आशा वाटत होती.[२७]

---

२६. ग्रँटचे पत्र, ता. २१–३–१८२२.
"..as Mr. Erskine seems to think this is the book, I think I can amend it by a second, third or fourth rewriting."

२७. ग्रँटचे पत्र, ता. ४–५–२२.
"his corrections are so appropriate that I wonder at my own stupidity."

अहमदनगर येथे पॉटिंजर याची नेमणूक कलेक्टरच्या हुद्यावर केली होती. अहमदनगर म्हणजे निजामशाहीची राजधानी, आणि मराठ्यांचा उदय हा प्रामुख्याने या मुसलमानी प्रांतात झाला होता. तेव्हा निजामशाहीमध्ये मराठ्यांची स्थिती कशी होती ? दौलताबाद भागातून अनेक मराठ्यांनी मुसलमानांविरुद्ध बंडे केले होती. 'नाईकांचा प्रमुख जिवदेव मराठा' ज्याला ब्रिग्जने 'गोविंद देव' म्हटले होते तो दुसरा तिसरा कोणी नसून जाधवराव असला पाहिजे, आणि अहमदनगर जिल्ह्यातील बांभोरीचे विद्यमान देशमुख घराणे हे त्या जाधवरावांचे असावे असा आपला तर्क तो पॉटिंजरला सांगतो. हा जिवदेव प्रथम अहमदनगरच्या निजामाकडे मनसबदार होता, शहाजीचा सासरा आणि शिवाजीचा आजोबा म्हणजेच हा जिवदेव असला पाहिजे असे तो म्हणतो. या सर्व मराठे सरदारांकडे बखरी असून त्या गोळा कराव्यात, त्यांच्याकडे मिळाल्या नाहीत तर त्यांच्या देशपांड्याकडे त्या निश्चित मिळतील असे तो पॉटिंजरला सुचवितो.

१६ व्या शतकाच्या उत्तरार्धात अहमदनगर राज्यातील बऱ्याचशा किल्ल्यांवरील सैन्य हे प्रामुख्याने मराठ्यांचे होते. मुहम्मदशहा अज्ञान आहे या सबबीवर ते किल्ले आपल्या कब्जातून सोडण्यास तयार नव्हते. अर्थात मुसलमानांनी ते जरी त्यांच्यापासून जिंकून घेतले असले तरी मराठ्यांच्या मनात या परकीय सत्तेबद्दल असलेला बंडावा स्पष्ट होतो. शिवाजीने आपल्या स्वराज्याचा उद्योग ज्या भागात सुरू केला त्याच राज्याच्या विभागात हे सारे किल्ले आहेत. तेव्हा हे सारे सरदार मुसलमानांच्या विरुद्ध एकत्र कसे आले ? त्याच्या मागे काही राष्ट्रीय भावना होती का ? का मुसलमानांनी सुरू केलेल्या अंतर्गत कलहामुळे ही बंडे होत होती ? या संबंधीची हकीकत हिंदू लोकांनी लिहून ठेवलेली मिळाली तर फार बरे होईल. तेव्हा त्याचा तपास करावा अशी तो पॉटिंजरला विनंती करतो.[२८]

---

२८. ग्रँटचे पॉटिंजरला पत्र, ता. १३-८-२०.

"...That there was a spirit of insurrection among the Mahratta at this early period and it is remarkable that these forts are exactly in the situation where Sevajee first established himself 160 years afterwards. I would give a great deal for any Hindoo account of this insurrection in order

पॉटिंजरबरोबर केलेल्या या विवेचनातूनच तो प्रसिद्ध वणवा सिद्धान्त बाहेर आला आहे.[२९]

चाकणचा किल्ला कोणी बांधला याचीही तो चर्चा करतो. बुरादीद हबशी नावाच्या माणसाने अल्लाउद्दीन खिलजी दक्षिणेत येण्यापूर्वी सुमारे शंभर वर्षे आधी हा किल्ला बांधला आहे असे हिंदूंचे म्हणणे आहे. पुढे १५ व्या शतकात मलिक-उल् तुजार याने या किल्ल्याची डागडुजी केली. अल्लाउद्दीन, २ रा बहामनी राजा, याच्या कारकीर्दीत (१४३४-१४५७) एक मोठी तटबंदी या किल्ल्यास बांधण्यात आली. हा हबशी स्वतःला पाळेगार म्हणवितो. पण १२ व्या शतकात तो तेथे गेला कसा यासंबंधी काही माहिती नाही. या देशाच्या मराठेपूर्वकालाच्या इतिहासाचे ज्ञान नसल्यामुळे याबाबतीत आपल्याला काही अंदाज करता येत नाही, तेव्हा तूच याबाबतीत विद्वानांशी चर्चा करून माहिती कळविल्यास फार उत्तम होईल, असे तो पॉटिंजरला लिहितो.[३०]

देशमुख-देशपांडे संस्था मूळच्या हिंदूंच्या की मुसलमानांच्या या बाबतीत पॉटिंजरचे मत त्याला हवे होते. शिवाजीच्या संस्थांचे वर्णन करणारे एक चोपडे त्या राजाच्या शत्रूकडून-जावळीचा राजा चंद्रराव मोरे-यांच्या वंशाकडून त्याने मिळविले होते. त्यामुळे शिवाजीबद्दलचा त्याचा आदर वाढला होता. तो म्हणतो, " डोंगरी उंदीर शिवाजी आणि त्याचे मावळे यांचा जसजसा परिचय वाढतो आहे तसतसा त्यांच्याविषयी मला अधिक आदर वाटू लागला आहे.[३१]

पुण्याचा कमिशनर चॅपलिनशी बारगीर या शब्दाचे मूळ काय असावे याची चर्चा करतो. विल्क्सने आपल्या म्हैसूरच्या इतिहासात बरगी

---

to find out the real cause of so many of them being of one mind whether from national spirit or from the intrigues of the rivals of Mullik Ahmed and his father."

२९. ग्रँट डफ भाग १, पृ. ५६.

३०. ग्रँट डफ भाग १, पृ. ५२ तळटीप पाहा.

३१. ग्रँटचे पॉटिंजरला पत्र, ता. १३-८-१८२०.

"I have a much greater respect for the mountain rat and his *mawulees* than I had before I became well acquainted with them."

नावाची एक खंडणी सांगितली आहे आणि मराठी बारगीरचा संबंध या बरगीशी जोडला आहे हे कितपत सयुक्तिक आहे हे त्याला विचारतो. (२१-८-२०)

मुंबई सरकारच्या नोकरीतील मॅक्लिऑडशी तो १३९६ च्या दुर्गा-देवीच्या दुष्काळाची चर्चा करतो आणि याला आधार म्हणून एक मराठी हस्तलिखित आणि वाई देशमुखांचे फर्मान यांचा घेतो.

धारवाडच्या थॅकरेला घोरपडे घराण्याची कापशी, मुधोळ, गुत्ती या त्यांच्या शाखांची माहिती संपादन करण्याची विनंती करतो. घोरपडे आदिलशाहीच्या काळात उदयाला आले. त्यांच्याकडील फार्सी, मराठी कागद, बखरी मिळाल्यास आपण त्यातील महत्त्वाचा भाग उतरून घेऊ आणि त्या नंतर परत करू असे आश्वासन तो त्याला देतो. आतापर्यंत केलेल्या प्रयत्नांना यश आले नाही तेव्हा आपण यात लक्ष घालावे असे तो त्याला सुचवितो.[३२] (२२-८-२१)

नागपूरच्या रेसिडेंटकडून त्याला नागपूरची प्रकरणे तपासून हवी होती. जेनकिन्सला ग्रँटचे लिखाण विशेष आवडले नव्हते. पहिल्या तीन प्रकरणांत दोन घोडचुका त्याने दाखविल्या होत्या. तो आपली टीका स्वतंत्रपणे लिहून कळवीत नसे. त्याच्याशी अधिक परिचय नसल्यामुळे तो त्याच्याबाबतीत काही स्वातंत्र्य घ्यावयास तयार नव्हता. गॉर्डनकडून त्याची मते त्याला कळत होती. (२६-७-२२)

असे हे ग्रँटचे साथीदार साहाय्यक आणि टीकाकार या दोन्ही भूमिकांतून त्याच्या लेखनकार्याला हातभार लावीत होते.

---

३२. ग्रँट डफ भाग १, पृ. ५०.

## १०

# अखेर मराठ्यांचा इतिहास प्रसिद्ध झाला !

मित्रांच्या साहाय्याने मराठ्यांच्या इतिहासाचे लेखन पूर्ण करून ग्रँटने आपले हस्तलिखिताचे बाड लंडन येथील प्रसिद्ध प्रकाशक जॉन मरे याच्याकडे अवलोकनार्थ पाठविले.[१] या संदर्भात तो लिहितो,

" १८१९ साली, सातान्याचा पोलिटिकल एजंट म्हणून काम पाहात असता, मराठ्यांच्या इतिहासाची सामग्री जमविण्यास मी प्रारंभ केला. हे काम आता प्रकाशनसिद्ध झाले आहे. याची सुरवात दक्षिणदेश ( Deccan ) मुसलमानांनी आक्रमिला त्याच्या थोड्याशा आधीच्या काळा-पासून होते, आणि मराठ्यांचा ऱ्हास आणि त्याचबरोबर ब्रिटिश सत्तेचा उदय हा भाग यात समाविष्ट केला आहे. १८१९ पर्यंतचा इतिहास येथे आला आहे. प्रत्येकी सुमारे दोन लक्ष शब्दांचे सर्वसामान्य आकाराचे दोन भाग या ग्रंथाचे होतील. या हस्तलिखिताबरोबर मूळ साधने आणि अली-कडील पाहणीच्या आधारे बनविलेला एक उत्तमपैकी मोठा नकाशा जोडला आहे. प्रकाशनास योग्य अशी काही चित्रे यात आहेत. माझ्या मते यातील एक अत्यंत सुबक चित्र आपण वगळू नये. या चित्रावरून एक कटाक्ष टाकल्यानंतर आपण मला याबाबतीत योग्य तो सल्ला देऊ शकाल.

या पुस्तकाचे प्रकाशन सत्वर करणे आपणास शक्य असेल तर या बाबतीत सर्वप्रथम मी आपणास विनंती करीत आहे. या महिनाअखेर मी लंडनला येईन तेव्हा माझे हस्तलिखित आपल्या अवलोकनार्थ पाठविण्यास मला आनंद होईल. त्यानंतर आपण मला आपल्या अटी कळवू शकता. लंडन शहरातील माझे वास्तव्य मर्यादित असल्यामुळे अशी विनंती मला

---

१. लंडनच्या वास्तव्यात जॉन मरे कंपनीकडे ग्रँट डफच्या पत्रांची चौकशी केली असता, खूप तपास करून त्या कंपनीने हे अत्यंत महत्त्वाचे पत्र उपलब्ध करून दिले. त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून प्रस्तुत पत्रातील महत्त्वाचा भाग येथे उद्धृत करीत आहे.

करणे भाग पडत आहे. अशा प्रकारच्या ग्रंथाच्या प्रकाशनास विलंब लागणार याची मला पूर्ण कल्पना आहे, आणि या कामावर व्यवस्थित देखरेख खुद्द लेखकानेच करणे रास्त ठरेल. माझ्यासंबंधी कोणाकडे तरी पृच्छा करण्याची तुमची इच्छा असणे स्वाभाविक आहे. तसेच माझे हस्तलिखित वाचून त्यावर मत देऊ शकेल अशी कोणीतरी जबाबदार आसामीही तुम्हाला शोधावी लागेल. याबाबतीत तुम्हाला मार्गदर्शन कसे करावयाचे हा माझ्यापुढे एक मोठा पेचच आहे. मुंबई सरकारच्या नोकरीतील कोणी व्यक्ती तुमच्या परिचयाची असणे संभवनीय आहे. त्या व्यक्तीकडून तुम्हांस योग्य ते मार्गदर्शन घडेल अशी अपेक्षा आहे. सर जॉन माल्कम हे मला काहीसे ओळखतात. २३ पोर्टलंड प्लेसवर राहणारे कर्नल मार्क विल्क्स आणि मी मागे एकदा तुमच्याकडे आलो होतो. सी. ए. मॅकन्झी ( ४४, पार्लमेंट स्ट्रीट ) हे आपला परिचय करून देण्यासाठी मजबरोबर आले होते पण आपली भेट होऊ शकली नाही.

माझ्या या हस्तलिखितांपैकी काही भाग वाचलेली अशी फारच थोडी माणसे या देशात आहेत. 'ब्रिटिश इंडिया' या पुस्तकाचे लेखक मि. मिल यांनी याचा काही भाग पाहिला आहे. सध्या एडिंबरा येथे असलेले, आणि पूर्वी मुंबई सरकारच्या नोकरीत असलेले विल्यम इरस्किन यांनी या हस्तलिखिताचा पहिला भाग वाचला आहे. या पुस्तकासाठी मी वापरलेल्या साधनांची माहिती ते देऊ शकतील. माझ्या लिखाणाचा प्रारंभीचा मसुदा मी ज्या काही थोड्या मित्रांना दाखविला होता त्यांपैकी ते एक आहेत. प्रत्येक घटना ही शक्यतो विचारविनिमय करून, अधिकारी व्यक्तींच्या साहाय्याने ताबडतोब तपासून घेण्याची माझी पद्धती होती.

माझा पत्ता ३९ यॉर्क, बेकर स्ट्रीट असा राहील. या पत्राचे वरील पत्त्यावर उत्तर पाठवून आपण मला उपकृत करावे, आणि मी जो दिवस —३१ जानेवारी—सुचविला आहे त्या दिवशी माझी वाट पाहावी."

( १७ जानेवारी, १८२६ )

एका नवोदित लेखकाने एका बड्या प्रकाशकाला आर्जवी शब्दात आपल्या पुस्तकाच्या प्रकाशनासंबंधी लिहिलेल्या पत्राचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे. आपला हा अपूर्व ग्रंथ प्रकाशित करण्यास प्रकाशकही तसाच तोलामोलाचा हवा अशी त्याची भाबडी भावना असणे स्वाभाविक होते.

शेवटी एकदाचे हस्तलिखित मरे कंपनीकडे धाडण्यात आले. ज्या व्यक्तीकडे हे वाचून छापण्यास योग्य आहे किंवा नाही याबाबतीत मत

विचारले होते त्याने आपला अनुकूल अभिप्राय दिला होता. मरेच्या बोलावण्यावरून अल्बेमारली स्ट्रीटच्या या बादशाहाकडे ग्रँट गेला. या ग्रंथाच्या नामाभिधानात थोडासा बदल केल्यास आपण तो छापू असे मरेने त्याला आपले मत सांगितले.[२] त्यावर ग्रँट म्हणाला, "हा मराठ्यांचा, अगदी केवळ मराठ्यांचा इतिहास आहे." त्यावर मरे म्हणाला, "परंतु या मराठ्यांबद्दल कोणास काय माहिती आहे?" यावर ग्रँट म्हणाला, "केवळ याच कारणासाठी या ग्रंथाची निर्मिती झाली आहे. त्यांच्याविषयी विशेष माहिती कोणासच नाही." मरे म्हणाला, "ठीक आहे. पण त्याची कोण पर्वा करतो? मुघलांचे पतन आणि ब्रिटिशांचा उदय (Downfall of the Moguls, and the Rise of the English) अथवा अशाच आशयाचे काही नाव दिल्यास चालेल. परंतु "मराठ्यांचा इतिहास" या नावाने काढलेले पुस्तक केव्हाही खपणार नाही." ("A History of the Mahrattas—that will never sell.")

मरेचे विधान सत्य होते तरी देखील त्यामुळे तो निराश झाला नाही. हिंदुस्थानबद्दल इंग्रज लोकांमध्ये आता थोडे अधिक कुतूहल निर्माण झाले असले तरी युरोपवर जितक्या अधिकारवाणे लिहू शकतील तितक्याच अधिकाराने हिंदुस्थानवर लिहिणारे किंवा बोलणारे फारच थोडे लोक होते. ही एक मोठी उणीव होती याची कल्पना त्याला होती. याचे कारण लेखकाला अथवा वक्त्याला उद्युक्त करील अशा भावनेचा येथील लोकांमध्ये अभाव होता, त्यामुळे हिंदुस्थानसंबंधीचे सारे लिखाण म्हणजे केवळ घटनांचे निवेदन करणारी कंटाळवाणी कामगिरी असे त्याचे स्वरूप बनले आहे, असे ग्रँटचे मत बनले होते. अर्थात याला ऑर्मचे 'कर्नाटक' हे पुस्तक अपवादात्मक आहे हे त्याने कबूल केले आहे.

मरेबरोबरची बोलणी फिसकटल्यामुळे दुसरा काही मार्ग शोधून काढणे आवश्यक होते. आपल्या हस्तलिखिताची बाडे त्याने सर जेम्स मॅकिन-टॉशकडे पाठविली. जेम्स मॅकिनटॉश दयार्द्रबुद्धीने ते हस्तलिखित घेऊन कॅडोगन प्लेस (Cadogan Place) या आपल्या निवासस्थानापासून पॅटरनोस्टर रो (Paternoster Row) येथील लाँगमन कंपनीच्या कार्यालयापर्यंत चालत गेला, आणि त्याच्या शिफारशीमुळे लाँगमनने ताबडतोब पुस्तक छापण्याची आपली इच्छा व्यक्त केली. सहा आठवड्यांच्या कालावधीत छपाईचे काम आटोपण्यात आले. ग्रँटने मुद्रणातील बऱ्याच

२. ग्रँट डफ : प्रस्तावना, पृ. xxxix.

चुका दुरुस्त केल्या होत्या तरीसुद्धा कंपोझिटरच्या सूक्ष्मदृष्टीतून काही निसटल्याच. तो म्हणतो, "याचे कारण हस्तलिखिताची प्रत सुस्पष्ट असल्यामुळे प्रुफे तपासण्यासाठी एका कमी अनुभवी माणसाची नियुक्ती झाली होती. पण हीच प्रत जर, ज्याचा तिरस्कार करावा अशा, माझ्या दुर्बोध हस्ताक्षरात असती तर एखादा चांगला अनुभवी माणूस माझ्या पुस्तकाच्या छपाईकडे लक्ष देण्यासाठी नेमला असता, आणि मुद्रणातल्या चुका आपोआपच गेल्या असत्या."

मि. रीज (Rees) हा या कंपनीचा एक भागीदार होता, आणि ग्रँटने प्रामुख्याने त्याच्याशीच सारे व्यवहार केले होते. प्रकाशनाच्या धंद्यात रीजइतका जाणकार माणूस लंडनमध्ये त्यावेळी नव्हता. पुस्तकाच्या संभाव्य खपाचा अंदाज घेताना भारताच्या नावे त्याने फार थोड्या प्रतींचा आकडा टाकला होता. ग्रँटला याचे आश्चर्य वाटले, म्हणून त्याने असे करण्याच्या मागील हेतू काय अशी विचारणा केली. त्यावर रीज म्हणाला, "याचे कारण, भारतातील लोक पुस्तके विकत घेत नाहीत; दुसऱ्याकडून उधारउसनवार करून ते पुस्तके वाचतात. एक साधनग्रंथ म्हणून मराठ्यांचा इतिहास विकत घेतला जाईल अशी परिस्थिती निर्माण व्हायला बराच काळ लागेल."[3] मरे या प्रकाशकाचे म्हणणे आतापर्यंत (१८४८) तरी खरे ठरले होते. एखाद्या विषयासंबंधी अधिक जाणून घेण्याची इच्छा निर्माण होण्यापूर्वी लोकांना प्रथम थोडीतरी त्या विषयाची माहिती असणे अगत्याचे असते हे मराठ्यांच्या इतिहासाच्या नामाभिधानाच्या निमित्ताने मरेने त्याला सुचविलेल्या विचारांचे प्रत्यंतर त्याला येत होते.

या पुस्तकाच्या प्रकाशनाचे धाडस करण्याचे लाँगमन कंपनीने ठरविले. मुद्रणप्रत तयार होईपर्यंत ग्रँटचे या पुस्तकावर २००० पौंडाहून अधिक पैसे खर्च झाले होते. ईस्ट इंडिया कंपनीच्या नियामक मंडळाने (Court of Directors) अगदी उदार अंतःकरणाने या पुस्तकाच्या ४० प्रती खरेदी केल्या. मराठ्यांच्या इतिहासाऐवजी ग्रँटने मराठी शब्दरत्नाकर लिहिला असता तरी कंपनीने तितक्याच प्रती घेतल्या असत्या. आपण सरकारला

---

३. ग्रँट डफ खंड १, प्रस्तावना xi.

" ...people in India don't buy–they read but borrow–and it would be long before the Mahratta History would be bought as an *outfit* book."

उपयुक्त अशी साधने गोळा केली होती, आणि एक अस्सल आणि अतिशय मौलिक असा नकाशा तयार करून दिला असता त्याची साधी पोच देण्याची माणुसकी कंपनीने दाखविली नाही याची त्याला खंत वाटत होती. या सर्व व्यवहारात ग्रँटला नफा-तोटा किती झाला याची कंपनीने कधी विचारणा केली नाही, आणि ग्रँटने आपणहून कधी सांगितले नाही. पण या व्यवहारात सुमारे १७०० पौंडाची खोट त्याला बसली होती. याचा अर्थ कदाचित त्याला १८४८ पर्यंत पूर्वीच्या २००० पौंडापैकी पुस्तकाच्या विक्रीतून रॉयल्टीच्या रूपाने ३०० पौंड मिळाले असावेत. पण पैसे गेल्यापेक्षा त्याला दुःख होते ते याचे की काही अगदी मोजके लोक सोडल्यास, कंपनीच्या डायरेक्टराने अथवा डायरेक्टर होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्याने या मराठ्यांच्या इतिहासाच्या ग्रंथाला स्पर्श देखील केला नव्हता. अर्थात ही बाब काही विशेष महत्त्वाची नव्हती असे जरी मानले तरी ज्या कंपनीच्या नोकरांनी आपली दैनंदिन कामे सांभाळून, विशेष परिश्रम करून काही निर्मिती करून दाखविली, आणि आपल्या कार्याने तशाच तऱ्हेचे काम करण्यास इतरांना उद्युक्त केले, अशा कंपनीच्या नोकरांना निरुत्साही करणारी अशी ही कंपनीची वागणूक होती असे ग्रँट म्हणतो. गोल्डस्मिडला लिहिलेल्या या पत्रात ग्रँटने हा सर्व खुलासा केला आहे. गोल्डस्मिड हा सनदी नोकरीत होता. कॅप्टन विंगेट याच्या मदतीने त्याने दक्षिणदेश आणि कर्नाटक यांची पाहणी करून अहवाल प्रसिद्ध केला होता. इंग्लंडमध्ये रजेवर असताना त्याने १८४५–४६ साली ग्रँट डफला या पुस्तकाची दुसरी आवृत्ती काढण्याची विनंती केली असता, त्याची आवश्यकता कशी नाही हे समजावून देण्यासाठी म्हणून ३० जानेवारी १८४६ रोजी हे इतके विस्तृत पत्र लिहिले होते. या पत्राच्या शेवटी तो म्हणतो, "हा तपशील महत्त्वाचा नसला तरी तो तुला मनोरंजक वाटेल."[४]

या पुस्तकाची एक सुधारित आवृत्ती काढावी असा विचार १८४० पूर्वी मांडण्यात आला होता. पण ग्रँटने तिकडे विशेष लक्ष दिले नाही. इतिहासाच्या अभ्यासक्रमात या पुस्तकाचा समावेश झाला होता किंवा नाही हे सांगणे कठीण आहे. कारण विद्यापीठांची स्थापनाच १८५७ नंतर

---

४. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबईशाखेच्या पत्रिकेत (१८७१–४) कार्यवाह जेम्स टेलर यांनी गोल्डस्मिडकडून १८५४ साली मिळविलेले हे पत्र प्रसिद्ध केले आहे. एडवर्डस्ने संपादिलेल्या आवृत्तीत या पत्रातील महत्त्वाचा भाग उद्धृत केला आहे.

झाल्यामुळे सुसंबद्ध असे अभ्यासक्रम अद्याप तयार व्हावयाचे होते. परंतु पश्चिम भारतातील मुलकी अधिकाऱ्यांना हा ग्रंथ म्हणजे एक मार्गदर्शक मित्र आहे असे वाटत असावे असे गोल्डस्मिडच्या उपरीनिर्दिष्ट पत्रावरून वाटते. दुसऱ्या आवृत्तीसंबंधी १८३६ पासूनच सूचना येत होत्या. ग्रँटला याबाबत विशेष उत्साह नव्हता. तरी लाँगमन आणि कंपनीला त्याने याबाबत लिहिले. परंतु त्यांचे उत्तर फारसे उत्साहजनक नव्हते. त्यामुळे चांगला न वठलेला कितीतरी भाग परत सुधारून लिहिण्याच्या त्याच्या इच्छेला जोरदार चालना मिळाली नाही. आपल्या लिखाणात सुधारणा केली पाहिजे याची त्याला कल्पना होती. पण शेतीच्या आणि कोर्टकचेरीच्या कामांत तो इतका गुंतला होता की इतिहासाच्या कामाकडे लक्ष देण्यास त्याला फुरसत नव्हती.

१८४६ साली हे पुस्तक सहजासहजी बाजारात मिळत नव्हते याची त्याला कल्पना होती. परंतु प्रकाशकांनी आता दुसरी आवृत्ती काढण्याची इच्छा व्यक्त केली असती, तर पुनर्लेखनाच्या भरीस न पडता, केवळ गोल्डस्मिडसारख्या मित्रांच्या शिफारशीनुसार त्याने तसे करण्यास प्रकाशकाला विनंती केली असती. परंतु तो जिवंत असेपर्यंत त्याच्या इतिहासाच्या दुसऱ्या आवृत्तीचा योग आला नाही.

'मराठ्यांच्या इतिहासा'पासून लोकप्रियता, प्रतिष्ठा अथवा आर्थिक लाभ यांचे ग्रँट डफला जिवंत असेपर्यंत समाधान मिळाले नाही. त्याच्या मृत्यूनंतर ५ वर्षांनी त्याच्या इतिहासाची दुसरी तीन भागांची आवृत्ती १८६३ साली मुंबई येथे बहुधा टाईम्स ऑफ इंडिया प्रकाशन संस्थेमार्फत निघाली असावी. ही आवृत्ती कोठे पाहावयास मिळत नाही, परंतु लंडन येथील एक पुस्तकविक्रेते फ्रॅन्सिस एडवर्डस् यांच्या पुस्तकाच्या कॅटलॉगमध्ये या आवृत्तीचा 'बॉम्बे रिप्रिंट, तीन भाग १८६३ किंमत १ पौंड ५ शिलिंग' असा उल्लेख आहे असे सहाव्या आवृत्तीचे संपादक एडवर्डस् म्हणतात.[५] परंतु पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये ही आवृत्ती आहे.

तिसरी आवृत्ती १८७३ साली ही मुंबईमधून टॉईम्स ऑफ इंडिया प्रेसने प्रसिद्ध केली म्हणजे पहिली आवृत्ती संपावयास जवळ जवळ ३७ वर्षे लागली. पण तिसरी आवृत्ती मात्र अवघ्या १० वर्षांत निघाली. गोल्डस्मिडला १८४६ मध्ये लिहिलेल्या पत्रात ग्रँट डफने दहा वर्षांपूर्वीच म्हणजे १८३६ च्या सुमारास आपल्या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीसंबंधी

---

५. ग्रँट डफ : प्रस्तावना पृ. lxxvii.

विचारणा झाली होती आणि १८४६ साली हे पुस्तक बाजारात मिळत नसल्याचे वृत्त सांगितले आहे. यावरून कदाचित पहिली आवृत्ती देखील १०–१२ वर्षांत संपली असावी असे मानावयास हरकत नाही. तिसरी आवृत्ती एक भागात असून पृष्ठसंख्या ७१० आहे. पूर्वीच्या आवृत्त्यांपेक्षा या आवृत्तीची किंमत कमी ठेवली असून त्यामुळे या पुस्तकाच्या वाचकांची संख्या पूर्वीपेक्षा वाढेल अशी अपेक्षा प्रकाशकाने व्यक्त केली आहे.

तिसरी आवृत्ती लोकप्रिय झाली असावी. कारण अवघ्या ५ वर्षांत, म्हणजे १८७८ साली, टाईम्स ऑफ इंडिया प्रेसला याची चौथी आवृत्ती काढावी लागली. ही दोन भागांची होती.

पाचवी आवृत्ती १९१२ साली तीन भागांत, कलकत्त्याहून प्रसिद्ध झाली. याचे प्रकाशन आर. कॅमब्रे कंपनीने केले होते. या पुस्तकाचे एक वैशिष्ठ्य म्हणजे श्री. बी. ए. गुप्ते यांनी काही परिशिष्टचे जोडली आहेत. या परिशिष्टांतील, वैयक्तिक, प्रादेशिक आणि शासकीय अशा शीर्षकाखाली दिलेली टिपणे त्रुटित आणि असमाधानकारक आहेत. या पुस्तकाचे दुसरे वैशिष्ठ्य म्हणजे ग्रँट डफचे चित्र प्रथमच येथे प्रकाशित केले आहे. प्रस्तुत चित्र ग्रँटचा नातू इ. एम्. ग्रँट डफ याच्याकडून मिळाले होते.[६]

सहावी आवृत्ती १९२१ साली भारतीय सनदी नोकरीतील एक अधिकारी एस्. एम्. एडवर्डस् यांच्या संपादकत्वाखाली ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने दोन भागांत काढली. एडवर्डस् यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक या ग्रंथाचे संपादन केले आहे. या ग्रंथास जोडलेली प्रदीर्घ प्रस्तावना आणि कंसात दिलेल्या तळटीपा ही या ग्रंथांची वैशिष्टचे म्हटली पाहिजेत. या प्रस्तावनेत ग्रँट डफचे त्रोटक चरित्र, मराठ्यांच्या इतिहासाची निर्मिती कशी झाली,

---

६. हे तैलचित्र तसेंच ग्रँट डफची पत्नी कॅथेरिन, आणि सासू लेडी ॲनस्ली यांची तैलचित्रे ग्रँट डफची पणती श्रीमती शीला सकलोव्ह ग्रँट, वुडब्रिज, ऑरफोर्ड, सफोल्क, लंडन यांच्या संग्रही आहेत. सातान्याच्या पारसनीस संग्रहात सिपिया रंगात असलेली जेम्स ग्रँटची एक तसबीर आहे. (Engravings List of portraits framed) कॅटलॉगमध्ये पृ. ५७ वर नऊ नंबराखाली "कॅप्टन जेम्स ग्रांट डफ, सातान्याचा पहिला रेसिडेंट" अशी नोंद आहे. (२६"×१८½") पारसनिसांनी व्हिजिटर्स बुकातील नोंद दाखविली त्यात ग्रँट डफच्या वंशातील एकाने—ग्रँट डफ, ६ डिसेंबर, १९३५ रोजी भेट दिली, त्या ग्रँटची माहिती आणि सही तेथे आहे. इतिहासकाराच्या सर्वात मोठ्या मुलाचा हा मुलगा होय.

मराठ्यांचे मूळ, मराठी साहित्य, ग्रँट डफच्या इतिहासाच्या पूर्वीच्या आवृत्त्या, ही प्रस्तावना लिहिण्यासाठी आणि तळटीपा तयार करण्यासाठी वापरलेल्या संदर्भग्रंथांची सूची, ग्रँट डफने आपल्या पुस्तकाला लिहिलेली पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना, यांचा समावेश केला आहे. या आवृत्तीतील ग्रँट डफचे चित्र हे त्याचा नातू ए. सी. ग्रँट याने दिले आहे असा उल्लेख आहे. पाचव्या आवृत्तीप्रमाणेच हे चित्र आहे.[७]

ग्रँट डफच्या मराठ्यांच्या इतिहासाचे मराठीत भाषांतर होणे आवश्यक होते. विशेषतः सातान्याचा राजा प्रतापसिंह याने हे काम करावे अशी ग्रँटच्या मागून सातान्याचा रेसिडेंट बनलेला जनरल ब्रिग्ज याने विनंती केली होती. २० ऑगस्ट, १८२७ रोजी राजाला लिहिलेल्या पत्रात तो म्हणतो, "ग्रँट डफकृत मराठी साम्राज्याच्या इतिहासाची प्रत आपणास मिळाली असावी असा भरवसा आहे. आपण ती प्रत मिळवून तिचे क्रमशः मराठीत भाषांतर करावे, आणि नंतर मुंबई येथील शिळाप्रेसमधून ती छापून घ्यावी. हा उत्कृष्ट इतिहासग्रंथ रचून ग्रँटने जसे आपले युरोपात नाव केले तसे याचे भाषांतर करून या पूर्वेकडील देशात आपण नाव कमवावे."

रावबहादूर पारसनीस यांनी १९०५ साली मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीत या संदर्भात असे सांगितले की राजाने या ग्रंथाचे मराठीत भाषांतर करून घेतले होते, पण दुर्दैवाने ते भाषांतर केव्हाही छापले गेले नाही. सातान्याचे दप्तर लावताना पारसनिसांना हे हस्तलिखित मिळाले होते, आणि ते या संस्थेस भेट म्हणून देण्याचे त्यांनी जाहीर केले होते.

१८२९–३० साली कॅ. डेव्हिड केपन यांनी बाबा साने यांच्या साहाय्याने या ग्रंथाचे "ग्रँट डफकृत मराठ्यांची बखर" या नावाने भाषांतर केले, आणि १९१६ पर्यंत या पुस्तकाच्या सहा आवृत्त्या निघाल्या. यावरून ही मराठी बखर वाचली जात होती असे मानावयास हरकत नाही.

१८३० च्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत "बखर लिहिण्याचे कारण म्हणून एक निवेदन दिले आहे." कोणी ह्मणेल कि ही बखर कोणी कशी निर्माण केली व करण्याचे कारण काय; तर त्याणे असे समजावे कि बाजीराव असता, अलिपष्टन साहेबाचा हाताखाली कारभार चालविणारा

७. असोसिएट पब्लिशिंग हाऊस, दिल्ली यांनी नुकतीच (१९७०) सातवी आवृत्ती प्रसिद्ध केली आहे. तिचे संपादक गुहा जे. पी. असून दोन भागांची किंमत १२० रु. आहे.

कप्तान ग्राटसाहेब पुण्यास होता. तो पुढे बाजीराव गेल्यावर साताऱ्यास नेमिला. तो तेथे असता, त्याचा मनात आले कि महाराष्ट्र लोक इतक्या योग्यतेस कसे चढले ते समजावयास त्या लोकांचे प्राचीन वृत्त ध्यानास आणिले पाहिजे. तेणे करून विलायतेतील लोकांसहि विदित होईल, ह्मणोन त्याने बहुत जागचे पुरातन लेख जमा केले त्यात कित्येक कोणी आपले संतोषें करून दिले व कित्येक त्याणें द्रव्य खर्चून घेतले. याशिवाय सरकारची दप्तरे पुणे आदिकरून जितके जागी होती त्या सर्व जागाहून पुरातन लेख आणिले. याशिवाय जा जा देवस्छानी पूर्वीची देवास अग्रहार करून दिलेलीं पत्रें, ती व कोणी मोठे सरदार लोक यांस जहागिरीचा सनदा करून दिलेल्या त्या व मुसलमानांनी लिहिलेल्या बखरा, व पूर्वी साहेब लोकानी लिहिलेले हिंदूंचे वृत्त, यांतील सर्व गोष्टीचा बहुत विचार करून व त्या त्या समय विशेषाचाहि शोध करून, त्या सर्व विस्तारांतील सारांश निवडून, आपले बरोबर घेऊन विलायतेस गेला. आणि तेथे इंग्रेजी भाषेत त्याची बखर लिहून छापिली, तिची तीन बुकें जाली. त्यांतील गोष्टी महाराष्ट्र मुलखी लोकास फार हितावह आहे तशास समजून सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे आज्ञेवरून कप्तान केपिन साहेब याणी बाबा साने यांचे साहाय्याने ती इंग्रेजी भाषेची बखर मराठी भाषेत लिहून सन अठराशे एकुणतिसांत मुबैमध्यें छापिली." या शिळाप्रेसवर छापलेल्या प्रतीची पृष्ठसंख्या ४१४ आहे. ग्रँट डफच्या इतिहासाचे हे अगदी शब्दशः भाषांतर नाही हे यावरून स्पष्ट होईल. त्याच्या छापील ग्रंथाची पाने १००० हून अधिक भरतात.

कॅप्टन डेव्हिड केपन (१७९३–१८६९) याचा जन्म मुंबईचा, शिक्षण इंग्लंडमध्ये झाले, पण नोकरी परत भारतात—पश्चिम भारताच्या कोकण विभागात झाली. १८१०–१८१७ ही सात वर्षे त्यांनी कोकण विभागात काढली. लष्करात असताना ते मराठी दुभाषाचे काम करीत. लष्करी खात्यात ते शेवटी जनरलच्या हुद्यापर्यंत चढले होते. त्यांना मराठीचे ज्ञान चांगले असल्यामुळे भाषांतराचे काम त्यांच्याकडे सोपविण्यात आले होते.

१८४६–४७ साली या ग्रंथाची दुसरी आवृत्ती निघाली होती.[८] ती पुना कॉलेज प्रेसने ( लिथोग्राफ ) छापली. "या ग्रंथाची दुसरी आवृत्ती

---

८. बखर मराठ्यांची क्यापटन ग्रांट डफ याणी इंग्रेजीत केलेली तीचे भाषांतर क्यापटन डेविड केपन साहेब याणी महाराष्ट्र भाषेत केले. मुंबई, जानेवारी १८३०.

छापण्याचे प्रसंगी याची प्रति मेहरबान मेजर क्यांडीसाहेब बहादूर पाठशाळेचे सुपरिंटेंडेंट यांचे हुकमाने परशुराम बल्लाळ गोडबोले यानी नीट केली " असे या ग्रंथाच्या प्रारंभी म्हटले आहे. ही आवृत्ती दोन भागांत होती. तिसरी आवृत्ती १८५२–५३ मध्ये दोन भागांत पुण्याहूनच निघाली. चौथी आवृत्ती मुंबईहून १८५७ साली निघाली. पाचवी आवृत्ती १८९२ साली काशीनाथ पांडुरंग परब यांनी शुद्ध केली आणि मुंबईमध्ये छापली. सहावी आवृत्ती म्हणजे परबांच्या आवृत्तीचेच १९१६ साली केलेले पुनर्मुद्रण होय.

सहाव्या आवृत्तीचे संपादक श्री. का. पा. परब प्रस्तावनेत म्हणतात, " ह्यात अलीकडच्या किती एक ग्रंथावरून बरीच नवी माहिती घालता आली असती, आणि शुध्दीकरणही बरेच करता आले असते. परंतु मुळात फेरफार करावयाचा नाही अशी अट डायरेक्टर साहेबांनी घातली आहे. त्यामुळे तसे काही करता आले नाही."[९]

या पुस्तकाच्या गुजराथी आणि हिंदी या भाषांतूनही आवृत्त्या निघाल्या आहेत. मराठ्यांचा इतिहास हा प्रामुख्याने भारताचा इतिहास असल्यामुळे सर्व भाषिकांना या इतिहासाचे आकर्षण असणे स्वाभाविक होते.

मराठ्यांचा इतिहास हातावेगळा झाल्यानंतर इडनचा एक सन्मान्य नागरिक म्हणून ग्रँट आपले जीवन कंठू लागला. आपल्या इतिहासाचे भवितव्य काय याचा चुकूनसुद्धा त्याने विचार केला नाही. कंपनीचे सेवानिवृत्त अधिकारी मधून मधून आपल्या गावातील क्लबात वेळ काढण्यासाठी म्हणून येत. पण भारताच्या राजकारणात अथवा इतिहासात ते रतिभरसुद्धा रस घेत नसत. त्यांचा सर्व वेळ वायफळ गप्पा मारण्यात आणि मधून मधून जांभया देण्यात जात असे. त्यांचे चर्चेचे विषय म्हणजे जिल्हा, पंचायत, टॉम मन्रो कायमधाऱ्याची पद्धत आणि कॉलरा अशासारखे असत. आणि हा जॉनबुल आपल्या मराठ्यांच्या इतिहासावर जांभया देत कसा चर्चा करीत असेल याचे कल्पनाचित्र रेखाटीत आपला इडनमधील काळ ग्रँट डफ कंठीत होता.[१०]

---

९. मराठ्यांची बखर, ६ वी आवृत्ती, प्रस्तावना पृ. १.

१०. ग्रँटचे पत्र, ता. २७–४–२७.

# ११

# टीकाकार

१८२६ साली ग्रँटचे पुस्तक प्रसिद्ध झाले पण बरेच दिवस टीका-कारांचे त्याच्याकडे विशेष लक्ष गेल्याचे दिसत नाही. परीक्षणासाठी पुस्तक पाठवून त्याची प्रसिद्धी करावी या मित्रांच्या आणि प्रकाशकांच्या विचाराशी तो सहमत नव्हता. या पुस्तकाचा खप वाढवावा, त्याची दुसरी आवृत्ती काढावी अशा तऱ्हेचे प्रयत्न प्रकाशकाने देखील केले नाहीत. ईस्ट इंडिया कंपनीने देखील अधिक प्रती घेऊन या पुस्तकाची विशेष दखल घेतली नाही. मराठ्यांच्या इतिहासाऐवजी, मराठ्यांवर त्याने एखादा अहवाल ( Report ) तयार केला असता तर त्यासाठी लागणारा सारा खर्च कदाचित कंपनीने उचलला असता आणि त्याचे प्रकाशनही केले असते.

या इतिहासाचे प्रारंभीचे वाचक प्रामुख्याने महाराष्ट्र, गुजराथ येथील महसूलअधिकारी असावेत. संस्थानिकही वाचत असावेत. सांगलीकरांच्या रोजनिशीत अशी नोंद आहे, "ग्रांटसाहेब याणी श्रीमंताचे कारकीर्दीचे बुके छापीली आहेत ते काढून काही वाचून दाखविले" ( ६ जुलै, १८४८ ). 'दुसरी आवृत्ती छापा' अशी विनंती आली ती गोल्डस्मिड या महसूल-अधिकाऱ्याकडून. याच गोल्डस्मिडने विंगेटच्या साहाय्याने पुढे पश्चिम भारतातील जमीनमहसुलासंबधीचा अहवाल प्रसिद्ध केला. त्याच्या पत्राला उत्तर म्हणून या इतिहासाच्या जन्माची कर्मकहाणी ग्रँट डफने १८४० साली सांगितली.

भारतीय टीकाकारांचा इंग्रज इतिहासकाराकडे पाहण्याचा एक दृष्टि-कोन बनला होता. इंग्रजांना भारताच्या इतिहासाबद्दल तिरस्कार आहे, त्यांचे तिकडे दुर्लक्ष आहे, आणि 'स्वजाति दुरतिक्रमा' या न्यायाने स्वतःच्या जातीचे ढोल बडविताना भारतीयांवर हवा तसा अन्याय केला आहे असे, मॉरीसचा इतिहास आणि पेनी एन्सायक्लोपीडिया या दोन ग्रंथां-संबंधी बोलताना विष्णुशास्त्री यांनी 'इतिहास' या आपल्या निबंधात म्हटले आहे.[१] अर्थात ग्रँट डफच्या भगीरथ प्रयत्नांचे मात्र ते कौतुक करतात.

---

१. निबंधमाला, पृ. ८९.

विविध ज्ञान विस्तारात 'चिटणीसांची बखर' प्रसिद्ध केली आहे. त्या अंकाच्या उपोद्‌घातात व्यक्त केलेल्या विचारावरून मराठी टीकाकारांच्या भूमिकेची कल्पना येईल. "मराठ्यांचा इतिहास जो बहुधा उपलब्ध आहे तो मुसलमान इतिहासकारांनी लिहिल्याप्रमाणे व इंग्रज इतिहासकार यांनी लिहिल्याप्रमाणे आहे. मुसलमान लोकांस आम्ही जिंकले व इंग्रजी लोकांनी आम्हांस जिंकले. तेव्हा या दोनही इतिहासकारांचे लेख सर्वस्वी ग्राह्य म्हणता येत नाहीत. ज्यांचेविषयी हे ग्रंथ आहेत त्यांचे म्हणणे काय आहे हे जाणणे अवश्य आहे."[२]

मराठी साधने गोळा करण्याची मोहीम ही या विचारांतूनच जोम धरू लागली, आणि इंग्रज व इतर इतिहासकारांनी या स्थानिक साधनांना किती महत्त्व दिले आहे हे जाणून घेण्याचे प्रयत्न होऊ लागले. ग्रँटने कोणते ग्रंथ वापरले, त्याचा इतिहास साधार आहे किंवा नाही हे पडताळून पाहण्याकडे लोकांचे लक्ष वेधले गेले.

ग्रँट डफच्या टीकाकारांचा विचार करण्यापूर्वी त्याला स्वतःला आपल्या इतिहासाविषयी काय म्हणावयाचे आहे याचा तपास करणे योग्य ठरेल. १८२६ साली त्याने आपल्या ग्रंथाला जी प्रस्तावना लिहिली आहे ती या दृष्टीने महत्त्वाची आहे.[३] तो म्हणतो, "हा ग्रंथ घेऊन जनतेपुढे येताना मला माझ्या मर्यादा लक्षात यतात. वयाच्या १६ व्या वर्षी मी माझ्या शिक्षणाला रामराम ठोकला आणि पुढील २१ वर्षांच्या आयुष्यातील नऊदशांश वर्षे महत्त्वाची सनदी आणि लष्करी कामे बजावण्यात खर्च केली. अशा तऱ्हेचे जीवन कदाचित काही माहिती मिळविण्यास उपयुक्त असेल, परंतु इतिहासलेखनास आवश्यक ते वातावरण अशा धामधुमीच्या जीवनात सापडेल असे मानणे अवास्तव होईल. परंतु आमच्यासारख्या सनदी नोकरीतील काही लोकांनी अशी कामे अंगिकारली नाहीत तर भावी इतिहासकारांना साधने कशी उपलब्ध होतील आणि इंग्लंडमधील लोकांना भारताची माहिती तरी कशी होणार ?

"माझ्या लेखनशैलीत आवश्यक ते कौशल्य नाही. त्यामुळे लिखाणात काही दोष राहिले असतील. तेव्हा त्याबाबत मी वाचकांच्या अनुग्रहाची याचना करतो. परंतु त्याचबरोबर वाचकांच्या निदर्शनाला मला एक गोष्ट आणावयाची आहे. मराठी नावे उच्चारावयास कठीण आणि

---

२. विविध ज्ञान विस्तार–चिटणीसी बखर (१८८२), पृ. ३–४.

३. ग्रँट डफ भाग १ पृ. xc, हा स्वैर अनुवाद आहे.

इतिहासाचा तपशील गुंतागुंतीचा आहे. याशिवाय या विषयाचे एक खास लक्षण असे आहे की ज्यामुळे एखादा सव्यसाची कुशल लेखकसुद्धा संभ्रमात पडला असता. मराठ्यांच्या उदयाचे प्रमुख कारण म्हणजे तत्कालीन इतर राज्यांतील अथिर परिस्थिती असे मानले जाते, आणि मराठ्यांचे सामान्यतः धोरण असे होते की शक्य असेल तेवढी गुंतागुंतीची परिस्थिती निर्माण करावयाची आणि महत्त्वाचे हक्कनिदर्शक असे वाजवी साहित्य नष्ट करावयाचे. त्यांच्या सैन्याने भारताची भूमी पादाक्रांत करावयास जशी सुरवात केली, तसा त्यांचा संबंध इतर राज्यांशी येऊ लागला, आणि त्यांच्या कार्याच्या कक्षा वाढल्या आणि इतर राज्यांनी देखील त्यांच्या धोरणाचा अवलंब केला. अशा परिस्थितीत इतिहासनिवेदनात सुसंगती राखण्यासाठी घटनांचा परस्परांशी संबंध दाखविण्यापेक्षा कालानुक्रमाने घटना मांडणे ह्याच पद्धतीचा मला अवलंब करावा लागला. त्यामुळे माझ्या इतिहासाचा पहिला भाग हा शकावलीसारखा वाटेल. परंतु याबाबतीत माझा नाईलाज झाला. तसे केले नसते तर हा दोष दूर करण्यासाठी मला फार मोठ्या प्रमाणावर सामान्य विधाने करावी लागली असती किंवा त्याच्याहून वाईट म्हणजे अनावश्यक असा लेखनविस्तार करावा लागला असता.

"युरोपियन वाचक डोळ्यांसमोर ठेवून मी काही ठिकाणी स्पष्टीकरणात्मक लेखन केले आहे. ते कदाचित भारतीयांना अनावश्यक वाटेल. त्याचप्रमाणे काही नावे आणि घटना पहिल्यांदाच माझ्या ग्रंथात आलेल्या आहेत. महाराष्ट्रातील वाचकांना आता त्याचे महत्त्व पटू लागेल याची मला खात्री आहे. पण ती माहिती गाळली असती तर बरे झाले असते असे वाटण्याचीही शक्यता आहे.

"इतिहासकाराने आपले स्वतःचे निष्कर्ष काढून मांडावेत की ते काम वाचकांवर सोपवावे या बाबतीत बरेच मतभेद असल्यामुळे माझा इतिहास वाचून काही मला दोष देतील तर काहींच्याकडून मला शाबासकी मिळेल. स्पष्ट मत नोंदविणे हे माझे कर्तव्य आहे असे जेथे जेथे मला वाटले तेथे मी माझ्या साऱ्या भावना बाजूला सारून ते व्यक्त केले आहे. अर्थात माझा भर प्रामुख्याने घटनांचे निवेदन करण्याकडे असल्यामुळे माझी वैयक्तिक मते मी मुद्दाम कोठेही घुसडली नाही. निम्या जगाचा विश्वास संपादन करावयाचा म्हणजे तो आहे असे गृहीतच धरले पाहिजे याची मला कल्पना आहे. पण राहिलेल्या निम्या जगाबद्दल मला असे म्हणावयाचे आहे की मला स्वतःलाच माझ्याबद्दलची खात्री नसल्याचे मी मोकळेपणाने मान्य केले असल्यामुळे त्या जगाचा माझ्यावर विश्वास असण्याचा प्रश्नच उरत नाही.



कॅप्टन जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ
( लंडन प्रत )

"एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे की माझ्या ग्रंथात केलेली विधाने, घटना पडताळून पाहण्यासाठी लागणाऱ्या श्रमात मी कुचराई केली नसली तरी पूर्वी लिहिलेल्या ग्रंथातील चुकीच्या विधानांचा परामर्ष घेण्याचा मी विचार केला नाही. मराठ्यांच्या इतिहासातील अनेक घटनांच्या बाबतीत अनेक चुकीची विधाने केली आहेत, त्यामुळे अस्सल कागदपत्रे पाहणे हेच नेहमी श्रेयस्कर असे मला वाटले. कारण कधीही न संपणाऱ्या अशा वितंडवादात भाग घेण्यात काही अर्थ नाही. त्याचबरोबर एक गोष्ट मला आवर्जून सांगितली पाहिजे ती ही की, प्रत्येक मताचा मी योग्य तो विचार केला असला, तरी परस्पर विरोधी मते वाचकांपुढे मांडणे इष्ट आहे असे जेव्हा मला वाटले तेव्हा तसे करण्यास मी विसरलो नाही. अशा बाबतीत वाचकांवर आपली मते लादण्यापेक्षा त्याने स्वतःच्या न्याय्य बुद्धीला वाटेल ते स्वीकारावे असे मला वाटते.

"अर्थात इतके करूनही अशा प्रकारच्या कामात चुका राहतात. त्याबाबत मी एवढेच म्हणेन की त्या योग्य तो विचार, चिकित्सा करून आणि सहानुभूतीने, खाजगी अथवा सार्वजनिकरीत्या मला कोणी दाखवून दिल्या तर मी त्याचा ऋणी राहीन."

ग्रँटचे मनोगत एवढ्या विस्तृतपणे देण्याचे कारण त्याच्या ग्रंथातील उणीवांची त्याला स्वतःला कशी जाणीव होती हे स्पष्ट व्हावे.

या निवेदनाच्या पार्श्वभूमीवर आपण त्याच्यावर होणारी टीका समजावून घेतली पाहिजे.

१४ मार्च १८६७ रोजी मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या सभासदांची बैठक भरली असता तीत मराठ्यांच्या इतिहासास उपयुक्त अशी साधने गोळा करून ती प्रसिद्ध करावीत याबद्दल चर्चा झाली. आणि या चर्चेच्या ओघात साहजिकच ग्रँट डफच्या ग्रंथाचा उल्लेख, सोसायटीचे सेक्रेटरी जेम्स टेलर यांना करावा लागला. त्यांच्या मते "ग्रँटच्या मौलिक ग्रंथाने मराठ्यांविषयी जे काही सांगण्यासारखे होते ते बहुतेक सारे सांगून टाकले आहे. अगदी शांतपणे आणि चिकित्सकपणे संशोधन करून तो इतिहास लिहिला आहे, त्याने आपले स्थान आता निश्चित केले आहे. त्या इतिहासात नवीन अशी भर फारच थोडी घालता येईल. ज्ञानाच्या कोणत्याही शाखेत एकाच ग्रंथावर सर्वस्वी आपण अवलंबून राहात नाही, पण मराठ्यांच्या इतिहासाबाबत मात्र आपण ग्रँटच्या एकाच पुस्तकावर

सर्वस्वी अवलंबून आहोत. ग्रँटने जी साधने वापरली आणि आपला इतिहास प्रमाणभूत आणि प्रभावी केला ती विविध प्रकारची साधने गोळा करणे ही गोष्ट दिवसेदिवस फारच कठीण होत चालली आहे."

टेलरच्या मते ग्रँटच्या इतिहासाची दुसरी आवृत्ती काढावी असे होते. १८५४ च्या सुमारास हा विषय त्याने मुंबईच्या सनदी नोकरीतील गोल्डस्मिड या अधिकाऱ्यापुढे काढला असता तो त्याला म्हणतो, "तुला तसे काही करावयाचे असेल तर तू प्रथम याबाबतीत त्याच्याशी बोलावे हे बरे. मी त्याला सुचविले होते की, जर इतिहासाची आवृत्ती काढली तर त्याचे सूत्र साताऱ्याचे राज्य खालसा होईपर्यंत न्यावे. अर्थात त्या बाबतीत आपले काही चांगले दर्शन घडणार नाही याची मला भीती वाटते. १८४५–४६ ला इंग्लंडमध्ये रजेवर गेलो असता, ओळख नसतानाही या ग्रंथाची नवी आवृत्ती काढण्याची मी विनंती केली. कारण हा ग्रंथ म्हणजे पश्चिम भारतातील मराठी जिल्ह्यांत काम करणाऱ्या सरकारी नोकरांना एक फार मोठे वरदानच होते." यावर ग्रँटकडून आलेले उत्तर त्याने टेलरला दिले, आणि त्याने ते सोसायटीत वाचून दाखवून ग्रँटच्या इतिहासाची कहाणी लोकांना निवेदन केली.[४]

अर्थात सभेतील काही लोकांना टेलरइतके ग्रँटच्या इतिहासाचे महत्त्व वाटत नव्हते. ग्रँटचा इतिहास हा प्रमाणभूत आहे असे मानावयास काही तयार नव्हते. सर्वसाधारणपणे त्याला जे महत्त्व दिले जाते ते वस्तुस्थितीला धरून नाही. आपण इतिहासात केलेल्या विधानांना आधार काय याचा स्पष्ट असा उल्लेख त्याने कोठे केला नाही.

चर्चेच्या ओघात टेलरने सांगितले की ग्रँटच्या विधानांना आधार नाही असे म्हणणे योग्य होणार नाही. या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेत त्याने आपण माहिती कोठून मिळविली आणि आपला इतिहास कशावर आधारलेला आहे हे निश्चितपणे सांगितले आहे.

ग्रँटने आपल्या इतिहासासाठी वापरलेल्या साधनांची चर्चा "मराठ्यांच्या इतिहासाची घडण" या प्रकरणात आली आहे. ग्रँटने केलेला पत्रव्यवहार तसेच त्याच्या पुस्तकाच्या तळटीपा पाहिल्या तर त्याचा इतिहास साधार नाही असे म्हणणे धाष्टर्याचे होईल. टेलरच्या मते असे विधान करणारे लोक दोन गोष्टींची गल्लत करतात. ग्रंथाचे मूळ आधार

४. JBRAS Vol. 9, 1867–70 p. vi & Vol. of 1871–4 Art XI pp. 120–25 हे दोन अंक पाहणे.

आणि ग्रंथाच्या रचनेची पद्धत. ग्रँटने आपल्या प्रस्तावनेत या कार्यातील अडचणी स्पष्ट केल्या आहेत. विवेचक वाचकांच्या लक्षात त्याच्या अडचणी आल्या पाहिजेत.

विविध ज्ञान विस्ताराच्या उपोद्घातात ग्रँट डफ आणि स्कॉट वेअरिंग यांनी वापरलेल्या साधनांची एक यादी दिली आहे. त्यात मराठी, फार्सी, इंग्रजी सुमारे २३ ग्रंथांची–कागदपत्र-संग्रहाची–यादी दिली आहे. अर्थात ही यादी संपूर्ण नाही. तळटीपांवरून प्रामुख्याने ही यादी केली आहे. त्यामुळे कितीतरी ग्रंथांचा उल्लेख येथे राहून गेला आहे. उदाहरणार्थ, खाफीखान, मासीर-अल्-उमरा, मीरात अहमदी, सियरुल मुताखरीन इत्यादि फार्सी ग्रंथ, ताम्रपट, कलकत्ता, सुरत, मुंबई पुणे येथील दप्तरखान्यातून संपादन केलेली माहिती या यादीत नाही. ग्रँटच्या पुस्तकातील उणीव दाखवावयाची झाली तर त्याने साधने वापरली नाहीत असे म्हणण्यापेक्षा, त्याने आपली प्रमुख विधाने अथवा घटना कोणत्या साधनांवरून नेमकी घेतली आहेत हे प्रत्येक ठिकाणी निश्चितपणे दाखविले नाही. मराठी हस्तलिखित असा तळटीपेत जेव्हा उल्लेख केला आहे, तेव्हा हे हस्तलिखित नेमके कोणते आहे आणि यातला कोठला भाग वापरला आहे याचा बोध होत नाही.

मराठ्यांच्या इतिहासलेखनास मराठीतील साधने ही अतिशय महत्त्वाची होत हे स्कॉट वेअरिंगप्रमाणे ग्रँट डफने पूर्णपणे ओळखले होते, आणि म्हणून विस्तृत प्रमाणावर मराठी साधने त्याने वापरली आहेत. प्राचीन सनदा, घाडग्यांची बखर, कोल्हापूरच्या राजाकडून मिळालेले कृष्णाजी अनंत सभासदकृत शिवचरित्र, सातान्यातून मिळविलेली मल्हार रामराव चिटणीसाने रचलेली सप्तप्रकरणात्मक बखर, चंद्रराव मोरे यांच्या वंशजाकडून मिळालेली शिवाजीसंबंधीची बखर, खटावच्या देशपांड्यांकडील बखर इत्यादि मराठी साधनांचा त्याने उपयोग केला होता. याखेरीज सातान्याच्या दप्तरखान्यातील कागदपत्रे जी पेशव्यांनादेखील पाहावयास मिळाली नाहीत, ती त्याला मिळाली होती. बाळाजीपंत नातू आणि इतर काही प्रतिष्ठितांनी मराठ्यांच्या इतिहासाची प्रकरणे मराठीत लिहून दिली होती. कित्येक महत्त्वाच्या बखरी, सनदापत्रे, खास लिहून घेतलेली निवेदने त्याने इंग्रजीत भाषांतर करून घेतली होती. थोडक्यात, इंग्रज लेखक स्थानिक साधनांचा वापर करीत नाहीत हे जे सर्वसामान्य विधान केले जाते, ते ग्रँट डफच्या बाबतीत तरी लागू पडत नाही हे वरील मराठी साधनांच्या उल्लेखावरून स्पष्ट व्हावे.

१९ व्या शतकाच्या शेवटी व २० व्या शतकाच्या प्रारंभी ज्या भारतीय इतिहासकारांनी ग्रँटच्या पुस्तकावर टीका केली त्यातील चारपाच व्यक्तींचा येथे प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. मराठ्यांचा इतिहास हा मराठी लोकांच्या जिव्हाळ्याचा विषय असल्यामुळे मराठी इतिहासकारांनी त्याची दखल घ्यावी हे स्वाभाविक होते.

ग्रँट डफच्या टीकाकारांत १८६८ साली डेक्कन कॉलेजातील बी. ए. च्या वर्गात शिकत असलेल्या नीळकंठ जर्नादन कीर्तने यांच्या प्रयत्नांचा प्रथम उल्लेख करावा लागेल. 'पूना यंग मेन्स असोसिएशन' तर्फे एक 'ज्युनिअर स्टुडंट' म्हणून कीर्तन्यांनी आपले विचार मांडले आहेत. "मराठ्यांचे बखरीवर टीका" अथवा "मराठ्यांच्या इतिहासाविषयी थोडेसे निरूपण" हे त्यांच्या निबंधाचे शीर्षक होते. मालाकार चिपळूणकरांनी त्याची भलावण केल्यामुळे त्याला बरीच प्रसिद्धी मिळाली आणि लोकांपुढे तो आला. मालाकार म्हणतात, "यांची लिहिण्याची पद्धती तारीफ करण्यासारखी असून विषयाचे निरूपण प्रौढ व मार्मिक रीतीने करण्याची यांची शैली उत्कृष्ट आहे."[५]

ग्रँट डफच्या इतिहासातील काही उणीवांचे दिग्दर्शन घडवीत असताना, कीर्तन्यांनी त्याचे मनःपूर्वक आभारही मानलेले आहेत व अखेर अशी आशाही व्यक्त केलेली आहे की आपल्यापेक्षा एखाद्या अधिकारी व्यक्तीने, या विषयाच्या अध्ययनाकडे विशेष लक्ष पुरवून, मराठ्यांचा इतिहास नव्याने लिहिल्यास आपल्या टीकेचे सार्थक होईल. या ग्रंथाबद्दल कीर्तन्यांनी सर्वसामान्यपणे असा अभिप्राय दिला आहे, "तो ग्रंथ मोठा गूढ अथवा समर्पक आहे असे नाही; त्या साहेबास जी मदत मिळाली व जे हस्तलिखित ग्रंथ सापडले, व ज्या सनदा मिळाल्या, त्यांचा विचार केला असता त्यावर ही मोठी सुंदर इमारत उठली असे म्हणवणार नाही... समर्पक सर्व विषयांचे विवेचन नाही." (पृ. ३)

या ग्रंथातील उणीवांचा उल्लेख करताना त्यांनी प्रामुख्याने असे मत मांडले आहे की, 'हिंदू लोकांच्या धर्माविषयी व हिंदूच्या वेदांताविषयी

---

५. निबंधमाला पृ. ९३ तळटीप. कीर्तन्यांची पहिली आवृत्ती इंद्रप्रकाश छापखान्यात शंकररावजी पंडित यांनी छापविली. १८९४ मध्ये नवीन किताबखाना प्रेसने दुसरी आवृत्ती काढली.

काहीच लिहिले नाही." (पृ. ३) 'महाराष्ट्रदेशात सुमारे १८०० वर्षांत जे ग्रंथकार संस्कृत, प्राकृत व महाराष्ट्र भाषेत झाले त्यांजविषयी म्हणण्यासारखा लेख डफ साहेबांचे ग्रंथात नाही.' (पृ. ५.)

"महाराष्ट्रातील वसाहती, केव्हा व कशा झाल्या, कोणकोणते राजवंश कसकसे व केव्हा यात प्रबळ झाले, त्यांचे वंशात आता कोण उरले आहेत, इत्यादि प्राचीन इतिहासाची संगतवार जशी असावी तशी माहिती नाही; इतकेच नाही तर सांप्रत प्रसिद्ध असलेले भोसले, पवार, महाडिक, शिर्के इत्यादि पंचकुळीचे, छत्तीस कुळीचे व शहाण्णव कुळीचे समस्त मराठे हे कोण व कोठील यात कोणकोणती कुळे पूर्वेकडून राजवंशांतून निघून येऊन या देशी वस्ती करती झाली, इत्यादि उपलब्ध इतिहास यात चांगला दिलेला नाही." (पृ. ६)

प्रस्तुत ग्रंथास 'मराठ्यांच्या मोहिमांचा इतिहास' असे म्हटल्यास देखील चालेल आणि "या देशाचा अभिमान नसल्यामुळे त्याने व्यक्तीसंबंधी शौर्याच्या, युक्तिप्रयुक्तीच्या व धूर्ततेच्या चटकदार गोष्टी बहुतेक वगळल्या आहेत. ...हे महापुरुषांच्या चरित्रांचे एक साधन नष्ट केल्यासारखे होते— तसे होणे इष्ट नाही, कारण ही चरित्रे म्हणजे इतिहासाचे केवळ हृद्गत होय." (पृ. ७)

अशा काही उणीवा[६] कीर्तन्यांनी प्रथम मांडल्या, पण त्यांना या ग्रंथांचे महत्त्व नाकारता येईना. कारण ते म्हणतात, "वर सांगितल्याप्रमाणे या ग्रंथातील काही व्यंगे आम्ही दाखविली म्हणून या ग्रंथाविषयी पूज्य बुद्धी कोणापेक्षाही आमची कमी आहे असे कोणी काडीमात्रही समजू नये.. व कोणत्याही प्रयत्नांशी ताडून पाहिले असता हा त्यांचा ग्रंथ चांगलाच झाला, असेही कदाचित म्हणणे भाग पडेल." (पृ. ७) या उताऱ्यावरून कीर्तन्यांच्या मनांतील चलबिचल आपल्याला सहज कळून येते.

महाराष्ट्रात असा एक समज रूढ होता आणि अद्याप असेलही आणि तो म्हणजे ग्रँट डफने मराठ्यांच्या इतिहासाची साधने नष्ट केली. कीर्तन्यांनी स्वाभाविकच या प्रश्नाला हात घातला आहे, ग्रँट साहेबांनी इतके श्रम करून आणि इतका पैसा खर्च करून जे लेख मिळविले ते आता कोठे आहेत ? "या कागदांची जाणूनबुजून होळी केली..आमचे एक हुशार

---

६. नी. ज. कीर्तने : मराठ्यांचे बखरीवर टीका; नवी आवृत्ती, पुणे, १९२६.

मित्र असे म्हणतात (हे मित्र म्हणजे के. दाजीसाहेब सरंजामे. हे इनाम कमेटीत काही दिवस नोकर होते.) की, यासंबंधी ग्रँट साहेबांचे व दक्षिण कमिशनर साहेबांचे काही लेख त्यांनी पाहिले आहेत. त्यावरून या कागदांचा जाणूनबुजून नाश केला असे मानण्यास हरकत नाही."

ग्रँटने कागदपत्र जाळून टाकले, आणि त्यात एल्फिन्स्टन हा सहकारी होता या दाजीसाहेब सरंजाम्यांच्या विधानावर विश्वास बसत नाही. एल्फिन्स्टन आणि ग्रँटसारख्या इतिहासप्रेमी माणसांनी जे अविश्रांत परिश्रमाने कागद गोळा केले ते जाळण्यासाठी असे वाटत नाही. भारताचा किनारा सोडल्यापासून ती इंग्लडला पोहोचेपर्यंत एल्फिन्स्टनला आपल्या प्रवासासंबंधी पत्रे लिहीत होता. पण या पत्रात कोठेही बोटीला आग लागली किंवा आपला काही माल, पुस्तके गहाळ झाली असे चुकून सुद्धा त्याने कळविले नाही. प्रवासात बोटीच्या कप्तानाला अशी एक सूचना मात्र केली होती की जर का आपण प्रवासात मरण पावलो तर आपली सारी मालमत्ता विशेषतः हस्तलिखिते आणि इतर कागदपत्रे एल्फिन्स्टनकडे सुपूर्द करावीत. ग्रँटची पत्रे, त्याने कंपनीच्या ऑफिसमधून तयार केलेली काही टिपणे, अहवाल, जर्नल, इंडिया ऑफिस लायब्ररीत आहे. वुडब्रिज येथे असलेल्या सौ. शीला सकलोव्ह ग्रँट या ग्रँटच्या विद्यमान पणतीकडे जाऊन तपास केला असता ग्रँटच्या साहित्याचा कोठेही शोध लागला नाही. ग्रँटची पुस्तकाविषयी ऑक्सफर्डच्या बॉडलिअन लायब्ररीमध्ये असलेल्या एका कॅटलॉगवरून कल्पना येईल असे विधान सहाव्या आवृत्तीचे संपादक सर एडवर्डस्नी[७] आपल्या प्रस्तावनेत केले आहे, ते दिशाभूल करणारे आहे. अॅडॅम्स आणि कॅप्टन ग्रँट यांच्या विकाऊ ग्रंथांची जी यादी तेथे आहे त्याचा ग्रँट डफशी संबंध नाही.

प्रस्तुत संदर्भात, विविध ज्ञान विस्तारातील उल्लेख अवश्य लक्षात घेण्याजोगा आहे. ग्रँट डफने वापरलेल्या साधनग्रंथांची यादी देऊन प्रस्तावनाकार लिहितात, "...ही पाहता त्यास मिळालेल्या बहुतेक लेखांचा पत्ता मिळतो. तेव्हां साहेब मजकूर यांणीं आपण मिळविलेल्या सर्व लेखांचा नाश केला ही जी दंतकथा आम्हां लोकांमध्ये आहे ती खोटी असें म्हणण्यास कांहीं हरकत नाही."[८]

---

७. ग्रँट डफ भाग १ प्रस्तावना lxxx.

८. वि. ज्ञा. वि. १८८२ उपोद्घात पृ. १२.

श्री. कीर्तन्यांनी आपल्या टीकेत एक इतिहासाचे साधन म्हणून बखरीतील न्यूनता दाखविली आहे; पण त्याचबरोबर इतिहासलेखनास कागदपत्रांचे महत्त्व किती आहे हे स्पष्ट केले नाही. ऐतिहासिक घटना निवेदन करीत असताना बखरीवर पुराणे आणि तवारिखा यांचा अधिक प्रभाव आहे हे स्पष्टपणे दिसून येते.

श्री. कीर्तन्यांच्या मते ग्रँट साहेबांचे ग्रंथात काही मागचे पुढे व पुढचे मागे, कित्येक गोष्टी अगदीच गाळून टाकणे, कित्येक गोष्टींचा विस्तार करणे, इत्यादि गोष्टी केल्यास बरीच सुधारणा होण्यासारखी आहे.[९] (पृ. १८)

शहाजीचे वर्णन ग्रँट डफच्या इतिहासात आले नाही असा एक आरोप कीर्तन्यांनी केला आहे. (पृ. २२). शिवपूर्वकालाचा इतिहास लिहिणे साधनाभावी किती कठीण आहे हे ग्रँटने वारंबार आपल्या पत्रांतून नमूद केले आहे. राधामाधवविलासचंपू, शिवभारतसारखी साधने जेव्हा विसाव्या शतकात उपलब्ध झाली तेव्हाच शहाजीबद्दल अधिकारवाणीने बोलणे शक्य झाले आहे.

मराठी सत्तेचा पाया कसा घातला गेला याचे वर्णन ग्रँटने दिलेले नाही असे कीर्तने म्हणतात. मराठ्यांचा इतिहास हा मनोरंजक व महत्त्वाचा आहे. तो लोकांना कसा आवडेल याकडे ग्रंथकाराने लक्ष पुरविले पाहिजे. श्री. कीर्तने म्हणतात, "जो ग्रंथकार मराठ्यांच्या बखरीचे विवेचन करील, त्यास राज्यांच्या घडामोडी तर काय, परंतु बादशाही साम्राज्यांच्या घडामोडीचे विवेचन करावे लागते. प्रथमतः वाचकास बादशाही दरबारात नेऊन तेथील चमत्कार दाखवावा लागतो. तेथील दरबाराचा थाटमाट व राज्यांतील अंदाधुंदी ही एकदाच दाखवावी लागतात. राजा बलहीन, दरबारात वैमनस्ये, बादशाही जनानखाना, आणि नायकिणीचा वाडा, व या सर्वांचे लंपडाव, तोंडाने बादशहाचे आम्ही दासानुदास म्हणत असता यजमानाचा अधिकार चालविणारे चाकरलोक, इत्यादि सर्व गोष्टी वाचकास दाखवाव्या लागतात; व मध्ये या सर्व गोष्टींचा पूर्ण विचार करून सुचलेले गहन विचार सांगावे लागतात. मग त्या वाचणारांस असल्या ऐषारामातून व थाटामाटातून काढून, त्यास एक लंगोटी घालून व डोईस मुंडासे व व कांबळे अशा थाटाने शिवाजीच्या संगतीबरोबर मावळे लोकांचा जमाव देऊन रानावनांतून, गिरिपर्वतांवरून, आज गुजराथेत, उद्या कर्नाटकात असे

---

९. कीर्तने यांच्या पुस्तकातील पृष्ठांचे आकडे कंसांत दिले आहेत.

हिंडवावे लागते. पुढे ज्यास लंगोटी, मुंडासे व कांबळे यांशिवाय दुसरे प्रावर्ण माहीत नाही, अशांसच मोठमोठाले सरदार करून त्यांच्या दरबारातील चमत्कारिक बेत व अलौकिक शिपाईगिरी दाखवावी लागते. यानंतर पायांत पाटलोण व डोक्यास टोपी असे 'ताम्रमुखी' व्यापाराकरिता देशात आणावे लागतात. त्यांची देशी राज्यांत हळूहळू प्रवेश करण्याची रीती व केवळ परोपकाराकरिता असे दाखवीत असता, आपला स्वार्थ साधण्याची शैली, आज याचा पक्ष, उद्या त्याचा पक्ष घेणे, मोठ्या राज्यांतील सरदारांस स्वातंत्र्य देऊन आपले मित्र करणे इत्यादी सर्व खुब्या दाखवून, यांच्या या अद्वितीय राज्यनिपुणतेने या व्यापाऱ्यांस सार्वभौमत्व प्राप्त झालेलेही दाखवावे लागते. हे कृत्य झाल्यावर आता रयतेस काय सुख झाले याचाही विचार करावा लागतो. हे जे कथेंचे सूत्र आम्ही दाखविले यावरून हा विषय मोठा समर्पक व मनोरंजक असा आहे हे सर्वांस स्पष्ट कळेल." (पृ. १८–१९).

कीर्तन्यांचे वरील विचार खरोखरीच प्रशंसनीय आहेत. 'ज्युनिअर स्टुडंट' म्हणून बिचकत बिचकत त्यांनी मराठ्यांचा इतिहास कसा असावा याचे जे मनोरम चित्र रेखाटले आहे ते चिंतन करावयास लावणारे असे आहे. एल्फिन्स्टनने देखील ग्रॅंटला अशाच प्रकारचा उपदेश केला होता हे मागे आपण पाहिले आहे. कोलब्रुकने लिहिलेले एल्फिन्स्टनचे चरित्र १८८४ साली प्रसिद्ध झाले त्यात ग्रॅंट डफला लिहिलेले पत्र छापले आहे.[१०] रा. ब. कीर्तन्यांनी हा निबंध १८६८ साली वाचला, तेव्हा त्यांना या एल्फिन्स्टनच्या पत्राची काहीच कल्पना नसणार. परंतु मराठ्यांचा इतिहास कसा लिहावा याबाबतीत एल्फिन्स्टनचे आणि कीर्तन्यांचे विचार समांतर दिशेने जातात हे कौतुकास्पद आहे. अर्थात एल्फिन्स्टनच्या या अपेक्षा, अनेक कारणांमुळे ग्रॅंट पुऱ्या करू शकला नाही आणि म्हणूनच त्याचा इतिहास शैलीदार बनला नाही.

ग्रॅंटने शहाजीबद्दल विशेष लिहिले नसले तरी शिवाजीमहाराजांबद्दल, बखरी आणि इतर ठिकाणाहून माहिती मिळवून, जे लिहिले आहे ते सविस्तर लिहिले आहे हे श्री. कीर्तन्यांनी मान्य केले आहे. मग ग्रॅंटचे चुकले कोठे हे सांगताना कीर्तने लिहितात, "त्यांनी शिवाजीचे चरित्र लिहिताना मराठ्यांचे लेखांवर जितका भरवसा ठेवणे योग्य आहे तितका ठेवला नाही. इतकेच नाही, पण आम्हास वाटते की त्या लेखांवर जितके

---

१०. कोलब्रुक भाग २, पृ. १३६–७.

लक्ष पुरविणे योग्य आहे तितके लक्षही त्यांनी पुरविलेले नाही. कारण शिवाजीविषयी जितका प्रतिकूल भाग त्यांचे लेखात आला आहे तितका बहुतेक मुसलमान किंवा त्यांचे अनुयायी यांचे लिहिण्यावरून घेतलेला आहे. मराठी बखरकारांचे म्हणणे जमेस धरलेच नाही."[११]

बखर हे इतिहासाचे प्रमाणभूत साधन होऊ शकेल का हा चर्चेचा विषय होऊ शकेल. अर्थात एक साधनग्रंथ म्हणून बखर वापरताना त्या बखरीची प्रतवारी लावावी लागेल. सभासदी बखर आणि चिटणीसी बखर यांतील सरस बखर कोणती हे ठरवावे लागेल. शिवाय काही प्रसंगांबाबत शिवाजीमहाराजांच्या वर्तणुकीबद्दल मतभेद होण्याची शक्यता आहे. उदाहरणार्थ, जावळी मोरे प्रकरण, पुरंदर किल्ल्याचा कब्जा, अफझल प्रकरण, सुरतेची लूट याबाबत भिन्न भिन्न मते असू शकतील. कदाचित त्या काळाचा विचार करता शिवाजीमहाराजांची वागणूक त्या काळाच्या नीतीला धरूनही असू शकेल. चिटणीसांच्या बखरीबद्दल 'सारा गौरवच लिहिला, एखादे वेळेस माणसाच्या हातून चूक घडते त्याचीही नोंद झाली पाहिजे' अशी ग्रँटची भूमिका होती. तवारिका आणि बखरी यांत ग्रँटने बखरीच अधिक प्रमाणभूत मानल्यामुळे, आणि या बखरी मिळविण्याचा, त्यांची भाषांतरे करून घेण्याचा फार मोठा उद्योग ग्रँटने केला असल्यामुळे, 'मराठ्यांच्या लेखावर भरवसा ठेवला नाही' किंवा त्याकडे 'विशेष लक्ष पुरविले नाही' हे कीर्तन्यांचे विधान वस्तुस्थितीला धरून नाही असे म्हणावे लागेल.

शिवाजीची प्रजा अतिदरिद्री होती हे या एका प्रवाशाच्या वृत्तावर आधारलेल्या विधानाला कीर्तने यांचा विरोध आहे. "त्या वेळच्या सर्व हिंदुस्थानातील रयतेपेक्षा कदाचित शिवाजीच्याच प्रजेस ज्यास्ती सुख असेलसे वाटते" असे ते म्हणतात.[१२] रयतेच्या आर्थिक स्थितीबद्दल पुरेशा साधनांच्या अभावी आजदेखील निश्चितपणें सांगणें कठीण आहे. जदुनाथ सरकारांनी जवळ जवळ एक शतकाने शिवचरित्र लिहिले, पण त्यांचे या बाबतीतील मत ग्रँटहून भिन्न नव्हते. अधिक संशोधनाच्या साहाय्यानेच यांवर निश्चितपणे मत व्यक्त करता येईल. त्यावेळी उपलब्ध असलेल्या साधनांपैकी समकालीन प्रवाशाचे वृत्त ग्रँटने प्रमाणभूत मानले असले तर इतिहासलेखनपद्धतीला ते फारसे सोडून आहे असे म्हणता येणार नाही.

---

११. कीर्तने, पृ. २४–२५.

१२. कीर्तने, पृ. २५.

शिवाजीमहाराजांचे व्यक्तिमत्त्व उठावदार करण्याकरिता बखरीतील कल्याणच्या सुभेदाराच्या सुनेचा किस्सा ग्रँटने का घेतला नाही याबद्दल कीर्तन्यांनी दुःख व्यक्त केले आहे. तसेच अफझलखानवधाची घटना पूर्णपणे न समजावून घेता त्याला दगाबाज ठरविले, त्याच्या दोषापेक्षा गुण सहस्रावधी होते त्याच्यावर भर दिला नाही असे एकीकडे म्हणत असता कीर्तने सांगतात, "शिवाजीच्या चातुर्याच्या वर्णनात त्याने इतरांप्रमाणे मोगलांची सड घेतली नाही ही गोष्ट मोठी ध्यानात ठेवण्यासारखी आहे."[१३] असे असले तरी कीर्तन्यांना मनापासून वाटते, "शिवाजीचे चरित्र हिंदू-शिवाय इतरांस यथायोग्य कळेल असे नाही.[१४]" येथे हिंदू या शब्दाचा अर्थ केवळ मराठी बोलणारे हिंदू नाहीत असे मानावयास हरकत नाही. कीर्तन्यांच्या टीकेनंतर अर्धशतकानंतर एका हिंदूनेच शिवाजीमहाराजांचे चरित्र इंग्रजीत लिहिले. तेव्हा त्याला टीकाकार ग्रँट डफचा नवा अवतार म्हणू लागले. हे पुस्तक वाचण्यासाठी आणि त्यावर टीका करण्यासाठी रावबहादुर हयात असते तर शिवाजीमहाराजांचे चरित्र कोणास कळेल आणि कोणास नाही याबद्दल त्यांच्या मतांचा कानोसा घेणे मनोरंजक ठरले असते.

कीर्तन्यांच्या ५४ पानी पुस्तकापैकी पहिली ३६–३७ पाने शिवकाला-साठी खर्ची पडली आहेत. यात देखील ग्रँटच्या इतिहासातील एकदोन सामान्य चुका दाखविण्याखेरीज विशेष काही केले आहे असे नाही. पुढच्या २–३ पानांत पेशवाई आटोपून इंग्रजी अमलाबद्दलची सर्वसामान्य प्रतिक्रिया व्यक्त केली आहे.

पेशवेकालातील दोष दाखविताना, बाळाजी विश्वनाथाच्या काम-गिरीची विशेष दखल घेतली नाही, असा कीर्तन्यांचा आरोप आहे. शिकविलेली पलटणे मराठ्यांच्या सैन्यात असल्यास मोठा उपयोग होईल ही चिमाजी आप्पाची विचारसरणी ग्रँटला चूक वाटली, हे कीर्तन्यांना पसंत नाही. महादजी शिंदे यांनी पुढे हाच प्रयोग केला होता त्याची ग्रँटला त्यांनी आठवण करून दिली आहे. पानिपतातील मराठ्यांच्या पराभवाचे एक कारण म्हणजे भाऊसाहेबांच्या अप्रयोजकपणापेक्षा शिकलेली पलटणे होत हे ग्रँटचे म्हणणे पटण्यासारखे नाही. असे असले तरी अगदी युद्धाच्यावेळी सुद्धा मल्हारराव होळकराला वाटत होते की मैदानात लढण्यापेक्षा गनिमीकाव्याचा लढा मराठ्यांना सोईस्कर ठरला असता.

---

१३. कीर्तने, पृ. ३३. १४. कित्ता पृ. २८.

तेव्हा असे विधान करणारा ग्रँट डफ हा काही पहिला नाही याची नोंद घेणे आवश्यक आहे. मराठ्यांच्या इतिहासातील थोर व्यक्तींच्या स्वभावाचे व वर्तनाचे वर्णन पृष्ठ–अर्धपृष्ठापेक्षा म्हणण्यासारखे जास्त ग्रँटने दिले नाही ही कीर्तन्यांची टीका कितपत रास्त आहे हे सांगणे कठीण आहे. अहिल्याबाईंचे वर्णन हवे तितके व्यापक आले नाही अशी त्यांची तक्रार आहे. ग्रँटच्या पुढे काय टाळावे आणि का टाळावे असा एक नेहमीच मोठा प्रश्न असे. अशा या संभ्रमातूनच काही बाबतीत कमी लेखन झाले असण्याची शक्यता आहे.

ग्रँड डफवरील मराठीतील पहिली टीका म्हणून कीर्तने यांच्या निबंधाला महत्त्व आहे आणि मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपा-विषयी त्यांनी मांडलेले विचार निश्चित हृद्य आहेत. असे असले तरी ग्रँटवर विदारक अशी टीका कीर्तन्यांनी केली आहे, आणि ग्रँटच्या अनेक चुका दाखवून त्याचे म्हणणे त्यांनी खोडून काढले आहे असा प्रकार कोठेही झाला नाही. प्रस्तुत निबंधात ग्रँटच्या पुस्तकावरील टीकेपेक्षा मराठ्यांच्या इतिहासाच्या निरूपणाने आणि इंग्रजांवरील टीकेनेच अधिक भाग व्यापला आहे. या टीकेत मराठ्यांच्या इतिहासाबद्दलचा आपला दृष्टिकोन त्यांनी प्रामुख्याने मांडला आहे.

कीर्तन्यांच्या टीकेचा एक परिणाम म्हणजे मराठी बखरीच्या संपादना-कडे लोकांचे लक्ष जाऊ लागले. स्वतः कीर्तन्यांनी मल्हार रामराव चिटणीस-कृत सप्तप्रकरणात्मक चरित्र ही बखर 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या नावाखाली विविध ज्ञान विस्तारात छापली. पुढे ती पुस्तकरूपाने 'निर्णयसागर' प्रेसने प्रसिद्ध केली. या बखरीस जो उपोद्घात कीर्तन्यांनी लिहिला आहे त्यावरून ग्रँट डफवर केलेल्या टीकेबद्दल त्यांचे स्वतःचेच मत काय होते हे समजून येईल. ते लिहितात, "काही वर्षांपूर्वी या साहेबांचे ग्रंथावर जी टीका छापून प्रसिद्ध झाली तिजमध्ये याच्या उलट[१५] लेख आला आहे, त्याची आम्हांस दिलगिरी वाटते. ज्या पुस्तकावरून टीकाकारानें हा इतिहास प्रथम वाचला ते पुस्तक फार जुने असल्यामुळे त्याच्या सर्व कडा कसरीने खाल्लेल्या होत्या. त्यामुळे टीपा त्यास वाचण्यास मिळाल्या नाहीत. म्हणून हा शोचनीय प्रमाद त्याचे हातून घडला." कीर्तन्यांचा हा प्रामाणिक-पणा निःसंशय प्रशंसनीय आहे.

---

१५. उपोद्घात पृ. १२.

मराठ्यांच्या इतिहासांतील पत्रयुगाचे प्रवर्तक इतिहासाचार्य राजवाडे यांनी ग्रँटवर केलेली टीका भरीव स्वरूपाची आहे. 'बखरी'चा वापर हवा तेवढा केला नाही या कीर्तन्यांच्या आरोपाला, "अस्सल चिटोरे सर्व बखरीच्या बहुमताला हाणून पाडण्यास बस्स आहे" असे म्हणून परस्परच उत्तर दिले आहे. ग्रँटवर टीका करीत असतानाच त्यांना इतिहासाच्या तत्त्वज्ञानाविषयींचे मौलिक विचार स्फुरलेले आहेत ही गोष्ट येथे लक्षात ठेवली पाहिजे. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचा पहिला खंड १८९८ साली प्रसिद्ध झाला. या ग्रंथात प्रामुख्याने पानिपतविषयक प्रकरण आले आहे. वास्तविक पानिपत प्रकरण हे ग्रँटच्या इतिहासातील एक चांगले प्रकरण आहे. एल्फिन्स्टन आणि राजवाडे या दोघांनी ते मान्यही केले आहे. पण राजवाड्यांची तक्रार अशी आहे की, १७५० ते १७६१ या कालखंडातील हालचालींचा सुसंगत असा इतिहास ग्रँटला देता आला नाही. राजवाड्यांनी या खंडात पानिपतपूर्व दहा वर्षांच्या कालखंडातील ३०४ पत्रें छापून पानिपतची पार्श्वभूमी चांगली मांडली आहे. ग्रँट डफच्या निवेदनाबद्दल ते म्हणतात, "ग्रँट डफच्या ग्रंथात या दहा वर्षांतील घडामोडींची, विस्तृत तर राहू द्याच परंतु साधारण, समाधानकारक अशी देखील माहिती दिलेली नाही. त्याने लहानसहान मोहिमा तर सोडून दिल्या आहेतच, परंतु काही मोठमोठ्या मोहिमा देखील गाळल्या आहेत. त्या त्याने मुद्दाम गाळल्या आहेत असा म्हणण्याचा भाग नव्हे, तर मिळालेल्या कागदपत्रांचा योग्य उपयोग त्याच्या हातून झाला नाही. जे लेख मिळाले होते त्याचे व्यवस्थित वर्गीकरण आणि त्यांची बारीक फोड व उकल त्याच्या हातून झाली नाही. त्यामुळे व काही जरुरीचे कागदपत्र त्याला न मिळाल्यामुळे ह्या मोहिमा त्याने गाळल्या असे दिसते."[१६]

या प्रास्ताविकानंतर राजवाड्यांनी ग्रँटने कोणकोणत्या मोहिमांची गफलत केली आहे, काही महत्त्वाच्या स्वाऱ्यांबाबत त्याचे अज्ञान कसे आश्चर्य करण्यासारखें आहे हे विस्ताराने लिहिले आहे. त्यांच्या विवेचनातील महत्त्वाचे मुद्दे पुढीलप्रमाणे सांगता येतील.[१७]

---

१६. राजवाडे : ऐतिहासिक प्रस्तावना खंड, पृ. २२. चित्रशाळा प्रेस, पुणे.

१७. ऐतिहासिक प्रस्तावना खंड, पृ. २३–२७.

१७५० ते १७५६ या सालांतील रघुनाथरावाच्या मोहिमा ग्रँटने टाळल्या आहेत. रघुनाथरावाच्या सर्वच मोहिमांविषयी सामान्यत: अज्ञान दिसून येते.

जयाप्पाच्या मारवाडातील मोहिमेसंबंधी, त्याच्या मृत्यूसंबंधी, व त्याच्या मृत्यूनंतर दत्ताजीने मारवाडात केलेल्या खटपटींचा उल्लेख ग्रँटने केलेला नाही.

भालकीच्या तहापर्यंत बरीवाईट हकीकत दिली आहे. १७५३ साली शिंदे–होळकर हिंदुस्थानात गेले आणि बाळाजी पुण्यास आला ही विधाने चुकीची आहेत.

१७५३ ची श्रीरंगपट्टणची स्वारी सहा महिने चालली होती ती त्याने वगळली आहे.

कुंभेरीचा १७५५ चा वेढा भीत भीत सांगितला आहे. रघुनाथरावाच्या मोहिमांबद्दल चांगली माहिती मिळाली नाही अशी प्रांजळ कबुली त्याने दिली असली तरी ह्या प्राजळपणांत हटवादीपणा दाखविला आहे. रघुनाथराव १७५५ मध्ये पुण्यास परत आला असे ग्रँट म्हणतो, पण तो आला १७५६ मध्ये.

१७५६ मध्ये झालेली सावनूर–कित्तूरवरील मराठ्यांची स्वारी त्याला माहीत नव्हती.

१७५७ च्या श्रीरंगपट्टणच्या स्वारीचे श्रेय गोपाळराव पटवर्धनास द्यावयास हवे, पण हे नाव सुद्धा ग्रँटला माहीत नव्हते. १७५९ च्या स्वारीची हीच तऱ्हा. ही झाली सोडलेल्या मोहिमांची हकीकत. या मोहिमांचे तपशीलवार माहिती दिल्यानंतर, १७५० ते १७६१ मधील ज्या मोहिमांचे वर्णन केले आहे ते अगदी त्रोटक आणि असमाधानकारक आहे असा आरोप त्याच्यावर केला आहे. त्यातल्या त्यात पानिपतचे वर्णन विस्तृत आहे. पानिपतचे कीनने केलेले वर्णन सांगोपांग आहे, परंतु या दोघांचा आधार काशीराजाची बखर हा असल्यामुळे त्यांची वर्णने एकदेशीय व अपुर्ती झाली आहेत. उदगीरच्या मोहिमेचे वर्णन त्याच्या नित्याच्या नेमाप्रमाणे त्रोटक असले तरी बरे आहे. १७५० ते १७६१ मधील लढायांच्या तारखा दिल्या नाहीत, आणि सारा वृत्तान्त अवघ्या ५० पृष्ठांत आटोपला आहे.[१८]

---

१८. ऐतिहासिक प्रस्तावना, पृ. २६.

थोडक्यात सिंदखेड, उदगीर, पानिपत या तीन मोहिमांखेरीज नामसंकीर्तनापलीकडे कोणत्याच मोहिमेचे वर्णन त्याने केले नाही, असे राजवाडे म्हणतात. अर्थात विस्तारभयास्तव या गोष्टी टाळणे आवश्यक होते हे राजवाडे देखील अमान्य करीत नाहीत. मराठ्यांच्या हालचालींना गवसणी घालणे किती जिकीरीचे काम आहे हे आपले हृद्गत ग्रँटने एल्फिन्स्टनच्या एका पत्रात व्यक्त केल्याचे मागे आलेच आहे. नेमके तेच विचार राजवाड्यांनी देखील बोलून दाखविले आहेत. ते म्हणतात, "मराठ्यांच्या हालचाली एकाच विवक्षित प्रदेशात होत नसून, एकाच काली स्वदेश, कोकण किनारा, गुजराथ, खानदेश, निजामचे राज्य, म्हैसूर, राजपुताना, दिल्ली, अंतरवेद, नागपूर, अयोध्या, काशी, प्रयाग, बुंदेलखंड इत्यादि निरनिराळ्या प्रांतांत होत असत. त्यामुळे दृष्टी फाकून जाऊन दरवर्षी एकाच मोसमात होणाऱ्या निरनिराळ्या मोहिमांचे व्यवस्थित आकलन होऊन वर्णन करता येण्याचे काम केव्हाही मोठ्या श्रमाचे व कुशलतेचे होण्याचा संभव आहे."

रघुनाथरावाच्या स्वारीबद्दलचे आपले अज्ञान व्यक्त करणाऱ्या त्याच्या निवेदनात राजवाड्यांना हटवादीपणा कोठे आढळला हे समजण्यास मार्ग नाही. याबाबतीत तो फक्त एवढेच म्हणतो, "गुजराथ सोडल्यानंतर रघुनाथरावाच्या मोहिमांचे निवेदन करण्यासाठी लागणारी साधने अपेक्षेप्रमाणे संपादन करण्यात मला यश आले नाही. दक्षिणेतल्यापेक्षा हिंदुस्थान अथवा माळवा या भागात अधिक समाधानकारक साधने मिळतील असे मला वाटत होते." या विधानात हटवादीपणा कोठे आहे हे सांगणे कठीण. तसेच १७५५ मध्ये रघुनाथराव पुण्यास परतला असे ग्रँटने विधान केले आहे असे राजवाडे म्हणतात. १७५६ पर्यंत रघुनाथराव दक्षिणेत परतला नाही (Rugonath Rao did not return to the Deccan till 1756) असे ग्रँटने म्हटले आहे.[१९] याचा अर्थ तो निश्चितपणे १७५५ मध्ये आला असा कसा करता येईल.

ग्रँटवर राजवाड्यांचा एक मोठा आरोप म्हणजे इतिहासलेखकास आवश्यक असे गुण त्याच्या ठिकाणी नव्हते. ते म्हणतात, "त्याच्या हातून मिळालेल्या कागदपत्रांचा व्हावा तसा उपयोग झाला नाही. ह्या व इतर कारणांनी ग्रँट डफच्या हातून मराठ्यांच्या इतिहासाची इमारत मराठ्यांच्या दृष्टीने जशी उठावी तशी उठली नाही. ह्याला मुख्य कारण ग्रँट डफने स्वीकारलेली पद्धत किंवा खरे म्हटले असता पद्धतीचा अभाव होय."[२०]

---

१९. ग्रँट डफ भाग १ पृ. ४७० तळटीप २.
२०. ऐतिहासिक प्रस्तावना पृ. २७.

राजवाड्यांची टीका दोन प्रकारची आहे. प्रथम एक विशिष्ट प्रकरण घेऊन त्यातील ग्रँट डफच्या उणीवा त्यांनी दाखविल्या आहेत. पानिपत प्रकरण यासाठी निवडून पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत, पानिपता-संबंधीच्या कागदांचे विवेचन करता करता त्यांनी ग्रँटच्या ग्रंथातील त्रुटिते दाखविली आहेत. नंतर सहाव्या खंडात इतिहासाचे प्रकार निवेदन करीत असता ग्रँटच्या इतिहासाचा हेतू आणि स्वरूप यांवर सडेतोड टीका केली आहे.

पानिपत प्रकरणाचे मराठ्यांच्या इतिहासातील महत्त्व ग्रँटला पूर्णपणे पटले होते. मराठ्यांची सत्ता तेव्हा कळसास पोहोचली होती त्यामुळे स्वकीय–परकीय मराठ्यांच्या हालचालीकडे डोळ्यांत तेल घालून पाहात होते. हे प्रकरण रंगविण्यासाठी त्याने सिद्धता चांगली केली होती. सियरुल मुताखरीन, मराठी हस्तलिखित (बहुधा ही रघुनाथ यादवरचित पानिपतची बखर असावी), लाहोरच्या बुधसिंगाने लिहिलेले, आणि इरस्किनच्या ग्रंथालयांत असलेले फार्सी हस्तलिखित तारीख–इ–दखन, एशियाटिक रिसर्चेस्, विभाग ३ मधील लेख, ही साधने त्याने वापरली होती. तसेच भाऊच्या छावणीत दोन दिवस राहिलेल्या आणि सातार्‍याच्या न्यायखात्यात काम करणाऱ्या आबाजी गणदेव याची मुलाखत त्याने घेतली होती तसेच आरळ्याचा कुलकर्णी नारो भगवंत याने देखील आपली कहाणी त्याला निवेदन केली होती. फार्सी–मराठी साधनांची तुलना करून दत्ताजीने माघार घेतली तेव्हा होळकर कोठे होते आणि दिल्लीजवळ कोणत्या ठिकाणी दत्ताजीवर अचानक हल्ला झाला, हे मराठी बखरीवरून त्याने निश्चित करून फार्सी साधन त्याज्य ठरविले होते. होळकर त्यावेळी जयपुरात होते, आणि दत्ताजीवर दिल्लीजवळील सिकंदरा या ठिकाणी अचानक हल्ला करण्यात आला असे तो म्हणतो. अर्थात कोणत्या मराठी बखरीवरून हे विधान केले आहे हे मात्र तो सांगत नाही.[२१]

थोडक्यात, राजवाड्यांना ज्ञात झालेल्या मोहिमा, ग्रँटने घेतल्या नाहीत हे मान्य करूनही असे म्हणावे लागेल की, एखादे प्रकरण नटविण्यासाठी, त्याचा पाया शास्त्रशुद्ध करण्यासाठी त्याने प्रयत्नांत कसलीच कसूर केली नाही. तेव्हा 'मिळालेल्या कागदपत्रांचा व्हावा तसा उपयोग झाला नाही' हे विधान ग्रँटच्या बाबतीत ग्राह्य होण्यासारखे नाही.

२१. ग्रँट डफ भाग १ तळटीपा पृ. ५१४, ५१६, ५१७, ५१९, ५२१, ५२७, ५३०.

तसेच या टीकेचा मुख्य रोख ग्रँटच्या ग्रंथात काय नाही हे दाखविण्याकडे आहे. ग्रँटने लिहिलेला भाग चुकीचा अथवा त्याज्य आहे असे कोठे फारसे जोरदार विधान केलेले नाही. ग्रँटच्या पुस्तकातील ही त्रुटि ते त्याला उपलब्ध झालेल्या साधनांमुळे निर्माण झाली असतील. ज्या एरंडयांच्या कागदपत्रावरून राजवाडयांनी पानिपत प्रकरणाची चर्चा केली आहे ती किंवा तशा प्रकारची साधने ग्रँटला उपलब्ध झाली नसावीत हे उघड आहे. कारण प्रयत्न करूनही साधने मिळाली नाहीत हे प्रांजळपणे त्याने कबूल केले आहे.

या विवेचनातूनच राजवाडयांनी पुढे आत्मिक आणि भौतिक इतिहासपद्धतीचे आपले विचार मांडले आहेत. धर्म, नीती, विद्या, राजकारण इत्यादि चरित्राची जी निरनिराळी अंगे सांगितली आहेत त्यांचा विचार दोन तऱ्हेने करता येईल. ही अंगे कार्याच्या रूपाने फलित झालेली पाहून त्या फलित रूपांचे पद्धतवार वर्णन करण्याची एक तऱ्हा आहे व हीच अंगे कारणरूपाने असलेली पाहणे म्हणजे वर सांगितलेल्या फलित कार्याची कारणे म्हणून त्यांचा विचार करणे होय. पहिली तऱ्हा भौतिक, दुसरी तऱ्हा आत्मिक होय. धर्म, नीती, विद्या, समाज, व्यापार, कृषी, कलाकौशल्य, कायदेकानू, राजकरण व तत्सिद्धचर्थ केलेल्या अंतस्थ व बहि:स्थ खटपटी इतक्या सर्वांच्या प्रगतीचा किंवा विगतीचा कालक्रमाने यथास्थित, बांधेसूद, पद्धतवार व सप्रमाण विचार केला जाऊन तो पुन: आत्मिक व भौतिकरीत्या झाला म्हणजे राष्ट्राचे चरित्र समग्र कळले असे होते असे सांगून आत्मिक व भौतिक या शब्दांची फोड केली आहे.[२२]

उदाहरणार्थ, **भौतिकपद्धतीने** कलाकौशल्याचा विचार करावयाचा म्हणजे त्याच्या शाखा किती आहेत, निरनिराळ्या शाखांचा संकर किती झाला व शाखांची स्थलांतरे कोठे कोठे झाली हे सांगावयाचे आणि **आत्मिकरीत्या** कलाकौशल्याचा विचार करावयाचा म्हणजे आत्म्याच्या कोणत्या वृत्तीपासून कलाकौशल्याचा उगम होतो वगैरे अंत:स्थ व गूढ प्रश्नांचा उलगडा करावयाचा. राष्ट्राच्या राजकीय गतिस्थितींचा भौतिक ( बाह्यस्वरूप ) व आत्मिक दृष्टया जो विचार त्यासच राष्ट्राचा राजकीय इतिहास म्हणतात. अशी इतिहासाची व्याख्या राजवाडयांनी केली आहे.

---

२२. ऐतिहासिक प्रस्तावना, पृ. २६, २७.

त्यांच्या वरील व्याख्येनुसार ग्रँटचा इतिहास हा निव्वळ भौतिक स्वरूपाचा आहे. "आत्मिकरीत्या मराठ्यांच्या इतिहासाचा विचार करण्याच्या खटपटीत पडण्याची आपली इच्छा नाही व योग्य शिक्षण न मिळाल्यामुळे आपल्या अंगी सामर्थ्य नाही असे आपल्या इतिहासाच्या प्रस्तावनेत स्वतःच प्रांजळपणे व विनयाने कबूल करतो,"[२३] असा अभिप्राय राजवाड्यांनी दिला आहे. अर्थात येथे एक सहज विचार सुचतो, त्याचा प्रांजळपणा आणि विनय मान्य असेल तर त्याने अशा प्रकारचा इतिहास का लिहिला नाही याचा जाब विचारणे अप्रस्तुत ठरेल.

आत्मिकरीत्या मराठ्यांच्या इतिहासाचा विचार करण्याची त्याची इच्छा नव्हती असे राजवाड्यांनी म्हटले आहे. वयाच्या १६ व्या वर्षी त्याने शाळा सोडल्यामुळे योग्य त्या शिक्षणामुळे प्राप्त होणाऱ्या सामर्थ्या-पासून तो वंचित झाला होता. "पुणे व सातारा येथील दप्तरे हाती आली, व त्याला मराठ्यांचा इतिहास लिहिण्याची स्फूर्ती झाली. परंतु उदार शिक्षणाचा म्हणजे प्राचीन इतिहासादि विद्यांचा जो काही योग्य संस्कार मनुष्याचे मन उदात्त, कुशाग्र, ग्राहक व मार्मिक करण्यास लहानपणीच लागतो, तो या इसमाला झाला नसल्याकारणाने आत्मिकरीत्या विवेचन करण्याचे तर त्याला सोडून द्यावे लागलेच, परंतु भौतिक पद्धतीनेही जे मराठ्यांच्या इतिहासाचे वर्णन केले आहे तेही अनेक प्रकारे व्यंगरूप आहे. कालविपर्यासाचा दोष, मोठमोठ्या मोहिमांचे अज्ञान व साक्षेपदृष्ट्या कोणत्या प्रसंगाला किती महत्त्व द्यावे याची नुमज इतर मराठी बखरी-प्रमाणेच ह्याच्याही इतिहासात दिसून येते." मराठ्यांच्या अवाढव्य प्रयत्नांच्या मानाने, इंग्रजांनी सुरत, विजयदुर्ग, बाणकोट या ठिकाणी केलेल्या वळवळी अगदी क्षुद्र आहेत, पण त्याचे पोवाडे ग्रँटने गाईले आहेत. याचे कारण तो असे सांगतो, "इंग्रज महाराष्ट्राचे पुढे धनी झाले म्हणून ह्या वेळची ही त्यांची कृत्ये सविस्तर वर्णिली पाहिजेत.' यावर राजवाडे म्हणतात, "म्हणजे इंग्रजांच्या हिंदुस्थानातील इतिहासाच्या महासमुद्रात शेवटी मराठ्यांच्या इतिहासाचा लोप होणार हे मत दृष्टीपुढे ठेवून त्याने इतिहास लिहिला. त्यामुळे १६४६ ते १७९६ या १५० वर्षांच्या काळाला ४७१ पाने व १७९६ ते १८१८ पर्यंतच्या २२ वर्षांच्या इतिहासाला २०० पाने. परंतु इतकी विस्तृत माहिती दिल्यास ती आपल्या इंग्रजी वाचकांस रुचणार नाही."[२४]

---

२३. कित्ता २८. २४. कित्ता, पृ. २८.

इंग्रजास रुचेल असा इतिहास त्याने लिहिला. आपल्या देशबांधवांना मराठे आणि महाराष्ट्र यासंबंधी सर्वसाधारण आणि जास्तीत जास्त समाधानकारक माहिती देण्याचे ध्येय पुढे ठेवून हा इतिहास लिहिला आहे. हा इतिहास मराठ्यांकरिता नसून इंग्रजांसाठी आहे. त्यामुळे इंग्रज लोकांना तो पसंत आहे, हा राजवाडे यांच्या टीकेचा आशय.

राजवाडे यांची टीका बरीच धारदार बनली आहे. केवळ इंग्रजांना पसंत पडेल असा इतिहास त्याने लिहिला असा हेत्वारोप त्याच्यावर करणे सयुक्तिक ठरणार नाही. मराठ्यांचा इतिहास त्याने कसा तरी ओरबडून काढला आहे या विधानास सुद्धा त्याने केलेल्या साधनचिकित्सेचा विचार केला असता काही अर्थ राहात नाही. त्याला जसा मराठ्यांचा इतिहास समजला, साधनांचा जसा त्याला अर्थ लावता आला तसा त्याने इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्याला केवळ मराठ्यांचाच इतिहास लिहावयाचा आहे या एका भावनेने प्रेरित होऊन त्याने हे कार्य केले आहे, आणि ते आपले स्वप्न तनमनधन खर्ची घालून साकार करण्याची धडपड केली आहे. जॉन मरे या प्रकाशकाला प्रकाशनाबाबत त्याने जे बाणेदार उत्तर दिले आहे त्यावरून त्याची विषयनिष्ठा उत्तम प्रकारे दिसून येते. सातारा प्रकरणात, इंग्रज लोक अप्रामाणिक ठरले, त्यांनी करारनाम्याचे पालन केले नाही, राजाला पदच्युत करण्यात आणि तदनंतर हे राज्य खालसा करण्यात कंपनीने चूक केली असे म्हणणारा ग्रँट डफ केवळ इंग्रजांच्या वळवळीचे पोवाडे गाणारा होता, असे कसे म्हणता येईल? एखादा प्रसंग त्याने सविस्तर वर्णन केला, विशेषतः इंग्रजाबद्दलचा, तर त्याचा अर्थ त्याला मराठ्यांचा द्वेष करावयाचा होता असा न करता, त्या प्रसंगासाठी विपुल साधने त्याला मायबोलीत मिळाल्यामुळे त्याचे वर्णन विस्तृत व प्रवाही झाले आहे असे मानणे योग्य ठरेल.

मराठ्यांचा इतिहास निवेदन करणाऱ्या बखरीपेक्षा ग्रँट डफचा इतिहास अधिक व्यवस्थित आहे हे मान्य करून ते पुढे म्हणतात की, एक स्वतंत्र इतिहास म्हणून त्या ग्रंथाची किंमत महाराष्ट्रातील इतिहासज्ञ निराळी करतात, आणि म्हणूनच तो त्यांना जुनापुराणा, अपूर्ण आणि त्याज्य असा वाटतो.[२५] याची थोडक्यात कारणे राजवाड्यांनी दिली आहेत ती अशी :

२५. ऐतिहासिक प्रस्तावना, पृ. ३०–३१.

पहिले कारण म्हणजे हा इतिहास प्रामुख्याने मराठी बखरी, मुसलमानी तवारिखा, कैफियती आणि अशाच स्वरूपाची टिपणे यांची संगती जुळवून लिहिला आहे. ही साधने कमीजास्त प्रमाणात अविश्वसनीय आहेत आणि म्हणूनच त्यावर आधारित असा हा इतिहास अपूर्ण आणि अविश्वसनीय उतरला आहे.

दुसरे कारण, पुणे व सातारा येथील दप्तरे व इतर अनेक कागदपत्रे मिळून सुद्धा त्याने त्यांचा योग्य वापर केला नाही. काव्येतिहास संग्रहातील ४५० पत्रांवरून असंख्य चुका दाखविता येतात.

तिसरे कारण, मराठ्यांच्या इतिहासलेखनास आवश्यक अशी शैक्षणिक पात्रता त्याची नव्हती. ही दप्तरे जेम्स मिल, गिबन, मॉमूसेन, गिझो यां- सारख्या शोधकांच्या हाती पडली असती तर त्यांनी त्याचे बावनकशी सोने करून दाखविले असते.

चौथे कारण, ग्रँट डफ हा विदेशीय होता. त्यामुळे मराठ्यांच्या पराक्रमाची गाथा सविस्तरपणे गाण्याची त्याला हौस नव्हती. त्याचा हेतू फक्त मराठ्यांसंबंधी ठोकळ ज्ञान करून देण्यापुरताच मर्यादित होता.

पाचवे कारण, त्याचा इतिहास प्रामुख्याने भौतिक पद्धतीने लिहिला आहे. कीर्तन्यांनी या इतिहासास 'मराठ्यांच्या मोहिमांचा इतिहास' असे नाव सुचविले होते. पण राजवाडे म्हणतात, 'अपूर्ण असा मराठ्यांच्या मोहिमांचा नामनिर्देशात्मक इतिहास' हे नाव सार्थ ठरेल. कारण तो मोहिमांचाही इतिहास नाही. शेकडो मोहिमा झालेल्या असल्या तरी फारच थोड्या मोहिमांचे त्याने विस्तृत वर्णन दिले आहे. तेव्हा ते म्हणतात की, इंग्रजांना मराठ्यांची काही माहिती देणाऱ्या वृत्तान्ताचे इतिहासवजा पुस्तक हे नाव या ग्रंथास दिले असते तर ते चालले असते.

ग्रँट डफच्या ग्रंथातील मुलुखगिरीसंबंधीची कोरडी जंत्री वाचून मराठ्यांविषयी पुष्कळ गैरसमज निर्माण झाले. मराठ्यांच्या आमदानीत जिकडे तिकडे दंगेधोपे, मुलुखगिरी ह्यांचा सुळसुळाट होऊन देशात शांतता माहीत नव्हती ती इंग्रजांनी प्रसृत केली अशा तऱ्हेचे विचार प्रस्तृत झाले. लोकहितवादींना कदाचित असेच वाटत असावे. एकेकाळी या दरोडेखोरांनी हिंदुस्थानचे सार्वभौमत्व पटकावून बसण्याचा प्रसंग आणला होता. परंतु देवाची करणी म्हणून इंग्रज आले.

मराठ्यांच्या या साऱ्या हालचालींमागे काही धोरण होते, काही पद्धती, विचार व नीती मराठ्यांच्या कृत्यात होती किंवा नव्हती याचा

ग्रँट डफने विचार न केल्यामुळे ह्या दुराग्रहाचे साम्राज्य पसरले असे राजवाडे मानतात. त्यांच्या मते मराठ्यांच्या लढ्यांना काही सयुक्तिक व समाधानकारक कारणे होती किंवा नाही हा तात्त्विक विचार ग्रँट डफने करावयास हवा होता.

राजवाड्यांची ग्रँटवरील टीका मूलभूत स्वरूपाची आणि थोड्याशा तपशिलात शिरून दोषदिग्दर्शन करणारी आहे हे मान्य करावे लागेल. त्यांनी टीका लिहिली त्यावेळची परिस्थिती आणि ग्रँटने इतिहास लिहिला तो काळ आणि त्याला आलेल्या अडचणी या गोष्टींचा विचार केला तर ग्रँट डफचा इतिहास जुनापुराणा, अपूर्ण आणि त्याज्य आहे असे म्हणणे योग्य होणार नाही. स्प्रेंगेल आणि स्कॉट वेअरिंग यांच्या मराठ्यांच्या इतिहासाशी ग्रँटच्या इतिहासाची जरी स्थूलमानाने आपण तुलना केली तरी ग्रँटचे काम किती भरीव आणि मूलभूत स्वरूपाचे होते याची कल्पना येईल. मराठ्यांच्या इतिहासावर नंतरच्या काळात किंकेड-पारसनीस, सरदेसाई, सरकार यांनी विस्तृत लेखन केले असले तरी ग्रँटचा इतिहास अद्याप वाचला जातो याचा अर्थ आजदेखील तो लोकांना इतका त्याज्य वाटत नाही असाच करावा लागेल.

राजवाड्यांची टीका १८९८ मध्ये प्रसिद्ध झाली, आणि ' मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ' हे न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांचे पुस्तक १९०० च्या सुमारास प्रसिद्ध झाले. वास्तविक रानड्यांनी आपले विचार १८९४ च्या वसंतव्याख्यानमालेच्या एका पुष्पात प्रगट केले होते. पण पुस्तकरूपाने ते प्रसिद्ध होण्यास काही अवधी लागला. राजवाडे यांच्या लेखाचा उपयोग रानडे यांनी म्हणूनच केलेला आढळत नाही.[२६]

ग्रँटच्या इतिहासातील सामान्य चुकांची जंत्री दाखवीत बसण्यापेक्षा त्याने केलेल्या विधानांना प्रभावीपणे उत्तर देण्याचा प्रयत्न रानडे यांनी केला आहे. राजवाड्यांनी महाराष्ट्रातील कर्त्या लोकांची मोजदाद केली आहे त्यात महादेव गोविंद रानडे यांचा बुद्धिमान व कर्तृत्ववान संस्थापक, इतिहासकार, अर्थशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ व विचारवंत असा उल्लेख केला आहे; आणि ज्यांनी चिरस्थायी व भरीव कामगिरी केली आहे याबद्दल कोणाचाही मतभेद होणार नाही अशा पंचेचाळीस बुद्धिमान आणि कर्तृत्ववान व्यक्तींची निवड केली आहे, त्यातही रानडे यांचे नाव आहे. रानड्यांच्या या

---

२६. Rise of Maratha Power, Bombay University, Bombay (1961), p. 2.

पुस्तकाबद्दल आपल्या सहाव्या खंडाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे, "रानडयांनी इंग्रजीत रचलेला शिवाजीचा इतिहास अधिक योग्यतेचा आहे. कारण, त्यात शिवकालीन समाजाची पूर्वकारणपरंपरा देण्याचा प्रयत्न केला आहे. संतांची परीक्षा रानडयांना यथास्थित करता आली नाही. शिवाजीच्या अष्टप्रधानात्मक राज्यपद्धतीसंबंधीही त्यांची विधाने धरसोडीची आहेत; तथापि मराठ्यांच्या समाजचरित्राला अव्याहत कारणपरंपरा आहे हा सिद्धान्त त्यांच्या ग्रंथाने कायमचा प्रस्थापित केला आहे ह्यात संशय नाही."[२७]

इतिहासाचार्य राजवाडयांनी भलावण केलेल्या रानडयांच्या पुस्तकाचा मुख्य हेतू, "हिंदी मनोभूमिकेतून या इतिहासाची विशिष्ट लक्षणे स्पष्ट निदर्शनास आणावी, या कथेच्या नैतिक अर्थाला आणि राजकीय बोधाला हीनत्व आणणारे दुर्ग्रह दूर करावे, असा या प्रकरणांचा उद्देश आहे, पण सर्वांहून जास्त महत्त्वाचा उद्देश म्हणजे विजयी ब्रिटिश सत्तेच्या प्रतिनिधींच्या ठिकाणी आपल्या हार खाल्लेल्या प्रतिस्पर्ध्याच्या दैवाविषयी सहानुभूती उत्पन्न करावी हा आहे."[२८]

थोडक्यात, मराठ्यांच्या इतिहासाचे नैतिक स्वरूप स्पष्ट करून, विद्यमान राज्यकर्त्यांच्या मनात मराठ्यांविषयी काही कलुषित भावना निर्माण होऊ नये या हेतूने प्रेरित होऊन या ग्रंथाची रचना झाली आहे. मराठे हे काही चोर, लुटारू नव्हते, त्यांच्यामागे काही परंपरा आहे, त्यांचे म्हणून स्वतंत्र असे तत्त्वज्ञान आहे, हे सांगून मराठ्यांच्या इतिहासाची

---

२७. राजवाडे लेखसंग्रह भाग ३, (पुणे शक, १८५७) पृ. १७२, १७८.

२८. 'मराठी सत्तेचा उत्कर्ष', अनुवादक न. र. फाटक, मुंबई (१९६४), पृ. १४; Rise of the Maratha Power– M. G. Ranade, Bombay University Publication, 1961. P. I.

"My aim is rather to present a clear view of the salient features of the history from Indian standpoint, to remove many misapprehensions which detract much from the moral interest and the political lessons of the story, and, above all, to enlist the sympathy of the representatives of the conquering British power in the fortunes of its worsted rival."

नैतिक बाजू मांडण्याचा प्रयत्न केला आहे. इतिहासनिवेदनाची प्रचलित पद्धत त्यांनी अंगिकारिली नाही. लढाया आणि वेढे यांचे नीरस तपशील ते देत बसले नाहीत. त्यांनी विचार केला तो मूलभूत तत्त्वांचा आणि म्हणूनच त्यांचा प्रबंध अभिजात ठरला आहे. मराठी भाषा आणि संस्कृतीच्या ज्ञानाबरोबरच त्यांना पाश्चात्यांच्या इतिहासविवेचनपद्धतीचेही ज्ञान होते. शिवाय राजकीय क्षेत्रात त्यांना एक विशिष्ट दर्जा असल्यामुळे इतिहासास उपयुक्त अशी सरकारी नियंत्रणाखाली असलेली साधने त्यांना सुलभतेने उपलब्ध होऊ शकली.

रानडयांचा प्रबंध म्हणजे ग्रँटच्या इतिहासाची तपशीलवार टीका नव्हे. त्याची विधाने त्यांनी तपासून घेण्याचे काम केलेले नाही. त्यांच्या सर्व विवेचनाचे मुख्य सूत्र म्हणजे भारताच्या इतिहासातील मराठयांचे स्थान त्याने योग्यरीत्या दाखविले नाही. त्यासाठी मराठयांच्या इतिहासाच्या अभ्यासामागील नैतिक बैठक दाखवून दिल्यानंतर ग्रँट डफच्या एका विधानाला त्याने कसून विरोध केला आहे. मराठयांचा उदय हा सह्याद्रीतील वणव्यासारखा नाही. मराठी सत्तेच्या स्थापनेमागे केवळ दैवी योगायोग नाही. त्याला परंपरा आहे, इतिहास आहे. चोर, लुटारूंनी लूटमार केली, काही काळ अनियंत्रित सत्ता स्थापन केली याची उदाहरणे इतिहासात असली तरी त्यांनी राज्यस्थापना केली आणि ते राज्य टिकेल कसे याची योजना केली असे दाखले इतिहासात आढळणार नाहीत. मराठयांनी राज्य स्थापिले, शासनपद्धती निर्माण केली, त्या राज्याचा विस्तार मोठा झाला, आणि शेवटी भारत देश इंग्रजांना मराठयांच्या सत्तेचा निःपात केल्याशिवाय मिळाला नाही ही एकच गोष्ट मराठयांचे इतिहासातील स्थान सिद्ध करावयास पुरेशी आहे. मराठी सत्ता धुळीला मिळविल्याखेरीज मुघल साम्राज्य भारतात नांदणार नाही असे औरंगजेबाप्रमाणे कंपनी सरकारलाही वाटत होते. मराठयांचे मोठेपण अशा रीतीने सिद्ध करण्याचा रानडयांनी आपल्या प्रबंधात प्रभावी प्रयत्न केला आहे.

१८५८–५९ साली म्हणजे वयाच्या १६-१७ व्या वर्षी शाळेत असताना महाराष्ट्रेतिहासविषयक रानडयांनी जो निबंध लिहिला होता त्यातले विचार पुढे ३०-३५ वर्षांनी लिहिलेल्या प्रबंधात परिपक्वरूप धारण करून आले आहेत. मराठी राज्याचा शेवटचा भाग–सातार्‍याचे राज्य—१८४८ साली खालसा झाला. त्यामुळे ब्रिटिशांच्या नीतीविरुद्ध शिगेला पोहोचलेली प्रतिक्रिया त्यांनी बालपणात अनुभवली असेल, आणि अशा या परिस्थितीतूनच कदाचित मराठी सत्तेच्या उदयाचा बोध

करून घेण्यासाठी ते प्रवृत्त झाले असावेत. या निबंधातील विचारावरून कदाचित त्यांनी ग्रँट डफ वाचला असावा. मराठ्यांना लुटारू म्हणतात हे ठीक नाही असे त्यांना तेव्हापासून वाटत होते. प्रस्तुत निबंधात ते म्हणतात, "एका लुटारूंच्या जमावाने (शिवाजीच्या कार्याला लुटारूपणा हे नाव शोभत असेल तर) यशस्वी पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली प्रचंड साम्राज्याचा पाया घातला....याप्रमाणे हे साम्राज्य लुटारूंनी उभारले व लुटालुटीनेंच ते बळकट केले. लुटालुटीनेच ते साम्राज्य वैभवास चढले."[२९] यावरून मराठ्यांच्या संदर्भात वापरलेल्या लुटारू, लूट या शब्दांचा त्यांना किती तिरस्कार बालपणापासून होता याची कल्पना येते.

रानड्यांनी ग्रँट डफवर विदारक टीका केली आहे, अथवा राजवाड्यांप्रमाणे त्याच्यातील उणीवा दाखविल्या आहेत असे नाही. मराठ्यांचा इतिहास बखरीतून आला आहे आणि अधिक अधिकृतपणे ग्रँट डफने तो मांडला आहे असे रानडे मानीत होते.[३०] मात्र ग्रँट डफचा 'वणवा सिद्धान्त' त्यांना पसंत नव्हता. अर्थात मराठ्यांच्या उदयाची कारणमीमांसा स्पष्ट व्हावी म्हणून ग्रँटने आपल्या मित्राशी केलेला पत्रव्यवहार पाहिला म्हणजे मोठ्या नाईलाजानेच तो या निष्कर्षापर्यंत आला आहे असे म्हणावे लागेल. त्याला हवी तशी समाधानकारक साधनेच मिळत नव्हती. मराठ्यांचा उदय त्याला मुसलमानी साधनांवरून सांगावा लागला. पुरंदरचे अधिकारी ब्राह्मणबंधू यांना कैद करून शिवाजीने तो किल्ला हस्तगत केला हे कृत्य ग्रँटला दगाबाजीचे वाटते. परंतु रानड्यांच्या मते, त्या किल्ल्याचे लष्करी महत्त्व लक्षात घेता, तेथील शिबंदीच्या संमतीने शिवाजीने केलेल्या त्या किल्ल्याचे हरण योग्य होते, मराठ्यांच्या हिताचे होते. तसेच मुसलमानी इतिहासावर अवलंबून अफझलखान प्रकरणी ग्रँटने विश्वासघाताचा केलेला आरोप रानड्यांना वस्तुस्थितीवर आधारलेला वाटत नाही. 'पहिला वार कोणी केला' हा इतिहासातील एक गाजलेला वाद आहे, आणि आजही त्यावर चर्चा केली तर मतभेद होऊ शकतील. ग्रँटने मराठ्यांच्या दक्षिणेतील कामगिरीचा आढावा घेतला नाही याबद्दल रानड्यांनी नापसंती व्यक्त केली आहे. महाराष्ट्रांतील सामाजिक, धार्मिक, वैचारिक उत्थापनाकडे त्याने संपूर्ण दुर्लक्ष केल्यामुळे मराठ्यांच्या उदयाचे मर्म त्याला समजले नाही.

---

२९. मराठी सत्तेचा उत्कर्ष पृ. १३५-३६.

३०. रानडे, पृ. १, १०.

ग्रँटच्या पुस्तकावर एवढीच काय ती टीका त्यांच्या प्रबंधात आली आहे. तेव्हा ग्रँटला दिलेले समर्पक उत्तर म्हणजे रानड्यांचा प्रबंध असा जो एक समज आहे तो त्यांच्या या तुरळक टीकेवरून स्पष्ट होत नाही. मराठ्यांच्या इतिहासातील काही प्रसंगांबाबत ग्रँटने व्यक्त केलेली मते त्यांना मान्य नव्हती, आणि मराठ्यांच्या उदयामागची भूमिका त्याला कळली नाही येवढाच त्यांचा टीकेचा मुख्य रोख होता. 'ग्रँटचे विचार पक्व झाले नव्हते' असे सांगून ते आपली टीका सौम्य करून टाकतात.[३१]

ग्रँटच्या पुस्तकात चुका आहेत तशा रानड्यांच्या पुस्तकात आणि त्याही अक्षम्य स्वरूपाच्या आहेत हे या पुस्तकाचे मराठी अनुवादक प्रा. न. र. फाटक यांनी सविस्तरपणे दाखविले आहे.[३२] अर्थात प्रा. फाटकांच्या मते बखरीतील गैरमाहितीमुळे रानड्यांच्या निवेदनातील प्रमादांबद्दल त्यांना दोष देता येणार नाही. अर्थात हा न्याय ग्रँटला मात्र लागू करावयाचा नाही. त्याने वापरलेल्या बखरीतील माहिती कशी होती याचा विचार करावयाचा नाही. रायगड आणि राजगड या शब्दांची रानड्यांनी गल्लत केली आहे. तोरणा किल्ला घेतल्यानंतर शिवाजी महाराजांनी रायगड किल्ला बांधला, हे रानड्यांचे विधान चूक आहे. अफझलवधानंतर महाराज पन्हाळ्यास गेले आणि तेथून विशाळगडास गेले, रानडे म्हणतात त्याप्रमाणे रांगण्यास नाही. शहाजी आदिलशाही कैदेतून रानड्यांच्या मते १६५७ मध्ये सुटला हे बरोबर नाही. त्याची सुटका १६४९ मध्ये झाली. 'चंद्रराव' ही मोऱ्यांची पदवी होती, नाव नव्हे हे रानड्यांनी स्पष्ट केले नाही. 'बाजी प्रभूला पुरंदरावर लढवून पुन: रांगण्याच्या खिंडीत झुंजविले आहे.' बाजी प्रभू आणि मुरारबाजी या नावात अशी गल्लत झाली आहे. ज्ञानेश्वराचे त्यांनी तेरावे शतक न मानता पंधरावे शतक मानले आहे. रामचंद्रपंत अमात्याला आबाजी सोनदेवाचा मुलगा केले आहे. वास्तविक तो निळो सोनदेवाचा आहे. अर्थात हे दोष अगदी किरकोळ असून रानड्यांच्या मूलभूत विचारसरणीला कोठेही बाध आणणारे नाहीत.

---

३१. रानडे, पृ. १०, 'Sudden' हा शब्द ग्रँटने वापरला नाही हे संपादकांनी दाखविले आहे. पृ. २१.

"Mr. Grant Duff himself in his narrative has compared the rise of the Maratha Power to a sudden conflagration like those which occur in the forests in Sahyadri. This is, however, not his matured opinion.."

३२. मराठी सत्तेचा उत्कर्ष, परिशिष्ट २, पृ. १३७–४०.

कीर्तने, राजवाडे, रानडे यांच्याहून मिरजेचे प्रसिद्ध इतिहाससंशोधक वासुदेवशास्त्री खरे यांची ग्रँट डफवरील टीका भिन्न स्वरूपाची होती. पूर्वसूरींप्रमाणे मराठ्यांच्या इतिहासाचे तात्त्विक विवेचन ते करीत बसले नाहीत. ग्रँट डफच्या इतिहासात नावे कोठे चुकली आहेत, सन कोठे चुकले आहेत यांचे हप्ते त्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या १९१५-१६ सालच्या सभांत सादर केले, आणि आपल्या पुस्तकांच्या काही तळटीपांतही त्यांची नोंद केली. पण पुढे यात काही विशेष अर्थ नाही असे वाटून हे कार्य त्यांनी स्थगित केले. भा. इ. सं. मंडळाच्या चतुर्थ संमेलनात[३३] हा निबंध वाचला गेल्याची नोंद आहे, परंतु 'अपूर्ण आणि दुरुस्त करावयाच्या निबंधाच्या यादीत' याची नोंद केल्यामुळे हा कोठे छापला नाही. परंतु १९१६ च्या 'मराठ्यांत' या संमेलनाचा वृत्तान्त देऊन खऱ्यांच्या निबंधाचा जो गोषवारा दिला आहे त्यावरून त्यांच्या टीकेचे स्वरूप स्पष्ट होते.[३४]

१९१५ च्या 'मराठा'च्या अंकात, रावबहादुर साने यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सभेचा वृत्तान्त आला आहे. चिटणीस मेहेंदळे यांनी मंडळाच्या कार्याचा अहवाल वाचून दाखविताना सांगितले की, ग्रँट डफने आपल्या मराठ्यांच्या इतिहासात ज्या चुका केल्या त्या एकत्र करून दुरुस्त करण्याचे काम प्रगतिपथावर आहे.

भा. इ. सं. मंडळाच्या १८३६ (शक) च्या वृत्तात म्हटले आहे, "ग्रँट डफमधील आढळून आलेल्या चुका एकत्र करण्याचे काम सुरू आहे. पुष्कळशा चुका सूची तयार झाल्याने सहज दाखविता येण्याजोग्या असल्यामुळे सभासदांनी विशेष भर सूचीवर दिलेला होता. तथापि डफमधील चुकांचा पहिला हप्ता लवकरच आपणापुढे विचारासाठी येईल."[३५]

पुढच्या वर्षीच्या अहवालात असा उल्लेख आहे, "ग्रँट डफच्या पुस्तकातील चुका हप्त्याहप्त्याने प्रसिद्ध करण्याबद्दल अध्यक्ष, रा. राजवाडे, रा. खरेशास्त्री, रा. नरसोपंत केळकर वगैरेंनी बराच ऊहापोह करून हप्ते प्रसिद्ध करण्याचे ठरविले."[३६]

---

३३. चतुर्थ संमेलन वृत्त (१८३८ शक) पृ. २. मंडळाच्या संग्रही या निबंधाची प्रत नाही.

३४. 'दि मराठा', ता. ३० मे १९१५, पृ. १८३.

३५. भा. इ. सं. मं. शके १८३६, पृ. २.

३६. भा. इ. सं. मं. शके १८३७, पृ. ५.

अर्थात मंडळाने हे हप्ते प्रसिद्ध केले नाहीत, पण 'मराठा' या पत्राने खरेशास्त्रींच्या निबंधाचा काही भाग साररूपाने इंग्रजीत छापला आहे. या पत्रात म्हटले आहे की चतुर्थ संमेलनात गेल्या मेमध्ये ठरल्या-प्रमाणे नवीन उपलब्ध झालेल्या साधनाच्या साहाय्याने, ग्रँट डफच्या इतिहासातील चुका आणि उणीवा दाखविण्याच्या दृष्टीने मिरजेचे वासुदेव-शास्त्री यांनी एक निबंध वाचला.[३७] माधवराव बल्लाळ पेशवे ऊर्फ पहिले माधवराव यांच्यावर लिहिलेल्या बाराव्या प्रकरणातील ४६ आणि तेराव्या प्रकरणातील ५४ अशा शंभर चुकांचा हप्ता त्यांनी सादर केला. खरेशास्त्री यांच्या तीक्ष्ण नजरेतून एकही चूक निसटली नाही. खरेशास्त्री हे अचूक इतिहासाचे भोक्ते असल्यामुळे ग्रँट डफने केलेल्या तारखांबाबतच्या लहान-सहान चुका तसेच त्याने दुर्लक्षिलेली अथवा त्याला ज्ञात नसलेली छोटी सुद्धा घटना खऱ्यांनी सोडली नाही. यावरून नवीन संशोधनाच्या साहाय्याने मराठ्यांच्या इतिहासाचे पुनर्लेखन केल्यास आज उपलब्ध असलेल्या विस्कळीत आणि अपुऱ्या मराठ्यांच्या इतिहासापेक्षा, एक चांगला निकोप इतिहास लोकांच्या वाचनात येऊ शकेल हे स्पष्ट होते. शास्त्री-बोवांच्या सूक्ष्म आणि चिकित्सक बुद्धीचे कौतुक करून संपादक म्हणतात, "ग्रँट डफच्या इतिहासाच्या पानापानाची छाननी करून, त्यात सुधारणा आणि भर घालण्याची जबाबदारी जी मंडळाने उत्साहाने उचलली आहे त्याबद्दल जनता त्यांची सदैव ऋणी राहील." श्री. खरे आणि इतर संशोधक मंडळाला या कामी मदत करतील अशी अपेक्षा व्यक्त केली आहे.

१ ऑक्टोबर १९१६ च्या मराठ्यांत नमुन्यादाखल खऱ्यांच्या निबं-धातील काही भाग दिला आहे. प्रस्तुत संदर्भात संपादकांनी म्हटले आहे की खऱ्यांच्या लेखातील एक दोष म्हणजे त्यांनी ग्रँटच्या इतिहासातील ज्या चुका अथवा उणीवा दाखविल्या आहेत त्या सर्वांनाच आधार दिले नाहीत. येथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की ग्रँटवर देखील याच कारणावरून हल्ला चढविला जातो.

वासुदेवशास्त्री खऱ्यांनी दाखविलेल्या चुका ह्या प्रामुख्याने नाव, तारखा, ठिकाणे यासंबंधीच्या आहेत. त्यांनी दाखविलेल्या १०० चुकांतील ज्या दहा चुका संपादकांनी नमुन्यादाखल निवडल्या आहेत त्यावरून त्यांच्या टीकेचे स्वरूप लक्षात येईल. उदाहरणार्थ, माधवरावांना पेशवाईची वस्त्रे ग्रँटच्या मते सप्टेंबरच्या शेवटी मिळाली पण हिंगणे दप्तरावरून ती

---

३७. दि मराठा, ४ सप्टेंबर १९१६, पृ. ४१७.

ऑगस्टमध्ये मिळाली असे दिसते. बाळाजी बाजीराव जूनच्या अखेरीस वारला हे ग्रँटचे विधान चूक असून तो २३ जुलैला मेला असे हिंगणे दप्तरात नमूद केले आहे. रामराजाला पदच्युत करण्याचा ताराबाईने बेत केला होता पण तो तडीस गेला नाही, हा भाग राजवाड्यांच्या सहाव्या खंडात आला आहे तो भाग ग्रँटमध्ये नाही. माधवराव कृष्णेच्या पलीकडे गेला नव्हता असे ग्रँट म्हणतो ते चूक असून माधवरावाने कृष्णा तर पार केलीच होती, पण तो कर्नाटकात गेला होता, तुंगभद्रा ओलांडली होती, कारवारातील सोंडा जहागिरीपर्यंत पोहोचला होता.

इंग्रज-मराठे पहिल्या युद्धाच्या प्रसंगातील हकीकत सांगताना नाशिक सोडून रघुनाथराव औरंगाबादकडे गेला हे ग्रँटचे विधान बरोबर नाही. राघोबा हा नाशिकला गेलाच नाही. तो वडगाव येथेच राहात होता आणि तेथून तो पुढे नगरमार्गे पैठणला गेला. निजामअलीस रघुनाथरावाने दौलताबाद किल्ला दिला हे बरोबर नाही.

रामचंद्र जाधव मोगलांची बाजू सोडून १७६१ च्या सुमारास आल्यामुळे त्याला त्याच्या पणजोबाचे सेनापतीपद देण्यात आले, पण गुजराथ प्रांताचे सार्वभौमत्वाचे हक्क देऊ असे त्याला वचन दिले असता ते पाळले नाही म्हणून तो परत निजामअलीस जाऊन मिळाला अशी हकीकत ग्रँटने सांगितली.

याबाबत वस्तुस्थिती अशी आहे की १७६२ मध्ये तो निजामाकडे गेला हे बरोबर नाही. १७६३ मध्ये तो मराठ्यांच्या बाजूने होता. निजाम-मराठे संघर्ष सुरू झाला तेव्हा राघोबाने त्याला कैद करून दौलताबादच्या किल्यात डांबून ठेवले.

१७६३ साली मुघल-मराठे संघर्ष जेव्हा परत सुरू झाला तेव्हा मल्हारराव होळकर आणि दमाजी गायकवाड हे दोघे रघुनाथरावबरोबर होते या ग्रँटच्या म्हणण्यास काही आधार नाही. मल्हारराव त्यावेळी चांदवडला होता, तेथून त्याला बोलावून आणले ही माहिती खऱ्यांनी दिली.

" इचलकरंजीचा इतिहास ह्यात पृ. २७ वर व्यंकटराव नारायणाच्या जागी नारायणराव कृष्णाजी, परशुरामाच्या ऐवजी कृष्णाजी भास्कर " अशा नावांच्या चुका टीपेत दाखविल्या आहेत. पृ. १०९–१० वर 'चिकोडी व मनोळी' हे करवीरकरांचे दोन तालुके पेशव्यांनी पटवर्धनांकडे कर्जफेडीकरता देवविले असे असता, 'ते करवीरकरांकडून जबरीने काढून पेशव्यांनी पटवर्धनास दिले.' रामचंद्र गणेशाच्या जागी 'रामचंद्र हरी' व या

'रामचंद्र हरीचा येसाजी शिंद्याने पराभव केला' इत्यादि अनेक चुका डफने एका पॅरिग्राफमध्ये केल्या आहेत असे म्हणून त्यांनी आश्चर्य प्रकट केले आहे.

'मालोजी व शहाजी' या निबंधात 'मूर्तुजा निजामशहाच्या वयाचा घोटाळा ह्या साहेबांनी दिलेल्या माहितीवरून झाल्याचे आणि तुकाबाईशी शहाजीचे लग्न झाल्यामुळे जिजाबाई रुसली, किंवा तिला नवरा विचारीत नाहीसा झाला वगैरे चुकीची माहिती ग्रँटने दिली आहे असे शास्त्रीबुवा म्हणतात. जिजाबाईबाबत जेम्स मिलने देखील[३८] म्हटले आहे, "शिवाजीच्या आईबद्दल शहाजीच्या मनात तिरस्कार निर्माण झाला होता." जदुनाथ सरकारांनी[३९] तर याहून पुढे मजल मारली आहे. जिजाबाईचे सौंदर्य ओसरू लागले, तिच्याविषयीचे शहाजीचे आकर्षण कमी झाले, म्हणून त्याने अधिक तरुण आणि रूपवान अशा तुकाबाईशी लग्न केले. अशा तऱ्हेच्या विधानासाठी आता दोष तरी कोणाकोणाला द्यावयाचा. या साऱ्यांचा आधार मुसलमानी साधने आहेत.

शास्त्रीबुवांच्या टीकेचे स्वरूप पाहिले असता, मिरज मळ्यात आणि इतरत्र, ग्रँट नंतर सुमारे शंभर वर्षांनी जे नवीन साहित्य उपलब्ध झाले त्याच्या साहाय्याने त्याने ती केली हे उघड आहे. अर्थात खरेशास्त्र्यांचे हप्ते ग्रँटवरील टीका म्हणून न मानता, त्याच्या इतिहासात भर घालण्यास उपयुक्त माहिती असे मानणे योग्य ठरेल.

तात्यासाहेब केळकरांना लिहिलेल्या पत्रांत शास्त्रीबुवा म्हणतात, "..डफच्या इतिहासात चुका आहेत हे आम्ही सर्वच म्हणत होतो, पण इतक्या मनस्वी, चुका असतील ही माझी तरी निदान समजूत नव्हती !

---

३८. History of India by James Mill, Vol. II, p. 406.

"The mother of Shivaji was an object of aversion to her husband."

३९. Shivaji and his Times by Sarkar (6th Ed.) p. 19.

Jijabai lost her husband's love, probably with the loss of her youth, and Shahaji forsook her.. and took a younger and more beautiful wife.

"... हा इतिहास नसून बरीशी बखर आहे. तारखा बहुतेक चुकलेल्या आहेत. स्थळे व व्यक्तींची कृत्ये, स्वभाव व नावे सुद्धा काही चुकली आहेत."[४०]

शास्त्रीबुवांना डफच्या इतिहासात चुका दिसत होत्या तरी त्याच्याबद्दलचा आदर त्यामुळे कमी झाला नव्हता हे विशेष आहे. ते म्हणतात, "पाहा ! परकीयांची ज्ञानलालसा केवढी जबरदस्त ! मराठे लोक हे ग्रँट डफ साहेबांचे कोण ? पण त्याचा इतिहास छापून प्रसिद्ध करण्यासाठी इकडची जुनी दप्तरे वगैरे तर त्यांनी शोधलीच, आणि वरती त्यांच्या प्रकाशनार्थ लागेल तेवढा खर्च करण्यास देखील त्यांनी मागेपुढे पाहिले नाही ! !"[४१]

कीर्तन्यांपासून वासुदेवशास्त्र्यांपर्यंतच्या सर्व मराठी टीकाकारांनी ग्रँट डफच्या ग्रंथातील दोष दाखवीत असता त्याच्या कार्याचे कौतुक आणि प्रशंसा केली आहे हे विशेष स्पृहणीय आहे.

ग्रँट डफ नंतर मराठ्यांचा इतिहास किंकेड-पारसनीस या द्वयांनी सुमारे एक शतकानंतर लिहिला (१९२३). रियासतकार सरदेसायांनी देखील आपल्या रियासतीचे इंग्रजीत रूपांतर करून त्रिखंडात्मक असा मराठ्यांचा इतिहास वाचकांसमोर ठेवला. फक्त शिवाजीपुरता विचार करण्याचे जदुनाथ सरकार, डॉ. बाळकृष्ण, केळुसकर आणि वैद्य यांनी प्रयत्न केले आहेत. पण यातील बहुतेकांनी ग्रँट डफपेक्षा आपल्या ग्रंथात अधिक काय आहे हे सांगण्याचा प्रयत्न केलेला नाही.

"मराठी ऐतिहासिक वाङ्मय" या विषयावर १९०५ साली रावबहादुर पारसनीसांनी एक निबंध रॉयल एशियाटिक सोसायटीत वाचला होता. त्यांनी मात्र ग्रँट डफची बरीच प्रशंसा केली होती. आपल्या 'भारत वर्षा'त सुरवातीस ग्रँट डफचे चरित्र देऊन त्याच्याबद्दलचे गैरसमज दूर करण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता. १९०५ सालच्या आपल्या निबंधात, १९ व्या शतकाच्या पहिल्या अर्धशतकातील एक महत्त्वाचा ग्रंथ असा गौरवपूर्ण उल्लेख ग्रँटच्या इतिहासाचा केला होता. नंतरच्या काळात बरेच संशोधन झाले असले तरी मराठ्यांच्या इतिहासावरील अधिकृत ग्रंथ

---

४०. भा. इ. सं. मं. पुरस्कृत गुरुवर्य वासुदेव वामनशास्त्री खरे चरित्र व ग्रंथपरिचय, लेखक दामोदर मोरेश्वर भट (१९२९) खंड १ पृ. २९३.

४१. कित्ता, पृ. ९८, ९९.

म्हणून त्याचे महत्त्व कायम आहे असे आपले मत त्यांनी व्यक्त केले आहे नंतरच्या लेखकांनी त्याच्या ग्रंथाची जी प्रशंसा केली आहे तो योग्यच आहे. धीमेपणाचे संशोधन आणि न्याय्य निवेदन या दृष्टीने मराठ्यांच्या इतिहासावरील इतर ग्रंथांपेक्षा हा अगदी उजवा असा ग्रंथ आहे. नंतरच्या काळात मराठ्यांच्या इतिहासात लेखकांनी भर घातली अथवा सुधारणा केल्या असल्या तरी त्यामुळे ग्रँटचे उच्च स्थान भ्रष्ट झाले नाही किंवा त्याला मागे सारून अद्याप कोणी पुढे गेला नाही.

मराठी भाषेशी अधिक परिचय नसल्यामुळे आणि इतर काही कारणांमुळे, या ग्रंथात काही चुका आणि दोष राहून गेले आहेत ते नंतरच्या काळातील अधिक संशोधनाने दूर करता येतील, अशा स्वरूपाचे विचार पारसनीसांनी १९०५ साली मांडले होते. ग्रँटचे स्थान आजही अबाधित आहे हे १९०५ सालचे पारसनीसांचे विधान विद्यमान स्थितीला देखील लागू आहे असेच म्हणावे लागेल.[४२]

रियासतकारांनी एक कच्चा अधिकारी (a raw British Soldier) असा ग्रँटचा उल्लेख साताऱ्याच्या संदर्भात केला आहे.[४३] पण वयाच्या

---

४२. JBBRAS Nos. 60–62, Vol. 22, 1904–7 p. 171. (Maratha Historical Literature by D. B. Parasnis). "The most notable book of this period is, however Grant Duff's History of the Marathas. In spite of later researches Grant Duff is still the paramount authority on the subject of Maratha History. His work fully deserves all the eulogies passed upon it by successive writers. For patient research and judicious statement it stands pre-eminent among the works on Maratha History. Whatever additions and improvements may be made by later writers, Grant Duff's work stands on its own pedestal, and can hardly be surpassed. It cannot be denied that want of familiarity with the Maratha language and such other causes have led to some errors and defects which later investigation may be able to correct... "

४३. New History of the Marathas by Sardesai, Vol. III, p. 510.

अवघ्या तिसाव्या वर्षी एका दुभंगलेल्या प्रदेशाची व्यवस्था लावण्याची किमया त्याने तीनचार वर्षांच्या आत करून दाखविली असता सरदेसायांनी त्याला कच्चा अधिकारी का म्हटले आहे हे समजावयास मार्ग नाही.

रियासतकारांचा इंग्रजी इतिहास हा सर्वत्र वाचला जातो. तो देखील संपूर्णतया ग्राह्य मानला जात नाही. सरदेसाई आणि ग्रँट डफ यांच्या पुस्तकातील घटना एका कालपटावर मांडून त्यांची छाननी केली असता दोन्ही इतिहासांतील घटनानोंदीच्या दृष्टीने काही फरक आढळून येतात. याबाबतीत १७६१ चा एक टप्पा आणि त्यानंतर १८१८ पर्यंतचा दुसरा टप्पा असा कल्पिला तर दुसऱ्या भागात हे फरक कमी प्रमाणात आढळतात. इंग्रजी साधनांना जेथे जेथे वापर करणे शक्य झाले आहे तेथे ग्रँटचे वर्णन बरेच विस्तृत आहे. विशेषतः १९ व्या शतकाच्या प्रारंभापासूनचा इतिहास त्याने आपल्या डोळ्यांसमोर घडताना पाहिला असल्यामुळे आणि काही प्रसंगी इतिहास घडविण्यातही त्याने भाग घेतला असल्यामुळे त्याचे निवेदन हे विस्तृत आणि अधिकृत असे बनले आहे.

घटनांच्या तारखांचा विचार करावयाचा झाला तर त्यात या दोघांमध्ये, काही दिवसांपासून काही वर्षांपर्यंत तफावत आढळते. उदाहरणार्थ, शिवाजीमहाराजांच्या जन्ममृत्यूच्या तारखा सरदेसायांनी अनुक्रमे ६ एप्रिल १६२७ व ३ एप्रिल १६८० अशा दिल्या आहेत तर डफने त्या मे १६२७ व ५ एप्रिल १६८० अशा दिल्या आहेत. औरंगजेबाच्या मृत्यूची तारीख एकात २० फेब्रुवारी १७०७ आहे तर दुसऱ्यात २१ फेब्रुवारी, १७०७ आहे. तसेच शहाजीची विजापूर दरबारची नोकरी, औरंगजेबाची दक्षिणेतील दुसरी सुभेदारी, मिर्झाराजा जयसिंगाची स्वारी, शिवाजीमहाराजांची कर्नाटकावर स्वारी, धनाजी जाधवाचा मृत्यू, बाळाजीची पेशवा म्हणून नेमणूक, निजामास वजिरीपद, फत्तेसिंह व गोडार्ड यांचा अहमदाबादेवरील कब्जा, निजाम व नाना फडणीस यांची यादगीर येथील भेट, विठोजी होळकराचा मृत्यू इत्यादि घटनांच्या तारखांत, दिवस, महिना आणि वर्ष यात फरक आढळतात.

सतराव्या शतकाच्या सुरवातीच्या इतिहासातील कितीतरी घटनांची नोंद-विशेषतः मालोजी, शहाजीसंबंधीची–ग्रँट डफच्या इतिहासात आली नाही हे सरदेसायांच्या ग्रंथावरून कळून येईल...शहाजीच्या कर्नाटकातील हालचाली, दादोजी कोंडदेवाच्या काळातील शिवाजीमहाराजांच्या हालचाली, मराठ्यांचे विजापुरकराशी संबंध इत्यादि भाग सरदेसायांहून येथे कमी आढळतो. अर्थात या फरकाचे मुख्य कारण म्हणजे नवीन साधनांची प्राप्ती हेच आहे.

जदुनाथ सरकारांनी आपला शिवाजी अँड हिज टाईम्स हा शिवचरित्रावरील ग्रंथ १९१९ साली प्रसिद्ध केला. ग्रँट डफचा आधुनिक अवतार अशी कै. दत्तोपंत आपटे यांनी त्यांची संभावना केली आहे.[४४] नंतरच्या कालात मराठी संशोधक जदुनाथांच्यावर तुटून पडल्यामुळे कदाचित त्यांना ग्रँट डफचा विसर पडला असावा. ग्रँट डफच्या इतिहासासंबंधी जदुनाथांनी आपली मते कोठे स्वतंत्रपणे मांडली नाहीत. पण आपले पुस्तक हे ग्रँट डफपेक्षा कसे अधिक विश्वसनीय आणि ज्ञानात भर घालणारे आहे हे दाखविण्याचा प्रयत्न त्यांनी आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत केला आहे. ते म्हणतात, "ग्रँटला ज्ञात असलेल्या साधनांचा मी वापर केलाच आहे, पण त्या साधनांचा मी अधिक बारकाईने आणि कसोशीने अभ्यास करूनच त्यांचा उपयोग केला आहे." शिवाजीचा इतिहास लिहिण्याचा मुख्य उद्देश म्हणजे शिवाजीविषयी वाढत चाललेल्या कपोलकल्पिताचा (Shivaji Myth) स्फोट करणे हा होय. कारण असे करणे हे ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीने आवश्यक आहे असे ते म्हणतात.[४५]

शिवचरित्रापुरते बोलावयाचे झाले तर ग्रँट डफचा इतिहास हा आता जुनापुराणा आणि काही बाबतीत चुकीचा ठरला आहे. याचे कारण म्हणजे ग्रँट डफला अज्ञात असलेल्या चार निरनिराळ्या प्रकारच्या साधनांची नव्याने झालेली प्राप्ति हे होय. पहिले, समकालीन फ्रेंच आणि पोर्तुगीज साधने ही आता उपलब्ध झाली आहेत. मनुचीचा ग्रंथ, फ्रेंच आणि डच प्रवाशांचे वृत्तान्त हे आता प्रकाशात आले आहेत. दुसरे, मराठीत प्रसिद्ध झालेल्या शकावल्यांमुळे पुष्कळ घटना आणि तारखा नव्याने उजेडात आल्या आहेत. ९१ कलमी बखर ही चिटणीसाच्या बखरीहून बरीच जुनी आणि दंतकथाविरहित अशी असल्यामुळे अधिक ग्राह्य आहे. ग्रँट डफने चिटणीसी बखरीचा अधिक वापर केल्यामुळे, शिवाजीसंबंधीचे त्याचे लिखाण सदोष झाले आहे. तिसरे, अलमगीरनामा, मासिर-इ-अलमगिरी, अखबार, भीमसेनचे ग्रंथ, जयसिंगाची पत्रे इत्यादि फार्सी साधने ग्रँटला ज्ञात नव्हती. खाफीखानचा त्याने अधिक वापर केला आहे. पण चिटणीसी बखरीप्रमाणेच खाफीखान हा देखील अस्सल ग्रंथ मानता येत नाही. चौथा प्रकार म्हणजे जयपूर येथील डिंगल बोलीतील पत्रव्यवहार. हा पत्रव्यवहार पहिल्याने जदुनाथांनी प्रकाशात आणला.[४६] ग्रँट डफचा इतिहास प्रसिद्ध झाल्यानंतर

४४. शिवभारत प्रस्तावना, पृ. १३.
४५. Shivaji and his times : प्रस्तावना पृ. १, २.
४६. कित्ता.

जी नवीन साधनसामुग्री मिळाली त्यामुळे मराठी बखरीप्रमाणेच त्याच्या इतिहासाचा शिवाजीपुरता तरी काही भाग अनावश्यक आणि चुकीचा असा झाला आहे.

नवी साधने उपलब्ध झाली आहेत याखेरीज ग्रँटबद्दल सरकारांनी अधिक काही लिहिले नाही. किंबहुना ग्रँटच्या शिवाजीविषयीच्या मतांचा त्यांनी कोठे परामर्षदेखील घेतला नाही. ग्रँट डफ आणि जदुनाथसरकार यांच्यामधील मराठ्यांच्या इतिहासाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनातील फरक येथे लक्षात ठेवला पाहिजे. मराठ्यांचाच इतिहास लिहावयाचा या भावनेने ग्रँट डफ कामाला लागला आणि संपूर्ण मराठ्यांचा इतिहास आपल्यापरीने त्याने पुरा केला. जदुनाथसरकारांनी मुघलांचा इतिहास, विशेषत: औरंगजेबाचा इतिहास लिहावयास प्रारंभ केला, आणि असे करीत असता शिवाजी आणि त्याचे मावळे सतत येऊ लागल्यामुळे त्यांना मराठ्यांच्या इतिहासात थोडेसे लक्ष घालावे लागले. अशा रीतीने मुघलांच्या इतिहासाचे बांडगुळ म्हणून शिवाजीचा इतिहास तयार झाला. ग्रँट डफसारखे जिद्दीने ते मराठ्यांच्या मागे लागले नाहीत.

ग्रँट डफने आपला इतिहास परीक्षणार्थ कोठे पाठविला नाही. किंबहुना आपल्या प्रकाशकाला त्याने तशी सूचनाच केली होती. त्यामुळे त्याच्या समकालीन देशबांधवांचे त्याच्या इतिहासाविषयी काय मत होते हे समजण्यास मार्ग नाही. कदाचित तिकडील विद्यापीठांच्या अभ्यासक्रमांत हा विषय त्यावेळी नसल्यामुळे या ग्रंथाला हवी ती प्रसिद्धी मिळाली नसावी. या ग्रंथाचा त्यामुळे पश्चिम भारतातील सनदी, लष्करी नोकर अथवा काही संस्थानिक यांच्यापुरताच मर्यादित राहिला होता. अर्थात ज्यांनी ज्यांनी ग्रँटच्या पुस्तकाचा वापर केला, त्यांनी मुक्तकंठाने त्याची स्तुती केली आहे. एल्‌फिन्स्टनच्या भारताच्या इतिहासातील मराठ्यांसंबंधीचा संपूर्ण भाग ग्रँट डफवर आधारित आहे अशी त्याने तळटीपांतून नोंद केली आहे. १८७२ साली प्रसिद्ध झालेल्या ओवेनच्या "इंडिया ऑन द ईव्ह ऑफ ब्रिटिश कॉन्क्वेस्ट" या पुस्तकाच्या प्रस्तावनेत ग्रँटच्या ग्रंथाची, माहिती मिळविण्याच्या दृष्टीने "नेहमी मौलिक असलेला, तपशिलाने भरलेला, तेजस्वी, चतुर आणि काटेकोरपणे सदसद्विवेक बुद्धीला धरून लिहिलेला इतिहास" अशी भलावण केली आहे. आज उपलब्ध नसलेल्या बऱ्याच स्थानिक साधनांवर आधारित असा हा ग्रंथ आहे; येवढेच नव्हे तर इतिहासात

भाग घेतलेल्या व्यक्तींच्या मुलाखती घेऊन मिळविलेली माहितीही यात आली असल्यामुळे ग्रँट डफचा इतिहास प्रशंसनीय आहे असे ओवेन म्हणतो.[४७]

१९१२ साली ग्रँट डफच्या पुस्तकाची पाचवी आवृत्ती कलकत्त्याच्या आर्. कॅम्ब्रे आणि कंपनीने काढली. प्रस्तावनेत टी. डी. केर्र् यांनी ग्रँट-संबंधी पुढीलप्रमाणे उद्गार काढले आहेत. "... मराठ्यांत काही दिवस वास्तव्य केल्यामुळे मराठ्यांच्या विशिष्ट स्वभावधर्माची त्याला ओळख पटली होती. तो अत्यंत व्यवहारी माणूस होता आणि पोलिटिकल एजंटला आवश्यक ते सारे गुण त्याच्या ठायी होते. साम्राज्यवादी असला तरी तो परोपकारी वृत्तीचा होता. लोकांचा त्याने मेहनतपूर्वक अभ्यास केला होता, मग ते छावणीतील सैनिक असोत अथवा जमिनी कसणारी रयत असो. जुनी आणि धुळीने माखलेली दप्तरे धुंडाळून त्याने वर्तमानकालाचा नीट बोध व्हावा म्हणून भूतकाळाचा शोध घेतला. सर हेन्री लॉरेन्स-सारख्या अधिकारी व्यक्तीने असे म्हटले आहे की, सत्यसंशोधन हा त्याच्या कार्यामागील मोठा हेतू होता, या उद्गारातच त्याच्या कामगिरीचे महत्त्व सामावलेले आहे. त्यामुळे भारताच्या इतिहासाच्या विशेष कालखंडावर जे इतिहास रचले गेले त्यांत याचे स्थान पहिल्या प्रकारच्या इतिहासात आहे, याबद्दल आश्चर्य वाटण्याचे काहीच कारण नाही."[४८]

---

४७. Sidney Owen : India on the Eve of British conquest : (1872) Preface "... invaluable at every stage of enquiry, has been the minute, luminous, sagacious, and scrupulously conscientious History of the Marathas by Captain Grant Duff."

४८. A History of the Mahrattas, 5th Ed. (Calcutta 1912) Preface by T. D. Kerr— "Having lived among the Mahrattas for years, Grant Duff came to understand their peculiar character. He was an eminently practical man and combined all the qualifications necessary for a political agent. Imperial and benevolent, he had diligently studied the people in the camp as well as in the ryots' fields. By means of old and dusty other-records he scanned the past, that he might rightly understand the present–for, as borne out by no less than an authority than Sir Henry

लंडन विद्यापीठांतर्गत स्कूल ऑफ ओरिएन्टल अँड आफ्रिकन स्टडीज या विभागाच्या विद्यमाने 'हिस्टोरियन्स ऑफ इंडिया, सिलोन अँड पाकिस्तान' नावाचा एक ग्रंथ त्या विभागाचे डायरेक्टर डॉ. फिलिप्स यांनी संपादित केला आहे.[४९] या पुस्तकात ग्रँट डफवर निबंध नाही याचे आश्चर्य वाटते. मात्र या ग्रंथात डॉ. फिलिप्स यांनी एल्फिन्स्टनच्या कार्याचा आढावा घेणारा जो लेख लिहिला आहे त्यात अनिवार्यपणे ग्रँटचा थोडासा उल्लेख आला आहे. डॉ. फिलिप्सनी केलेले ग्रँटसंबंधीचे विधान संक्षिप्त तर आहेच पण बिनचूकही नाही. ग्रँटला मराठ्यांचा इतिहास लिहिण्यास एल्फिन्स्टनने सांगितले हे विधान बरोबर नसून त्याने जेव्हा आपल्या मनातील विचार बोलून दाखविले तेव्हा एल्फिन्स्टनने त्याला उत्तेजन दिले ही वस्तुस्थिती आहे हे आपण मागे पाहिलेच आहे. 'ग्रँटने आपला इतिहास १८२५ साली दोन भागांत प्रसिद्ध केला ही माहिती बरोबर नसून १८२६ साली तीन भागांत केला असे आहे. संपादकांनी या ग्रंथाबद्दल फक्त एक दोन वाक्ये लिहिली आहेत, "ग्रँट डफचा मराठ्यांचा इतिहास मोकळ्या मनाने आणि सहानुभूतिपूर्वक लिहिला आहे. तो अत्यंत मोलाचा आहे याचे कारण, ज्या साधनसामुग्रीवर तो आधारलेला आहे ती आता लुप्तप्राय झाली आहे. हा एक अभिजात इतिहासग्रंथ आहे. पण दुर्दैवाने त्याचे वाचन कोणी करीत नाही." (a classic account, though never, in fact, much read.) येवढे भाष्य[५०] करून या पुस्तकाच्या नामाभिधानासंबंधी प्रकाशक-लेखक यांच्यामधील सुप्रसिद्ध संवाद देऊन ग्रँट डफ आटोपता घेतला आहे.

---

Lawrence, his grand object was the Truth. Little wonder then, that it has been claimed for his work that it stands foremost among works on Special periods of Indian Histoy and 'takes its place in the very first rank of historical compositions." p iii.

४९. Historians of India, Pakistan and Ceylon Ed. C. H. Philips, London ( 1961. )

याबाबतीत चौकशीअंती असे समजले की ग्रँट डफवर लिहिण्याचे काम ज्यांच्याकडे सोपविले होते त्यांनी वेळेवर तो निबंध दिला नाही म्हणून त्याचा समावेश ग्रंथात करता आला नाही.

५०. कित्ता पृ. २२२.

डॉ. जॉर्ज डी बिअर्स यांनी ब्रिटिशांचा भारतासंबंधीचा दृष्टिकोन (१७८४–१८५८) असा एक प्रबंध लिहिला असून त्यात भारताचे ब्रिटिश इतिहासकार नावाचे एक प्रकरण आहे. त्यात त्याने ग्रँटच्या इतिहासाचा मूळ शोधग्रंथ असा उल्लेख करून म्हटले आहे की, एल्फिन्स्टनच्या हाताखाली राहून अधिकृत, अव्वल दर्जाच्या साधनांच्या साहाय्याने ब्रिटिशांच्या माहितीसाठी मराठ्यांचा–ज्या लोकांबद्दल त्याच्या मनात सद्भावना व रम्य आठवणी होत्या त्यांचा–इतिहास मोठ्या समतोलबुद्धीने लिहिला. प्रकाशकाशी झालेल्या त्याच्या झटापटीची हकीकत सांगून बिअर्स म्हणतो की, ग्रँटचा इतिहास एक उत्कृष्ट दर्जाचा संशोधनग्रंथ ठरला नाही ही दुर्दैवाची गोष्ट होय. त्याने प्रामुख्याने लढायांचा आणि क्रांत्यांचा इतिहास सांगितला. त्यामुळे हिंसा, कपटकारस्थाने आणि अज्ञान यांनी बुजबुजलेला असा हा इतिहास झाला आहे. अशी परिस्थिती असल्यामुळे ब्रिटिश राजवट येथे रूढ झाली, ब्रिटिशांची राजवट ही लोकांच्या भल्याकरताच होती हा समज रूढ होण्यास मदत झाली. अगदी १८ महिन्यांच्या काळात दक्षिणेत शांतता प्रस्थापित करण्याचे जे काम ब्रिटिशांनी केले, तसे त्या अस्थिर प्रदेशात कित्येक वर्षांनी घडत होते. या साऱ्या प्रकरणात मराठी राजे यांना खलनायक बनविले आहे. ग्रँटला त्यांचा स्वभाव आणि हेतू पूर्णपणे कधीच समजले नाहीत. ब्रिटिश सैनिक हा या प्रकरणातील नायक, त्याच्या शौर्याला तोड नव्हती, आणि त्याला सारे अपराध क्षम्य होते. थोडक्यात ग्रँटचा इतिहास म्हणजे ब्रिटिश साम्राज्याच्या समर्थनाचा एक प्रयत्न होय असे म्हणावे लागेल असे बिअर्सने आपले मत व्यक्त केले आहे.[५१]

इतिहासलेखनासंबंधी आज प्रचलित असलेल्या कल्पना लक्षात घेऊन १५० वर्षांपूर्वी लिहिलेल्या ग्रँट डफच्या इतिहासास ही टीका कितपत लागू पडेल याचा विचार करावयास हवा. साधनसामुग्री जमविण्यासाठी ग्रँटने फार परिश्रम केले. आपल्या मर्यादा जाणून थोडक्या वेळात हे जे इतिहासलेखनाचे कार्य केले, त्याचा विचार केला असता त्याच्या उद्देशाबद्दल, माहितीबद्दल अथवा शैलीबद्दल त्याच्यावर जे सतत आघात झाले किंवा होत आहेत ते वृथा होत असे वाटते.

---

५१. British Attitudes Towards India (1784–1858) (London 1961) p. 266.

ग्रँटच्या पुस्तकातील चुका अथवा उणीवा नवीन साधनांच्या साहाय्याने दाखवून देण्याचा कीर्तने, राजवाडे, खरे यांनी जो प्रयत्न केला आहे त्याबद्दल ग्रँटला फारसे दोषी धरता येणार नाही. कारण ह्या साऱ्या चुका अथवा उणीवा ग्रँटचा इतिहास रचला गेल्यानंतर उजेडात आलेल्या साधन-सामुग्रीवर आधारित अशा आहेत. ग्रँटला ज्ञात असलेल्या साधनांत अमुक एक प्रकारची माहिती असताना जाणूनबुजून त्याने ती घेतली नाही किंवा त्याच्या लक्षात ती आली नाही असा कोणीही आरोप त्याच्यावर केला नाही. तसेच हेही लक्षात ठेवले पाहिजे की ग्रँटच्या चुकांना त्याची साधने जशी जबाबदार असतील त्याचप्रमाणे या साधनांचा त्याला अर्थ लावून देणारे, त्याला माहिती पुरविणारे लोकही तितकेच जबाबदार धरले पाहिजेत. प्रतापसिंहाच्या रोजनिशीतील कांही सूचक उल्लेखांवरून ग्रँटला महत्त्वाची सारी साधने दाखविली असतील किंवा माहिती पुरविली असेल असे वाटत नाही.

या इतिहासलेखनामागे मराठ्यांचा अधिक्षेप करावा अथवा ब्रिटिशांचा मोठेपणा दाखवावा असा ग्रँटचा हेतू असावा असे त्याचे मनोगत बोलून दाखविणाऱ्या खाजगी पत्रव्यवहारावरून तरी वाटत नाही. ज्या लोकांवर तुम्हाला राज्य करावयाचे आहे त्या लोकांच्या इतिहासाची, चालीरीतींची, संस्कृतीची, भाषेची ओळख असल्याखेरीज प्रशासन कार्यक्षमपणे करता यावयाचे नाही या भावनेतूनच कंपनीच्या अधिकाऱ्यांनी स्थानिक इतिहास, चालीरीतींचे, लोकजीवनाविषयीचे अहवाल, आपली प्रशासकीय जबाबदारी सांभाळून पत्करल्याचे दिसून येते. माल्कमचे मध्यप्रदेश, मॅकिनटॉशचा रामोश्यांवरील अहवाल, विल्क्सचे म्हैसूर, टॉडचे राजस्थान, ब्रिग्जचा भिल्लांचा अहवाल, ग्रॅहमचा कोल्हापूरचा अहवाल, इत्यादि ग्रंथ-निर्मिती प्रामुख्याने या भावनेतून आणि काहीशा प्रशासकीय गरजेतूनच झाली आहे.

ग्रँट डफच्या इतिहासातील काही विधानेच घेऊन त्यांचा तुटकपणे विचार न करता, त्याच्या समग्र इतिहासाचा एकसंध असा विचार केला, आणि त्याचबरोबर त्याचे अंतःकरण खुले करून दाखविणारी ही खाजगी पत्रे पाहिली म्हणजे हा इतिहास ब्रिटिशांची भलावण करण्यासाठी लिहिलेला, दुय्यम दर्जाचा, अविश्वसनीय आहे अशा शब्दांत त्याची निर्भर्त्सना करणे अप्रस्तुत ठरेल. मराठ्यांचा अधिक्षेप तर दूरच राहो, पण ज्या मराठ्यांशी झगडून आपण राज्य मिळविले, त्या मराठ्यांची माहिती असणे आवश्यक आहे या शुद्ध विचाराने प्रेरित होऊनच त्याने इतिहास-

लेखनाचे कार्य हाती घेतले होते हे चार्लस् फोर्बस् या आपल्या मित्राला लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट होते. "मराठ्यांचा इतिहास लिहिण्यास अलीकडेच मी प्रवृत्त झालो आहे, कारण या मराठ्यांविषयी जनतेला अद्यापि पुरी माहिती नाही (९-१२-२०)." आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत सुद्धा हाच विचार त्याने व्यक्त केला आहे.

मराठ्यांच्या इतिहासातील एक प्रमुख व्यक्ती म्हणजे मराठी राज्याचे संस्थापक शिवाजीमहाराज. त्यांच्याविषयी त्याने कोठे अनुदार उद्गार काढले आहेत असे दिसत नाही. पॉटिंजरच्या पत्रात तो म्हणतो की जसजसा मी या माणसाच्या चरित्राचा अभ्यास करतो तसतसा माझा त्याच्याबद्दलचा आदर द्विगुणित होत आहे. मराठी राज्याचा एक साहसी संस्थापक म्हणून शिवाजीमहाराजांची कीर्ती सर्वत्र पसरली होती असे तो म्हणतो.[५२] शत्रूच्या कैद केलेल्या लोकांना माणुसकीने वागविणे, नियमांचे सक्त पालन करणे याबाबतीत त्याची त्याने स्तुतीच केली आहे. 'हा अलौकिक पुरुष होता (a most extraordinary person), त्याच्या काही कृत्यांबद्दल त्याला दोष द्यावा लागला तरी इतिहासातील त्याचे उच्च स्थान मान्य करावेच लागेल, असे त्याने म्हटले आहे.[५३]

शिवाजीप्रमाणेच पहिला बाजीराव पेशवा, अथवा माधवराव यांच्या कार्याचे मूल्यमापनही त्याने इतक्या समर्पक शब्दांत केले आहे की त्याने वापरलेल्या भाषेचा मोह अद्यापिही टाळता येत नाही. बाजीरावाला योजना करण्याची बुद्धी आणि ती प्रत्यक्षात उतरविण्याची धमक आहे. (He had both the head to plan and hand to execute) किंवा माधवरावाबद्दल तो म्हणतो, पानिपताच्या पराभवाने जितकी मराठ्यांची हानी केली नसेल तितकी माधवरावाच्या अकाली मृत्यूने झाली.[५४]

---

५२. ग्रँट डफ भाग १, पृ. ३९.
"A far-famed adventurer as the head of the Maratha State."

५३. कित्ता, पृ. २२८
"And however justly many of his acts may be censured, his claims to high rank in the page of history must be admitted."

५४. ग्रँट डफ भाग १, पृ. ३५९, ५७७.
"The plains of Panniput were not more fatal to the Mahratta empire than the early end of this excellent prince."

मराठ्यांच्या इतिहासातील व्यक्तींचे हे असे अचूक स्वभावचित्रण पाहिले म्हणजे मराठ्यांबद्दल त्याच्या मनात आकस होता, द्वेष होता असे वाटत नाही. मराठ्यांच्या इतिहासाशी तो इतका समरस झाला होता की प्रसंगी तो स्वतःच चरित्रनायक बनतो आणि एल्फिन्स्टनला पत्रात लिहितो, "मोरो त्रिमलला मी बागलाणकडील किल्ले सर करण्यास पाठविले आहे. नेताजी पालकराकडे मुघल प्रदेशात धुमाकूळ घालण्याची कामगिरी सोपविली आहे." (एप्रिल १८२१) शिवाजीचा वेष उतरून ठेवून तो बाजीराव बनतो आणि म्हणतो, "नर्मदा ते चंबळ या प्रदेशात मी धूम उठवून दिली आहे." (२९-५-२२) या पत्रांचा अर्थ एवढाच की शिवाजी, बाजीराव संबंधीचा इतिहासाचा इतका भाग त्याच्याकडून लिहून पुरा झाला आहे याची एल्फिन्स्टनने नोंद घ्यावी.

ग्रँटवरील दुसरा एक आरोप म्हणजे ग्रँटची बौद्धिक पातळी इतिहास-लेखनास, विशेषतः मराठ्यांच्या इतिहासास पुरेशी नव्हती. आपला इतिहास लिहिण्यास एखादा गिबन अथवा मॉमसेन मिळाला नाही आणि 'साधनांचे बावनकशी सोने झाले नाहीं' याची राजवाड्यांना हळहळ लागून राहिली होती. वयाच्या १६ व्या वर्षी ज्याने शिक्षणाचा त्याग करून लष्करी जीवन पत्करले, आणि पुढील सारा काळ केवळ लढायांत आणि प्रशासनात गेल्यामुळे बौद्धिक पातळी उंचावण्यास ज्याला अवसर मिळाला नाही, त्याच्याकडून गिबन, मॉमसेनसारख्या प्रतिभावान इतिहासकारासारखी अपेक्षा करणे योग्य ठरणार नाही. ग्रँट हा लष्करी शिस्तीत वाढलेला होता. वृत्तीनेही तो फारसा बौद्धिक जीवनाचा भोक्ता नव्हता. त्याच्या लेखनात तात्त्विक विवेचन आढळत नाही किंवा अभिजात साहित्याच्या संस्काराचा आविष्कार दिसत नाही. त्याच्या वाचनात कशा प्रकारची पुस्तके येत असावीत याचा काही अंदाज करता येत नाही. एकदा मुंबईच्या आपल्या एका व्यापारी मित्राला त्याने काही पुस्तके विकत घेण्याबद्दल पत्र लिहिले होते. त्यावेळी एक लायब्ररी विक्रीस काढली होती. तेव्हा त्या संग्रहातून जॉनसन्चा शब्दकोश, एशियाटिक रिसर्चेस आणि लिटररी सोसायटीचे जुने अंक आणि काही फार्सी पुस्तके घेण्याबद्दल त्याने लिहिले होते. पण याच पत्रात एक वाक्य घालावयास तो विसरला नव्हता, "ही सारी पुस्तके योग्य त्या किंमतीस मिळत असतील तरच घेणे, नाहीतर सोडून देणे."
(९-३-२१)

त्याच्या लिखाणात पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रियन सी, स्कॉटचा फेरिस्ता, ब्रूसचे ॲनलस्, ऑर्मचे फ्रॅगमेंटस्, जेम्स मिलचा इतिहास, याखेरीज फार्सी-

मराठी हस्तलिखितांचा उल्लेख येतो. पण ही सारी पुस्तके काही विशिष्ट हेतू मनाशी बाळगून वाचलेली आहेत. कांही लेखकांबद्दल क्वचित त्याने आपले मत व्यक्त केले आहे. जेम्स मिलबद्दल त्याचे मत फारसे अनुकूल नव्हते. भारताचा इतिहास लिहिण्यास तो योग्य नाही याचे कारण त्याला ज्या गोष्टी समजत नाहीत तेथे तो दोष काढीत बसतो, त्याच्यात प्रतिभा नाही, आणि मुख्य म्हणजे भारताचे त्याला ज्ञान नाही असे त्याचे मत होते (२१-२-२२). अर्थात पुस्तकावरून त्याच्याविषयीचे त्याने आपले मत बनविले असले तरी एक माणूस या नात्याने त्याला तो फार मोठ्या मनाचा वाटला. (१७-३-२३)

ग्रँटचा ग्रंथसंग्रह कसा असेल याचा तपास करण्याचा प्रयत्न केला. वुडब्रिज येथे त्याच्या पणतीकडे जी जुनी पुस्तके होती ती ग्रँटची असण्याची शक्यता नव्हती, कारण ती सर्व साहित्यावरील होती, आणि आपल्या १८५८ पर्यंतच्या त्याच्या पत्रव्यवहारांत चुकूनसुद्धा एखाद्या साहित्यिक ग्रंथाचा उल्लेख आढळत नाही. एस्. एम्. एडवर्डस् यांनी ग्रँट डफच्या सहाव्या आवृत्तीच्या आपल्या प्रस्तावनेत ग्रँट डफच्या एका पुस्तकाच्या कॅटलॉगचा उल्लेख केला आहे. ऑक्सफर्ड येथील बॉडलियन लायब्ररीमध्ये जे. ग्रँट डफ आणि जे. अँडॅम यांच्या ६ जुलै १८८८ रोजी विकावयाच्या ग्रंथांची एक यादी आहे अशी माहिती पुरविली आहे.[५५] या यादीत इतिहासविषयक, भारतासंबंधीची काही पुस्तके असतील अशा भावनेने ऑक्सफर्डमधील त्या कॅटलॉगची पाहणी केली तेव्हा त्यात भलतीच पुस्तके आढळली. तेव्हा त्या ग्रंथालयाचा मालक हा इतिहासलेखक ग्रँट डफ नव्हे याची पूर्ण खात्री झाली.

आपल्या मर्यादांची ग्रँट डफला पूर्ण जाणीव होती. मराठ्यांचा इतिहास लिहिण्यास दहा वर्षांचा काळ देखील अपुरा आहे हे तो ओळखून होता. केवळ एल्फिन्स्टनच्या उत्तेजनपर शब्दांनी त्याला कार्यप्रवण केले आणि दहा वर्षांतही न आटोपेल असे काम त्याने केवळ अडीच-तीन वर्षांत तडीस नेले. इतरांपेक्षा आपण काहीतरी नवे करतो आहे, जो प्रांत इतरांना ज्ञात नव्हता तेथे जाऊन मूलभूत स्वरूपाची कामगिरी आपण करतो आहोत ही भावना त्याला साऱ्या दुःखांचा, कष्टांचा, उपद्रवांचा विसर पाडावयास पुरेशी होती. हाती घेतलेला विषय किती व्यापक आहे, आपल्या मार्गात किती प्रचंड अडसर आहेत याची जाणीव त्याला असल्यामुळे या क्षेत्रात आपली उडी कोठवर जाईल याची त्याला कल्पना होती.

---

५५. ग्रँट डफ खंड १, पृ. lxxx.

तो म्हणतो, "हा विषय फार गहन आहे, मला फार उंच जायचे नाही. मला फक्त अशा बिंदुपर्यंत चढावयाचे आहे की, जेथून मी पडलो तरी माझी मान मोडणार नाही."[५६]

पुस्तकाचा आकार जसा वाढत होता तसा तो कमी कसा करावा, त्यातले काय गाळावे याची सतत त्याला चिंता होती. यासाठी हवे ते कसब आपल्याजवळ नाही याची त्याला खंत होती (१४-३-२२). उत्कृष्ट ग्रंथ-रचना करण्यासाठी आपली साधना फार तोकडी आहे असे तो वारंवार म्हणे. "मी जे काही केले आहे, आणि जी योजना आखली आहे, त्याबाबतीत लेखक म्हणून अनेक दृष्टचा मी असमर्थ आहे याची मला जाणीव आहे."
(१२-१०-२०)

काही मित्र त्याला उत्तेजन देत, तर काहीजण खरपूस समाचार घेऊन त्याला बेचैन करून सोडीत. सारे लिखाण अग्निकुंडात टाकावे आणि या भलत्या मार्गापासून दूर व्हावे असे त्याला मधून मधून वाटे आणि एल्फिन्स्टनसारखा मित्र नसता तर त्याच्या हातून हे कार्य कदाचित तडीला गेले नसते. नैराश्य झटकून तो निर्धार करतो, "शत्रूला योग्यरीत्या तोंड दिल्याखेरीज मी आता परतणार नाही किंवा मार्गात अडचणी आहेत म्हणून मी माझे कार्य टाकून देणार नाही."[५७]

साथीदार आणि टीकाकार या दोन्ही नात्यांनी एल्फिन्स्टनने त्याच्या हातून इतिहासाचे लेखन घडविण्यात फार मोठा हिस्सा उचलला होता. १८२२ च्या मध्यावर त्याच्या इतिहासाचा बराच भाग लिहून झाला होता, आणि एल्फिन्स्टनच्या नजरेखालून तो गेला होता. साऱ्या आपत्तींना तोंड देऊन त्याची इतिहासाची नौका आता किनाऱ्याच्या दिशेने संथपणे चालली होती. कधी उत्तेजन, कधी कानपिचक्या, कधी सांत्वन या मार्गांनी

---

५६. ग्रँटचे एल्फिन्स्टनला पत्र, ता. २-८-१८१९
"It is a great subject, but I should not like to climb higher than that point from which if I did fall, I stand little chance of breaking my neck."

५७. ग्रँटचे फोर्बस्‌ला पत्र, ता. ९-१२-१८२०
"I Shall not *run* before I fairly face the enemy nor abandon the work, merely on account of its difficulties."

एल्फिन्स्टनने त्याला शेवटपर्यंत साथ दिली होती. तो म्हणतो, "मला अशी भीती वाटत होती की तू उतावळेपणाने काही सिद्धान्त मांडताना अथवा वर्णने करतांना कल्पनेला अधिक प्राधान्य देशील. पण माझा अंदाज बरोबर नव्हता. तुझा इतिहास हा अत्यंत धीमेपणाने आणि चिकित्सकपणे लिहिला गेला आहे, आणि त्यात यथार्थतता आणि सत्य याकडे विशेष आस्थेवाईकपणे लक्ष पुरविले आहे. याच्या यशाविषयी माझ्या मनात शंका नाही."[५८]

---

५८. ग्रॅंटचे एल्फिन्स्टनला पत्र, ता. १६–४–१८२२

"You may remember my fear was that you would be hasty and would give way to your imagination both in theories and description. I was quite mistaken. Your history is patient, and judicious, and shows a scruplous regard to truth and accuracy. There can be no doubt of its success."

# सूची

ई



उ



ए



ओ



औ



क

## फ

भ



म

य

र



ल



व

### श



### स

### ह

---

# प्रमुख संदर्भ-ग्रंथ


1. **Grant Duff** ... A History of the Mahrattas, Vols I & II, OUP, 1921. 6th Edition.

2. **Sardesai, G. S.** ... New History of the Marathas, Vol. 3 Phoenix, Bombay, 1958.

3. **Ballhatchet, K.** ... Social Policy and Social Change in Western India 1817-1830, London, 1957.

4. **Colebrooke, T. E.** ... Life of the Honourable Mountstuart Elphinstone Vols I & II, London, 1884.

5. **Basu, B. D.** ... Story of Satara, Calcutta, 1922.

6. **सरदेसाई, गो. स.** .. मराठी रियासत उत्तर विभाग, भाग ३. मुंबई, १९३२.

7. **,, ,, सं.** ... पेशवे दप्तरांतील निवडलेले कागद भा. ४२.

8. **भावे, वि. ल.** .. मराठी दप्तर रुमाल नं. २. ठाणे, १९२२.

9. **राणे, र. गो.** ... प्रतापसिंह महाराज सातारा, १९२९.

## संक्षेप

10. EUR : MS ... इंडिया ऑफिस लायब्ररी, लंडन येथील ग्रँट डफ, एल्फिन्स्टन आदींचे कागद.

11. JIH ... Journal of Indian History, या नियतकालिकाच्या १९३६ सालच्या भाग १५ मधील श्री. डिकसळकर संपादित सातारा म्युझियममधील पत्रव्यवहार पृ. २२१ – २३६, पृ. ३६८ ते ३८६.

12. डे. कॉ. ... पारसनीस संग्रह डेक्कन कॉलेज रुमाल नं., फाईल नं., आणि पत्र नं. या क्रमाने.

13. पे. द. ... पेशवे दप्तरांतील निवडलेले कागद.

14. भा. इ. सं. मं. ... भारत इतिहास संशोधक मंडळाचीं प्रकाशनें.

15. कोलब्रुक ... Mountstuart Elphinstone.

16. बॉलहॅचेट ... Social Policy.

17. ग्रँट डफ ... A History of the Mahrattas.





